**यंत्र–चालू** :

२७ सफर, सबा, सु. १२१७/१६ जाने. १८१७ (**१२७४**); ता. कुडाळ व बारामुरे येथे देशमुख, देशपांडे यांना हक्काबाबत पत्र देण्याची सूचना, (**१२८०**); फुलगावी सोनकेवडयांची मागणी, (**१२८९**); वासोटा व भिवगड येथील मजकूर कळविण्याबद्दल सूचना, १ र. वल, सु. १२१७/१९ जाने. १८१७ (**१२९२**).

(—) – **रघुनाथ** (आपटे) : दयाबा अरब याजकडे येणे असलेला ऐवज, वाड्याचा बंदोबस्त वगैरेचा तपशील, इ. स १८००–१८१८ (**१११३**) (अपूर्ण); रामाजी नाईक तावडे याचे काम झाल्याबद्दल निवेदन, (**१२६०**).

(—) – **विठू पाटील लेकवळे** : तसलमाती ऐवज पुण्यास पाठविण्याची आज्ञा, १२ सवाल, सु. १२१६/१६ सप्टें. १८१५ (**१२४५**).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]

भोयांचे खर्चाचा ऐवज रवाना, (**११३५**); पुणे ते सोलापूरपर्यंतच्या बंदोबस्तास असलेल्या हुजूरकडील लोकांना वामनराव आपटे यांच्यातर्फे रोजमुरा देणे व अब्दुल हबीब याजकडे वासुदेवपंत याचे येणे असलेला ऐवज याबद्दल सूचना, १ सफर, सु. १२१४/ २४ जाने. १८१४ (**११४२**); सोयरिकीबाबत सूचना, १७ र. वल, सु. १२१५/२७ फेब्रु. १८१५ (**११७०**); अष्टेकर यास मुलगी पसंत असल्याबद्दल निवेदन, इ. स. १८१५ (**११८६**); गोरसिंग परदेशी याच्या शिरवळ येथील रवानगीबद्दल खुलासा (**११९७**); वसुलाच्या यादी तयार करून दिल्याबद्दल निवेदन (**१२१८**); परळी व मेढे येथील पाठविलेला ऐवज सुरूर येथे पाठविण्याची विनंती, (**१२१९**); कानोजी कुली यास द्यावयाचा ऐवज विठोजी याचेजवळ देण्यासाठी रवाना, (**१२३८**); ढोकरी गावचा जाबसाल पुण्यात करण्याबद्दल विनंती, (**१२४४**) (अपूर्ण); सनगे व बापू अबदागिऱ्या फुलगावी रवाना, संरजामे यांचा शोध, (**१२५६–१२५७**); महाळुंग याच्या रवानगीची तजवीज, (**१२५८**); जिन्नस रवानगीबाबत खुलासा, (**१२५९**); पत्र व हुंड्यांची पोच, हरिपंत म्हसकर याच्या आगाशे याचे हातून सुटकेसाठी पत्र पाठविण्याची विनंती, (**१२६१**); बाबोरी येथील हुंड्यांची मागणी, पथकाची हजेरी, कुरलेकर राजे भोसले याजबद्दलचे पत्र शिवाजीपंत यांस प्रविष्ठ, (**१२६३**); महिपती याच्या रोजमुऱ्याचा ऐवज देण्याची सूचना, (**१२८२**); वैराटगड येथील शाहजी पवार याच्या कज्याच्या जमिनीस उपद्रव न लागू देण्याबद्दल सूचना, (**१२९०**); जिनसांची मागणी, (**१२९६**); पत्र व जिनसांची पोच, (**१३००**).

पावती :

**कान्हजी कृष्णाजी कुली––जगन्नाथपंत सुभेदार** : स्वतःच्या घरचे नुकसान करून ते सरकारात न कळविल्याबद्दल घेतलेल्या गुन्हेगारीचा ऐवज परत मिळाल्याची, भाद्र. शु. ११, श. १७३७/ १४ सप्टें. १८१५ (**१२३७**).

याद्या :

रिसालदारीबद्दल ऐवज येणे असलेल्या रिसालदारांची, जिलकाद, सु. १२१४/ऑक्टो., नोव्हें. १८१३ (**११४७**); पुणे येथील कुळांकडील वसुलीची, श. १७३५–३६/इ. स. १८१३–१५ (**११४८**); बलवादल व पप्रगज हत्तींच्या चाकरीस असलेल्या लोकांची, २१ ज. वल, सु. १२१४/२१ जून १८१३ (**११४९**); किल्ले परळी येथून सायगांवी रवाना केलेल्या लग्नाच्या साहित्याची

**याद्या–चालू** :

सु. १२१५/इ. स. १८१४–१५ (**११५७**); परदेशी याच्या घराच्या जप्तीत घेतलेल्या वस्तू आणून देण्याबद्दल आप्पाजी जगताप यास पत्र, (**१२४२**).

**रसालगी यादी** :

**अंताजीपंत किराण** (—) : राजजी नजाजी व राजजी जानोजी लेभे पाटील, पिंपवडे बुद्रुक यांच्याकडून येणे असलेला कर्जाऊ ऐवज सखाराम कुलकर्णी व लेभे पाटील यांना ताकीद करून वसूल करून देण्याबद्दल तेथील कमाविसदारास पत्र देण्यासंबंधी, सु. १२१४/इ. स. १८१३–१४ (**११४४**).

**वायदेचिठी** :

**बाळाजी जोशी कुलकर्णी** – (—) : केसरसिंग जमादार यास रामचंद्रशेट याने घेतलेला ऐवज मुदतीत परत करविण्याबद्दल आश्वासन, श्रावण शु. ५, श. १७३७/९ ऑगस्ट १८१५ (**१२४१**).

पुडके क्र. २, का. सं. २१४ (१३१०–१५२३)

सु. स. १२११–१२१८ इ. स. १८१०–१८१८

कर्जरोखा :

शंभूभट यास घोडजी चोरघे यांनी दिलेल्या कर्जाबाबत, (१४९५).

कतबा :

आत्माराम सोनार याने आपले दागिने भाऊ काकाजी सराफ नगरकर याजकडे गहाण ठेविल्याबाबत, (**१३९१**); शुक्रवार पेठ येथील नाईकीणीबद्दल, (**१४६४**); शंभूभट गुजराथी पुण्यास मृत झाला व त्याच्या घराची जप्ती केल्याबाबत, ५ जिल्हेज, सु. १२१५/१८ नोव्हेंबर. १८१४ (१४९४).

चिठ्ठया :

शंभूभट याजबद्दल रुपये देण्याबाबत, (**१३७८**); संकेताप्रमाणे सेटीबा जगताप याची रवानगी, (**१३९२**); अनुपचंद याचे नावे पाठविलेल्या हुंडीची पोच पाठवावी म्हणून, (**१३९४**); अरब व अकबरखान यांना द्यावयाच्या रकमेबाबत, (**१३९९**); तांदूळ खरेदीबाबत, (**१४०२**); परशराम केशव ओक याने परभारे जामदारखान्यात रसद भरल्याबाबत, (**१४१७**); बाटखर्चाबद्दल, (**१४५९**); बापू आपटे याजकडील शिपाई बोलविण्यास आले तरी आपटे याजकडे चौकशी करावी म्हणून, (**१४६२**).

जबानी :

कर्जापोटी दरसाली धान्य व कडबा देऊ म्हणून, (**१३११**); मावळांतील भुकूम येथील बापू लिमये यांना कर्जापोटी सालिना धान्य व कडबा देण्याबद्दल मायाजी पवार याची, (**१३१२**); रामोश्याकडून विकत घेतलेल्या कालवडीबाबत बापूजी सरूपजी भोसले याची, (**१३१५**); कुणबिणीवरून झालेल्या तंट्याबाबत सुभाना जनोजी बुचडे याची, १९ सफर, सु. १२१४/१० फेब्रु. १८१४ (**१३१६**); घुमा चांभार विहिरीत पडुन मत्यू पावला त्याबद्दल रामा खंडोजी चांभार याची, (**१३२३**); रामोशांनी केलेल्या चोरीबाबत मानप्पा जिवप्पा क्षीरसागर याची, (**१३६९**); घोटवडे येथील रामोश्यांनी केलेल्या चोरीबद्दल बहिरू, जिव्या चव्हाण व क्षीरसागर याची, (**१३७०–१३७१**); बालशेट कृष्णशेट वाणी सिरगांवकर याचा व आबा जोशी पालवणकर याचा भागीसंबंधीच्या तंट्याबाबत बालशेट याची, (**१३७२**);

**जबानी चालू** :

पांडु रामोशी याजबरोबर केलेल्या चोरीबाबत मल्या रामोशी याची, (**१३८१**); बळवंतराव शिर्के व जावई यामध्ये म्हशीवरून तंटा झाला त्याबाबत नाना शिर्के याची, (**१३८५**); मीर हैदर इनामदार याने बटीक आणली व पोरे विकली त्याबाबत शाहासाहेबाची, (**१३८७**); कुणबिणी, लुगडे व पैसे पळवून नेल्याबाबत संती कुणबिणीची, २६ रमजान, सु. १२१६/१ सप्टें. १८१५ (**१३८९**); भवानी शिंपी याजकडून जिन्नस खरेदी केले त्याबाबत मोतीराम किसनदास याची, (**१३९०**); गोविंदराव गोखले यांचा ऐवज बापू भटजी यांचे नावे घरी जमा केला त्याजबद्दल त्रिंबक लक्ष्मण मुंगी याची, (**१३९३**); लाला चंद्रभान याजपासून व्यंकोजी हरळकर याने जिनसा घेतल्या त्यावरून झालेल्या तंट्याबाबत महादजी सावंत याची, (**१४७६**); शिंगणापूर येथे रामोशी यानी घातलेल्या दरवड्याबाबत अंकुशा कोळी याची (**१४७९**).

पत्रे :

आप्पा*—माणकोपंत* : केशवराव यांच्या गमनाबाबत, (**१४७२**).

आप्पाजी नारायण —**बापू*** : सौपे बांधावयाचे काम सुरू झाल्याबाबत, ८ जिल्हेज, सु. १२१५/२१ नोव्हें. १८१४ (**१४६७**).

आबा भट—गोपाळभट **दादा गोखले** : बापुजीपंत सोवनी यांनी कराराप्रमाणे पैसे दिले नाही म्हणून, (**१४४२–१४४३**).

आबाजीराम गोडबोले—**लक्ष्मणराव चितळे** : हरिपंत फडके यांस फणसाचे रुपये दिल्याबद्दल, सु. १२१५/इ. स. १८१४–१८१५ (१४८६).

**कानोजी** थोरात—**वामनराव तात्या सुभेदार** : डोणजे गोन्हेखुर्द व समजापुर या गावाच्या रानांतील लाकडे तोडण्याबद्दल, (**१३८२**).

काशिनाथ गोविंद आपटे—**नारोपंत नाना** : खुशालीचे पत्र पाठविण्याबाबत, (१४६९).

कृष्णाजी अनंत देशमुख—**राघोपंत आपटे** : कुटुंबीय माणसांच्या रवानगीबाबत चौकशी, (**१३२९**).

**कृष्णाजी** बाबाजी **जोशी—बापू*** : पाडळीकर भट याचे पुण्यास मुलगी पहावयास गमन, किन्हई येथील लोकांना पट्टीचा तगादा, वर्धनगडच्या गावाकडून यावयाची बाकी, साखरगड येथील यात्रेचा खर्च याबाबत, ६ जिल्हेज, सु. १२१५/१९ नोव्हें. १८१४ (**१४७१**).

**गंगाधर** मोरेश्वर—**वामनराव तात्या*** : अमृतराव सकपाळ मोराशी यास जामीन राहण्याबाबत, ९ जिल्हेज, सु. १२१५/२२ नोव्हें. १८१४ (**१४६०**).

**गणपतराव गोविंद—सुभेदार प्रांत जुन्नर** : साकोरी, ता. वाल्हे येथील हिशेबासंबंधी, (**१४६३**).

**गोमाजी** वागचवरे—**वामन तात्या सुभेदार** : रोखा लिहून दिल्याबाबत, ८ मोहरम, सु. १२१५/२१ डिसें. १८१४ (**१३७४**).

**गोविंदराव** कृष्ण—**बापू** × : मुलास लग्न कर्तव्य असल्यास सनगे घेण्याबाबत, ११ जिल्हेज, सु. १२१५/२५ नोव्हें. १८१४ (**१४५७**).

**तुलसाजी** धोंडजी मोरे—**वामनराव तात्या सुभेदार** : डोणजे येथील कुरणातील लाकडे तोडावयाबाबत, (**१३७५**).

**त्रिंबक** बाबाजी—**बापूसाहेब** × : कुशल वर्तमानाबाबत, २ रमजान सु. १२१७/२८ जुलै १८१६ (**१५१६**); (**१५१७**).

**पत्रे चालू** :

**दौलतराव ताटे देशमुख—बापूसाहेब** × : आज्ञेनुसार बाळाजीपंत दादा व रावजी कारखानीस कामे करतात म्हणून, ८ साबान, सु. १२१८/२४ जून १८१७ (**१३३९**); —**वामनराव तात्या** : महालाची लावणी करण्याविषयी, (१३४०).

**नारो बापूजी भिडे—मोर दीक्षित आपटे** : रमा दागट याची रवानगी, (**१४५३**).

**नारो महादेव—आप्पाजीपंत दादा गोडबोले** : आंबेगाव येथील वसुलाबाबत, (**१४४८**).

**निंबाजी बाजी जोशी—बापू आपटे** : गणपती उत्सव करण्याबाबत, (**१३१४**).

परशराम खंडेराव—**रघुनाथराव वामन** : वैराटगड येथील मामलत व खर्च याबद्दल, ९ मोहरम, सु. १२१७/२९ नोव्हें. १८१६ (**१४२४**).

परशराम नागनाथ—**बापू** : आनेवाडी येथे सावकारांचा उपद्रव, (१४४१).

**पिराजीराव काकडे—वामनराव सुभेदार** : राजगडचे सरंजाम, महालात दंग्यामुळे लावणी झाली नाही सबब किल्ल्याचे खर्चास सेरीचा वसूल द्यावा म्हणून, ३ जिल्हेज, सु. १२१५/१६ नोव्हें. १८१४ (**१४८२**).

बापू काशी—**गोविंद कृष्ण आपटे** : विठ्ठलपंत यांचा लखोटा रवाना, वराचे पोपे दुरुस्त करण्यासाठी रामसिंग व माधवसिंग यास ठेऊन घेणे, ८ जिल्हेज, सु. १२१५/२१ नोव्हें. १८१४ (१४५५–१४५६).

बाळको हणमंत–**बापू काका** × : खुशालीचे वर्तमान कळवावे म्हणून, (१४६८).

बापूजी बाजीराव आपटे—**सखोपंतदादा** : पेठेतील घराबाबत, (१३६६).

बापूजी बाबुराव—**रावजी कारखानीस** : साल मजकुराचा ऐवज व रोजमुरा यासंबंधी, (**१३३८**); —**सखोपंत सोनी** : रोजमुऱ्याचा ऐवज देण्याविषयी, (**१५००**); —**सदाशिवपंत भाऊ** : पोळ व राजाराम त्रिगुल यांच्या खटल्याचा निवाडा भुईंज येथील पंचाईतीसमोर करण्याबाबत, (**१५०९**); —**बाळाजीपंत गोडसे** : महालानिहाय हुंड्या व रोख ऐवजाची वर्दी नित्य पाठविण्याबाबत, १९ र. वल, सु. १२१५/१ मार्च १८१५ (**१५१३**).

बापूजी **लक्ष्मण सोवनी—सदाशिवपंत भाऊ** : जमीनदार व खोत लोकांचे व्यवसाय व वसूल याबाबत निवाडा, (**१३६७**).

**बाळाजी भास्कर जोगळेकर—बापू आपटे** : जमिनीचा वसूल, रोजमुरा व वर्धनगड येथील रामोशी व गडकरी यांचे बंडाबद्दल, (**१४२६**); —**बाळाजीपंत दादा** : तडवळे सा. कोरेगाव येथील येण्याच्या ऐवजाविषयी, (**१४२७**); —**बापू** : काकांचा रोजमुरा अरबांबरोबर पाठवून देण्याबाबत, (**१४२९**); रोजमुरा व जामदारखान्याची याद, बोधे यांच्या जमिनी, वाई सुभ्याकडून रयतेस होणाऱ्या उपद्रवाचा बंदोबस्त याबाबत, (**१४३०–१४३१**); खिरे यांचे दरोड्याबाबत व स्वार इत्यादींना रोजमुरा देण्याबाबत, (१४३३); कृष्णाजीपंत नातू यांचा माहुली येथून परत जातेसमई किन्हई येथे मुक्काम, (**१४३५**); रामाजी वासुदेव याजकडील सखारामपंत जोशी यांनी बामणी कर्यात वांगी येथील चोरीबाबत केलेल्या रोख्यामुळे रामोशांनी केलेला दंगा, (**१४३७**); सचिव व निंबाळकर यांच्या शिरोळ येथील तंट्यामुळे प्रांतात झालेला दंगा, १४ जिल्हेज, सु. १२१५/२७ नोव्हें. १८१४ (**१४३८**);

पत्रे–चालू :

श्री. येसाजीपंत यास बंदोबस्त करण्याची सूचना, ७ जिल्हेज, सु. १२१५/२० नोव्हें. १८१४ (१४८०); –**विनायकपंत आप्पा :** मनाजी बर्गे याजबरोबर रोजमुरा रवाना, (**१४३६**).

**बाळाजी सदाशिव फाटक––बापू*** : ठाणे कासेगांव येथील जकाती व महालाच्या खराबीमुळे वसुलास अडथळा, (**१३४१**); लष्कराच्या उपद्रवामुळे लावणी पडून रयतेची खराबी, (**१३४२**); इंग्रजांच्या मुक्कामामुळे महालात झालेला त्रास व डेंगळे याजकडे नोकरीस असलेल्या लोकांची चौकशी याबाबत, (**१३४३**).

**महादप्पा हींगमीर––आबाजीपंत दादा गोडबोले :** रजबखान याजबरोबर पुण्यातील गोविंद नाईक इंगरकर याजकडे ऐवजाची चिठी रवाना, ९ सफर, सु. १२१४/३१ जाने. १८१४ (**१३२४**).

**महादजी भवानजी––वामनराव तात्या :** मौजे डोणजे येथील कुरणातील जळाऊ लाकडे पुण्यास आणण्याबाबतच्या खर्चाबद्दल. (**१३८३–१३८४**).

**माधवराव गोविंद वैद्य––वामनराव तात्या :** अन्याबा राहतेकर यांचा खंड परत करण्याविषयी, (१४६१).

**मोकदम आंदोरी व पाडेगाव––तात्यासाहेब ×** : खंडेराव कमाविसदार याने तनख्याखेरीज ऐवज नेला म्हणून, (**१४५०**).

**मोरो बल्लाळ जोशी––नारोपंत नाना :** मापलेदारास इनामदाराकडील वसूल घेण्यास मनाई, (१३२१).

**रघुनाथ आप्पाजी जोशी––रघुनाथ दादा आपटे :** पत्राची उत्तरे पाठविणे व घरची पत्रे ताम्हनकर याजबरोबर रवाना करण्याविषयी, (**१३२७**).

**रघुनाथ वामन––आबा गोडबोले :** आबा यांच्या लग्नाचा मुहूर्त व हुंड्याबाबत, (**१५१०**); लग्नाचे दागिने व येण्याजाण्यासंबंधी, (**१५१२**).

**रामचंद्र भिकाजी––भिकाजीपंतदादा :** बाळाजी राम गोडसे याजपासून चांदवडी रुपये घेतल्याबाबत, (१३३१).

**रामचंद्रराव प्राणनाथ––बापूजीपंत बापू :** श्रीमंतांची बारामती येथून जातेसमई विठ्ठलराव देशपांडे यांच बागेत बैठक, ५ जिल्हेज, सु. १२१५/१८ नोव्हें. १८१४ (१५०४).

**रावजी पुंडलिक––आबाजीपंत दादा :** पत्र लिहिण्याबाबत खुलासा, (**१४३९**); रोजमुऱ्याचा झाडा रवाना, ५ जिल्हेज, सु. १२१५/१८ नोव्हें. १८१४ (**१४८३**); –**बापू* तात्या*** : रोजमुरा, खडकीकर देशपांडे यांचे आगमन व रामशाचा खटला याबद्दल, ५ जिल्हेज, सु. १२१५/१८ नोव्हें. १८१४ (**१४८४–१४८५**).

**रावजी लेले––रघुनाथराव दादा :** बावाजी लेले यांच्या गमनाविषयी, (**१३७९**).

**राघो महादेव वाघ––बापूसाहेब आपटे :** वसूल घेणे, लाकूड तोडणे व कुरणाचा व्यवहार यासंबंधी, (१४४५).

**लक्ष्मण राम भिडे––बाळाजीपंतदादा :** बयाजी नाईक सप्तश्रृंगी येथील यात्रेस जाऊन संगमनेर येथून पुण्यास रवाना, (**१५१८**).

**वामनराव गोविंद––बाबाजीपंत नाना :** लक्ष्मण आप्पाजी देशपांडे यास गावगन्नाचा वसूल देण्याबद्दल, (१४७०); –**माधवरावजी द्य :** चंदा नायकीण नगरकरचे पोरीबद्दल अन्याबा सुभेदार याचे कारकुनानी खंड घेतला तो माघारी देण्याविषयी, (**१४९७**); **बापू* :** दादो विठ्ठल याचे जप्त केलेले वतन सचिव याचे स्वाधीन, (**१५१४**); –**बापू आपटे :** लक्ष्मण आप्पाजी व भिवराव जनार्दन देशपांडे कऱ्हाडकर यांचा भाऊपणाचा तंटा उलगडेपर्यंत गावचा

पत्रे–चालू :

वसूल अमानत ठेवण्याबाबत, (**१५१५**); –**बापूजीपंत बापू :** बाबुराव मोरे याजकडील कशेणे, ता. निज्यामपूर इनाम गावांपैकी निम्मा हिस्सा त्रिंबक बावाजी केतकर यास खरेदी, (**१५२०**).

**विनायक गोविंद बर्वे––बापूसाहेब,** राघो गोमाजी याजबर केलेल्या रोख्यास मनाई व साताऱ्यास ऐवज देण्याविषयी वरात पाठविली त्याबाबत, (**१३४४–१३४६**); किल्ले परळी व लासुर्णे येथील ऐवजाविषयी, (**१३४८**) (अपूर्ण); सावली येथील रोखे मना करण्याबाबत, (**१३४९–१३५०**); लासुर्णे येथे ठाणे बसवून गंगाधरपंत यांची रवानगी, (**१३५१**); बापूसिंग व गणेश भाटे यांस किल्याखाली उतरू नये म्हणून ताकीद, (**१३५२**); मौजे लासुर्णे येथे कारकून रवाना करण्याविषयी, (**१३५३–१३५४**).

**विनायक वासुदेव मराठे–बापूजीपंत बापू आपटे :** त्रिंबकजी डेंगळे यांचे ऊंट मोकदमाकडे रवाना, पेंढाऱ्यास शह देण्यास ऊंट रवाना, १२ जिल्हेज, सु. १२१५/२५ नोव्हें. १८१४ (**१४४९**).

**विश्वनाथ बावाजी––बापूसाहेब;** घरगुती पत्रांची उत्तरे पाठविण्याबाबत, ५० रमजान, सु. १२१७/५ ऑगस्ट १८१६ (**१५१३**).

**विश्वेश्वरभट बापट––बापूराव आपटे :** मालवण येथील इंग्रजास चकती देण्याबाबत, ८ जिल्हेज, सु. १२१५/२१ नोव्हें. १८१४ (**१४५४**).

**शेख असरफ––गणपतराव आप्पा सुभेदार :** खर्चासाठी दिलेल्या ऐवजाबद्दल, २७ साबान, सु. १२१६/४ ऑगस्ट १८१५ (**१३८६**).

**श्रीधर वामन–– बापू आपटे :** रोजमुऱ्याबाबत, ६ जिल्हेज, सु. १२१५/१९ नोव्हें. १८१४ (१४७८).

**सखाराम गणेश––बापूजीपंत बापू :** खुणाली व वसुलाबाबत, (**१४२५**); बोधे याजकडील जमिनीच्या वसुलाबाबत, (**१४३२**), (**१४३४**).

**सखाराम मोरेश्वर––बापू काका आपटे :** काकांची किन्हईस भेट व घरगुती अडचणीबाबत, २८ जिल्हेज, सु. १२१५/११ डिसें. १८१४ (१४२८).

**हरी आप्पाजी भिडे––रघुनाथराव दादा आपटे :** आबाच्या लग्नास किल्याचा बंदोबस्त करून रवाना, (१५०७).

**हरी पद्माकर चिपळूणकर––बाळाजीपंत भाऊ;** कुशलता कळविण्याबाबत, (१३२५).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली]

**काशिनाथ वैशंपायन–** (–) : परसगावकर तेली याने शिवा तेली याचे बायकोस जबरीने नेल्याबाबत, १३ जिल्हेज, सु. १२१५/२६ नोव्हें. १८१४ (१४४७).

**काशी विश्वनाथ –** (––) : कुणबीण हवाली केल्याबाबत, दादा गद्रे यास नवा बिछाना रवाना, ३ जिल्हेज, सु. १२१५/१६ नोव्हें. १८१४ (**१४९६**); सखोपंत सबनीस याच्याशी पहाणीसंबंधी बोलणी, (१५०३); महादजी कृष्ण यास पुण्यास रवाना, ५ जिल्हेज, सु. १२१५/१८ नोव्हें. १८१४ (१५०६).

**नारो गणेश परांजपे––** (–) : रामचंद्र सहस्त्रबुद्धे यांचा देवघेवीवरून झालेला तंटा, (१४७७)

**नारो परशराम––** (–) : लालखान यांचा हिशेब करून निरोप देणे व मोरोपंत यांच्याकडे गुरे पाठविण्याबाबत, (१४४०); मोरोपंत यांस दागिन्यांची व्यवस्था करण्यास सांगण्याबद्दल, (**१५२२**); पाणी खोल असल्यामुळे शिपायास पाण्याबद्दल ताकीद करावी म्हणून, (१५२३)

पत्रे–चालू :

**बहिरो कृष्ण साठे**––( – ) : नरसिंहपूर वगैरे ठिकाणी रामोशांच्या बंदोबस्तासाठीं बाळाजी बाबुराव देशमुख यांचे पुण्यास गमन, (१३६८).

**बापूजी लक्ष्मण सोवनी**––( – ) : चिमणाजी रामचंद्र घाटे व जावडेकर देसाई यांचा कजिया २४ ज. वल सु. १२१४/१५ मे १८१४ (१३५५), ऐवज वसुली, सखो रामचंद्र टवे यास बोरवणकर यांनी खोतीबद्दल दिलेला ऐवज, तारळे येथील कारकुनास अटक, उन्हाळे येथील विचारे गोटणेकर यांचा भोगवटा व रामेश्वराच्या खर्चाविषयी, २५ जं. वल, सु. १२१४/ १६ मे १८१४ (१३५६-१३६१), तपासणीसाकडून घेतलेल्या यादीअन्वये कारकुनांनी केलेली चौकशी, जिनसांची रवानगी, (१३६२); गल्याच्या सावकारी दराची चौकशी व दोनीवड येथील जप्तीबाबत, २८ सफर, सु. १२१४/ १९ फेब्रु. १८१४ (१३६३-१३६५).

**बापूजी हरी**––( – ):शिक्याचे सामान पाठविणे व मुंबईस ऐवज पाठविण्याबाबत, १२ जिल्हेज, सु. १२१५/२५ नोव्हेंबर १८१४ (१४४४).

**बापूजी हरी सहस्त्रबुद्धे**––( – ): सिखली घाटाकडे केलेल्या प्रयाणाबाबत, ७ जिल्हेज, सु. १२१५/२० नोव्हेंबर १८१४ (१४८१).

**बाळाजी गोविंद व अक्काजी नारायण**––( – ); खामगाव येथील संभू भट याचा मृत्यू व त्याचे घराची जप्ती, ६ जिल्हेज, सु. १२१५/१९ नोव्हेंबर १८१४ (१४९३).

**बाळोजी पाटील गायकवाड**––( – ) : भिवरी येथील रखवालदारांनी बाळोजीबद्दल केलेल्या तक्रारी, (१५०२).

**बाळाजी राम गोडसे**––( – ) : लोकांकडून येणाऱ्या ऐवजाबाबत तगादा व गणपतराव याचे लग्न याबद्दल, (१५०८).

**रावजी पुंडलिक**––( – ): स्वारांचा खटला व यशवंतराव जाधव याजबरोबर आलेल्या बंदिवानाची चौकशी करण्यासाठी हुजुराकडे रवानगी, ६ जिल्हेज, सु. १२१५/ १९ नोव्हें. १८१४ (१४८७-१४८९); येकोजी हिवरेकर याजबरोबर बरदीवाले यांनी तंटा केल्याबद्दल (१४९२).

**सखो गोविंद**––( – ) : लग्नासाठी रकमेची मागणी, ८ जिल्हेज, सु. १२१५/२१ नोव्हें. १८१४ (१४६५).

ह.ी **पद्माकर**––( – ) : फलटणचे लखोटे रवाना (१३१०).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]**

(––) – **कृष्णराव आप्पा** : आबा गोडबोले यांचे विचारे लग्नाचा मुहूर्त ठरविणे (१५११).

(––) – **खंड्या रामोशी** : दारक्या रामोशी जवळार्जुनकर यांनी म्हैस दिल्याबाबत, ११ साबान, सु. १२१४/९ ऑगस्ट १८१३ (१३२०).

(––) – **ठाणेदार** (किन्हई) : निंबाळकर याजकडील दाजीबा व घोरपडे यांच्या ठरलेल्या लग्नात घोरपडे यांच्या भाऊबंदांनी कजिया करू नये म्हणून ताकीद. (१३३३).

(––) – **नारायणसिंग बंसीधर** : हत्तीच्या खर्चासाठी पैशाची मागणी सु. १२१४/इ. स. १८१३-१४ (१३१९).

(––) – **बापूसाहेब आपटे** : संतोषगड येथील गडकरी, दरकदार व कारकून वगैरेंची किल्याबद्दलची नेमणूक वाढवून मिळण्याबाबत (१३३७).

(––) – **बाळाजीपंत व अनाजी नारायण** : पळसाच्या समिधा पाठवून देण्याबाबत (१४५१).

पत्रे–चालू :

(––) – **मोकदम वढीव** ; राघप्पा रामोशी याची चोरीची म्हैस कुणब्याकडून पुण्यास रवाना, १७ सफर, सु. १२१४/ ८ फेब्रु. १८१४ (१३२२).

(––) – **रंभाजी गंगाजी** : गावकऱ्यांनी जामीन राहून देविलेल्या कर्जाची फेड करण्याबाबत (१४४६).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख [नसलेली]**

शामभट परिचारण याच्या घरगुती भांडणाबाबत (१३१३) ; कर्जाची फेड (१३१७) रामोश्याच्या भाऊपणाचा कजिया (१३२८); पुरंदरे यांचे गांवास तपासनीसाकडून होणाऱ्या उपद्रवास मनाई व्हावी म्हणून, गड्याच्या रोजमुऱ्याबाबत, १५ र. खर, सु. १२१४/७ एप्रिल १८१४ (१३३०); गांवाचा भोगवटा व मसाला याबाबत (१३३२) ; गांवकऱ्यांचा जाबसाल घेण्याबाबत (१३४७); जयराम गुजर यांच्या कर्जवसुलीबाबत कमाविसदारांस पत्र, (१४५२); रामचंद्रपंत सहस्त्रबुद्धे यांना गंगाधर पंत मराठे यांचा तगादा, (१४५८); शेतातल्या धान्याच्या काढणीबाबत, (१४६६); बाग व लग्न याबद्दल, (१५०१).

पुरसीस :––

संती कुणबिणीच्या पोरीच्या खरेदीसंबंधी, (१३८८).

पोच :

भुकुम येथील आप्पाजी पवार याजकडून धान्य मिळाल्याची (१३९५-१३९६).

याद्या :

मौजे वाळूंज हा गांव महादेवभट आप्पा भट टकार यास इनाम दिल्याबद्दल, १७ सफर, सु. १२१४/८ फेब्रु. १८१४ (१३१८); जदीद इनामदारांच्या नांवाची, (१३२६); तोरणे येथील शिवरामभट पिंपळकर याच्या येणे ऐवजाची (१३३४); पांगरे बु॥ ता. संवदल येथील खोतीबद्दल, (१३३५); महाली ऐवजाविषयी तगादा न व्हावा म्हणून, (अपूर्ण), (१३३६); वामनाजी मल्हार कुलकर्णी यांची पेरणे येथून घोडी चोरीस गेली त्याबाबतची, (१३७३); रत्नागिरी, विजयदुर्ग वगैरे येथील गल्याचे दराबाबतची, (१३७६-१३७७); आळंदी येथील रामोशाने पेरणेच्या वामनाजी मल्हार याच्या घरावर घातलेल्या दरोड्यासंबंधातील रामोशांच्या नांवाची, (१३८०); बाळू पाटील जागवडीकर याच्या गुरांची, (१३९७); स्वारी बरोबर पाठविलेल्या वस्तूंची, (१३९८); जिनसांच्या वजनाची, (१४००) प्रांत पुण्याच्या गांवाची, (१४०१); मसाल्याच्या वस्तूंची (१४०३); जामदारखान्याच्या खर्चाची व खिबकजीकडील खर्चाची (१४०४); टोणगा व बाजरीची गोणी चोरीस गेली, त्याबाबतची, (१४०५); रामोशी याजकडे दागिने, सनगे वगैरे ठेवल्याबद्दलची, (१४०६); कामकाजाविषयी, (१४०७); खोबरे, कथील वगैरे आलेल्या वस्तूंची, २०र. वल, सु. १२१०/२४ एप्रिल १८१० (१४०८); गांवांना सूट दिली त्याची, (१४०९); कथीलाच्या वजनाची, (१४१०); देवगड येथील सीत अशरचे येणे ऐवजाची, (१४११); परटाकडच्या कपड्यांची, (१४१२); पालखीबाबत यावयाच्या ऐवजाची, (१४१३); दलबादल हत्तीच्या रतीबाच्या जिनसांची, (१४१४); जेजुरी येथे स्वारी आली त्यावेळी हत्ती व घोडे यांना रतीबाच्या जिनसा दिल्या त्याची, (१४१५); शिल्लक ऐवजाची, (१४१६); गाडदी लोकांच्या नावाची, (१४१८); पवार याकडून आलेल्या सनग्याची (१४१९); खोबरे, कापड वगैरेची वसूल बाकी, (१४२१); सामानाची, (१४२२); जामदारखान्याकडील देण्या घेण्याविषयीची, (१४२३) रायगड येथील वसुलीची, जिलकाद, सु. १२१५/ ऑक्टो. नोव्हें. १८१५ (१४७३); बापू आपटे याजकडे दिलेल्या सरंजामाची, ७ जिल्हेज, सु. १२१५/२० नोव्हें. १८१४ (१४७४);

**याद्या—चालू :**

गणेश नारायण आठवले यांचे कर्ज वसुलीबाबत, (१४७५); श्री देवी साखरगड संस्थान मौजे किन्हई येथील कार्तिकी पौर्णिमेच्या यात्रेच्या खर्चाची, (१४९०); किन्हई पैकी वरातेबाबतची, (१४९१); चितोपंत नातू व विष्णुपंत नरहर यांच्या देण्या-घेण्याविषयीच्या खटल्यात नेमलेल्या पंचाची, २२ जिलकाद, सु. १२१५/४ नोव्हे. १८१४ (१४९८); गंगाधर सदाशिव सहस्त्रबुद्धे यांनी बळवंतराव आप्पाजी परांजपे यांजकडे ठेवलेल्या ऐवजाची, (१४९९); कोंढे, धायरी वगैरे गांवगन्नाची वसुली तूर्त न करण्याबाबतची, २८ जिलकाद सु. १२१५/१० नोव्हें. १८१४ (१५०५); विठोजी व महादजी रावजी गोडांबे यांचे कर्जाबाबत, (१५२१).

**शिल्लक झाडा :–**

माहे मोहरम, जिल्हेज वगैरेचा, (१४२०).

पुडके क्र. ३ का. सं. १९५ (१५२४-१७१८)

सु. स. ११३६-१२१९ इ. स. १७३५-१८१८

**चिठ्ठी :**

हडपसर येथील मोकासा रक्कम नाकारल्याबाबत, जावसाला-करितां पुण्यास येण्याबाबत ४ ज. वल, सु. १२१५/१५ एप्रिल १८१५ (१५४५); २६ र. खर, सु. १२१५/७ एप्रिल १८१५ (१५४६); हडपसर येथील कुंभारकाम घेऊन पुण्यास येण्याबाबत, १३ र. वल, सु. १२१५/२३ फेब्रु. १८१५ (१५४९).

**पत्रे :**

**कृष्णाजी बाबाजी जोशी—बापूसाहेब** : वाई येथून स्वार पाठ-विण्याबाबत श्रीधरपंत यास विनंती करण्याबाबत, (१५९४); ऐवज पाठविण्याची व्यवस्था, २१ रजब, सु. १२१७/१८ जून १८१६ (१५९६); परदेशी व मेवाती लोकांची पुण्यास रवानगी, (१५९७); सायगाव येथील दिवाणखान्याचे बांधकाम, (१६३२); किल्ले ताथवडा येथील सनदा हवाली करण्याबाबत, (१६४०).

**कृष्णाजी राजगुरु—वामनराव तात्या** : किल्यावरील बुरुजाची दुरुस्ती, (१६०९).

**गणेश दामोदर अभ्यंकर—हणमंतराव आपटे** : सरंजामासह महिमंडण किल्याची व्यवस्था, २ र. वल, सु. १२१५/१२ फेब्रु. १८१५ (१६१२).

**गोविंदराव-कृष्ण-तात्या—** : देवालयाचे कामाकरिता बालनाथ गोसावी याचे आगमन, १७ रजब, सु. १२१६/२६ जून १८१५ (१६४५).

**जनार्दन कृष्ण भावे—वासुदेवपंत तात्या** : नारायणगाव येथील वसूली रावजी देशमुख यांचे आज्ञेप्रमाणे चालू करण्याबाबत (१५२५).

**दाजी मल्हार वाघोलीकर—पंतप्रधान** (बाजीराव रघुनाथ) : वाघोली येथील सखाराम विठ्ठल जोशी याचे घराखाली सांपडलेल्या धनाबाबत, जेष्ठ शु. १०, श. १७३८/ ५ जून १८१६ (१६३४).

**दामोदर रामचंद्र आपटे—तात्या** : अटकेतील बहिरो वासुदेव चोळकर याची पुणे मुक्कामी रवानगी, १७ रजब, सु. १२१६/ २६ जून १८१५ (१५९२).

**धोंडो अनंत—मोकदम हडपसर** : मोकासा ऐवज पुण्यास घेऊन येण्याबाबत, १९ र. वल, सु. १२१५/१मार्च १८१५ (१५५०).



**पत्रे—चालू :**

**नाना—बापू** : वासोटा किल्याचा योग्य प्रकारे बंदोबस्त, (१६३८).

**नारो परशराम—आबा गोडबोले** : येकोजी तुपे या गैरवाका समजाविशाच्या इसमास पत्र न देण्याची विनंती, (१५२८); **—दादासाहेब** : चिपळूण येथील अंमल वसुलीचा अहवाल, (१५८१); **—बापाजी** : वाकेपे व चिपळूण येथील अंमल वसुलीतील अडथळे व त्यांच्या सनदा त्वरेने पाठविण्याची विनंती, (१६८१); **बापूसाहेब** : आज्ञेप्रमाणे घरास गमन, (१५३०); चिपळूण येथील, वसुली वाकेपे येथील वहिवाट, खेडे येथील अंमल, जमेचा सूड वगैरेबाबतचे निवेदन, २६ जिलकाद, सु. १२१६/३० ऑक्टो. १८१५ (१६७२-१६७४). **—बाळाजी भाऊ गवंडी** : तपकीरीची मागणी, (१५८९).

**नारो महादेव लिमये—आबाजीपंत गोडबोले** : जेतु चोरगा याचे घराची जप्ती, (१५५८); याद पाठवून देत असल्याबाबत, (१५६०); आज्ञेप्रमाणे वर्तणूक, (१५६१); (१५६५); १८ रमजान, सु. १२१५/३ सप्टें. १८१४ (१५६७); (१५९१); सचोटीने काम करण्याची प्रतिज्ञा, ३० रमजान सु. १२१५/ /१५ सप्टें. १८१४ (१५६८); पाटील कुलकर्णी यांनी परस्पर जावसाल करण्यास बंदी, (१५७०); कात्रज येथील ऐवजाची रवानगी, (१५७४); पत्राप्रमाणे वर्तन करीत असल्याबाबतची हमी, (१६५३); कुरणे येथील लक्ष्मण थोरात यांजकडून निशा करून घेण्याबाबत, (१६८५); कोंढवे येथील ऐवजाची रवानगी, (१७०२); वनचराई देण्याबाबत, (१७०५); **—वासुदेवपंत जोशी** : नम्रपणे वागणुकीने रहात असल्याबाबत, (१६९९); **—विठ्ठलपंत दादा कुलकर्णी** : कागदांच्या रुमालांची रवानगी, (१६५७).

**पांडुरंग बाबुराव—तात्या सुभेदार** : जगन्नाथ गोखले याने रयतेस दिलेल्या उपद्रवाची चौकशी इ. स. १८१४-१८१८ (१६०७).

**बाळाजी कृष्ण—सदाशिवपंत आपटे** : जंगलीजयगड किल्ला जकिन्यासुद्धा विठ्ठलपंत याचे हवाली करणे, (१६४२).

**बाळाजी गोविंद चितळे—आबा** : जळाऊ लाकडे रवाना व आर्थिक व्यवस्था केली त्याबाबत (१५५६).

**बाळाजी बाजीराव—सदाशिव पटवर्धन** : ऐवजाबद्दल हवाला घेतलेल्या आवजी कवडे यांजकडील ऐवजाची पोच, १९ सवाल सु. ११३५/४ मार्च १७३५ (१७१८).

**बाळाजी भास्कर जोगळेकर—वामनराव तात्या** : वर्धनगड व महिमानगड येथील बंदोबस्त व किनई येथील गावगन्ना वसुली, (१५४१).

**मिरासी गावकर—सुभेदार तालुका देवगड** : कसब्यात होणाऱ्या मनस्वी तुफानाचा बंदोबस्त करण्याची योजना, (१६०४).

**मुकुंद परभ—बापूसाहेब** : व्याघ्रगडावरील बंदोबस्त, (१५९०).

**मोकदम राहटवडे—बहिरोपंत गोसावी** : गाईचे दुधाच्या लोण्याची मागणी, (१५७५).

**राघो रामचंद्र देशपांडे—बापूसाहेब** : ताथवडे किल्यातील हिशे-बाचे कागद सादर, २१ मोहरम, सु. १२१६/१३ डिसे. १८१५ (१५९३).

पत्रे चालू :

**रामचंद्र नाईक साटम--आबाजी दादा गोडबोले :** सहकार्य देण्याची विनंती, (१५८७); **--बापूसाहेब :** व्याघ्रगड येथील किरकोळ वर्तमान, २० जिलकाद, सु. १२१६/२४ ऑक्टो १८१५ (१५८८).

**वामनराव गोविंद--बापू आपटे :** सिताराम शास्त्री यांचे पहाऱ्यांत असलेल्या जावयास मुक्त करण्याची विनंती, (१६३९); नांव तयार करण्याकरिता २००० रु. चा ऐवज पाठविण्याची विनंती, (१७११); (१७१२); खर्चास दिलेला ऐवज हिशेबातून वजा करण्याबाबत, २८ सफर, सु. १२१४/ २० फेब्र. १८१४ (१७१३); कुशल पत्रोत्तर, ५ र. वल, सु. १२१४/२६ फेब्रु १८१४ (१७१४); **---रघुनाथ आपटे :** ऐवज जमा करून घेण्यांची सूचना, चोरीची तपासणी, मेवाती लोकांवर दरोड्यास सहाय्य केल्याचा संशय, (१७१५-१७१६); **बाबाजीपंत नाना :** मल्हार बाजी याजकडे वाकोडी व मेहेकर येथील देशमुखीचा अंमल, २५ र. खर, सु. १२१६/२५ मार्च १८१६ (१५९९).

**वामनराव गोविंद--रघुनाथ :** चिमणाजी नारायण यांचे दिमतीतील गुरुनाथ रंगो याचे नाशिक येथे गमन, (१७१७).

**विठ्ठल बजाजी गाडगीळ--सदाशिव आपटे :** किल्ले जयगड येथील व्यवस्था करण्याबाबत पत्रोत्तर, (१६४३).

**सखाराम बाबुराव--बाबुराव आपटे :** शिक्याचे पैसे महिन्याने फेडण्याबाबत, चैत्र शु. ९, श. १७३८/ ६ एप्रिल १८०६ (१५५७).

**हरी नारायण देशपांडे--नारोपंत दाजी लिमये :** तोफखान्याकडील बैलाच्या चारणीकरितां शिवापूर येथे रवानगी, ४ जिलकाद, सु. १२१५/१८ ऑक्टो. १८१४ (१५६२).

फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली

**अंताजी विठ्ठल व हरी महिपतराव--( - ) :** सखोपंत याजकडे ऐवज रवाना, हरीपंत याचेविरुद्ध तक्रार, मोरवण याजकडून नऊ गांवचे काम करून घेण्याची सूचना, ६ जिल्हेज, सु. १२१५/१९ नोव्हे. १८१४ (१६१५-१६१६).

**जनार्दन कृष्ण भावे--( - ) :** नारायणगाव येथील वसुलीसंबंधी निवेदन, (१५२४).

**नारो घोडबेव--( - ) :** जमीनदारांस ऊशीरा येण्याची कारणे, चंदनापूर येथील शिवेचा तंटा, (१५७६).

**नारो परशराम--( - ) :** नाना केळकर सावकारास कर्जवसुलीबाबत सौम्य धोरण स्वीकारण्याची विनंती, (१५२६); सुतार व कुंभार यांची रवानगी, (१५२७); धोंडोपंत साने याजवर हडपसर येथील मोकासावसुलीबाबत मनाचिठ्ठी, (१५२९); सिताराम मैराळ याचे हडपसर येथील चोरीचा शोध (१५३१); त्वरित वसुलीकरिता शिपायांची मागणी, (१५३२); सामानासह घोड्याची रवानगी, (१५३३); महारांचे जप्तीमुळे बसविलेल्या पट्टीस अडथळा करणाऱ्या इनामदारास ताकीद, (१५३४); ऐवज वसुलीकरितां शिपायांना त्वरित पाठविण्याची विनंती (१५३५); (१५३६); वहिरजी रावजी तुपे याच्या लबाडीबाबत इशारा, (१५३७); ४० पुले हरबरा महाराबरोबर रवाना, (१५३८); महारांचे बलुत्याबद्दल बसवलेल्या पट्टीला विरोध करणारांना समज, (१५३९); (१५४०); हडपसर येथील गाडे पाठविण्याची व्यवस्था, (१५४२); आंबराईचे बलुत्याविषयी तगादा न करण्याचा हुकूम, शेतो वसुलीतील अनागोदी कारभार, (१५४३); मोकासा वसुलासंबंधी अडचणी (१५४४); खंड्या महार या वतनदाराचा ऐवज देण्यांतील कुचराई व दंडेली, (१५४७); हरिपंत तात्या घाणेकर यांनी केलेले अन्याय रोखे, (१५५१); मोकासा वसुलीस पाठविलेल्या

पत्रे चालू :

प्याद्याची धिटाई व त्यावर मनाई करण्याची विनंती, (१५५२); हडपसर येथील पट्टी ऐवज घेण्याबाबत सूचना (१५५५); पासोडी नांगरावयास अर्धलीचा कौल देण्याची विनंती, (१५७८); जाधव याच्या जप्त शेतीची वसुली, किल्यांचा बेहडा, मशाल खर्च, ताथवडे येथील देवस्थान खर्च वगैरे, १७ मोहरम, सु. १२१६/१९ डिसे. १८१५ (१६२५-१६२६); किल्ले ताथवडा येथील जमावसुली व संबंधित घटना, १४ मोहरम, सीत, सु. १२१६/१६ डिसे. १८१५ (१६२७-१६२९); कसबे चिपळूण व वाकेपे येथील अंमल चालू करण्याचा प्रश्न, (१६७५); व्याघ्रगडावर ठाणे, चिपळूण, खेड येथील बंदोबस्त, वाकेपे येथील वसुल वगैरेबाबत, (१६७८-१६७९).

**नारो महादेव लिमये--( - ) :** जैतु आबा याचे घराची जप्ती, (१५५९); लख्या न्हावी याची तटाणी विकण्याबाबत, (१५६३); सखोपंत याजकडे बैलांची रवानगी, (१५६४); ऐवजाची पावती देण्याची विनंती, (१५६६); खेमचंद वाणी याने कुळाला दिलेल्या कर्जाची वसुली, (१५६९); कात्रज व कोंढवे येथील पाटलांचे वसुलाबाबतचे निवेदन, (१५७१); खेमचंद वाणी याची पोथी व वहीचे रुमाल रवाना, (१५७३); जकातबाब व इतर काही गोष्टींविषयी पत्रोत्तर पाठविण्याची विनंती, २५ रमजान, सु. १२१५/१० सप्टें. १८१४ (१५७७); आंबेगाव, कात्रज येथील वर्तमान, खेमचंद याजकडील कर्जवसुली, २३ रमजान, सु. १२१५/८ सप्टें. १८१४ (१५७९-१५८०);

खेमचंद वाणी याचे कर्ज, आंबेगांव येथील बंदोबस्त, २८ रमजान सु. १२१५/१३ सप्टें. १८१४ (१६४७-१६४८); गांवच्या बंदोबस्ताची हमी, (१६४९); संवदल महालांच्या देशमुख व रयत याबाबत, २ रमजान, सु. १२१५/१८ ऑगस्ट १८१४ (१६५०); रामोशी पट्टीचा ऐवज रवाना, (१६५२); झाडे पाडण्याबाबत तक्रार, शिपायांची मागणी, (१६५४); मौजे उंडरी येथील सोमचंद गुजर याच्या मृत्यूची संपूर्ण चौकशी, १८ रमजान, सु. १२१५/३ सप्टें. १८१४ (१६५५-१६५६); कच्ची लावणी न घेण्याबाबत शिपायास ताकीद (१६५९);

तोफखान्याचे बैल दहीटणे येथे रवाना, गांवचा योग्य प्रकारे बंदोबस्त राखल्याचे (१६६०); (१६६१); गांवची वहिवाट करण्याबाबत कुलकर्णी याजकडून अडथळा व त्यासाठीं पत्र व्यवहार, (१६६२); आबाजी कुलकर्णी याजकडील कांही किरकोळ गोष्टींचे निवेदन, (१६६३-६४); उंडरी व पिसोली येथील पैशाची वसुली, कात्रज येथील वाणी व कारकून यांचे भांडण, मारवाडी यांस दुकान चालण्याची परवानगी देण्यासंबंधी, (१६६५-१६६६); लक्ष्मण थोरात याजकडील बाकी वसुलीतील अडचणींचे निवेदन, (१६६७); कात्रज येथील शेतांची वसुली, (१६८३); सालदा गावचे पाटील कुलकर्णी पाठविण्याबाबत, (१६८४); अंतर्गत घडासोडीबाबत मार्गदर्शन करण्याची विनंती, (१६८६); तोफखान यांचे बैलाची रवानगी, (१६८७); ऐवजाची रवानगी, इमाने इतबारे सेवा करीत असल्याची हमी, (१६८८); पैसा वसुलीसंबंधी शिस्त लावण्याची विनंती, (१६८९); जैतु चोरगा याचे घराची जप्ती, (१६९०); ढमढेरे व लक्ष्मण थोरात यांचे कुरणाची सविस्तर चौकशी, (१६९१); गावास रामोशी पाठविण्याची विनंती, (१७००); कोंढवे खुर्द येथील गुरे आणल्याबाबत, (१७०१); तूप रवाना केल्याबाबत, (१७०३) तिमण्णा कामाठी याचे शेतावरील तंटा, (१७०४); बैल सोडून देण्याच्या आज्ञेवरील प्रत्युत्तर, (१७०६); महादजी डुरा याजकडील कर्ज वसुली, (१७०७); रामोशी पट्टीच्या वसुलीतील अडचणी, २८ रमजान, सु. १२१५/१३ सप्टें. १८१४ (१७०८); तोफखान्यातील सतरा बैलांची आरवी येथे रवानगी, (१७०९); पाटील कुलकर्णी यांजकडे तगादा बसविला त्याचा तपशील, (१७१०).

पत्रे : चालू

**बापाजी मल्हार**—( – ) : शेरा दिलेल्या धाकोजी राणे याचे शेराबाबत दुमत, परागंदा झालेल्या बाळोजी पाटलाचा शोध, २० जिलकाद, सु. १२१६/२४ ऑक्टो. १८१५ (१५८२); व्याघ्रगडावरील व्यवस्था, १० जिलकाद, सु. १२१६/१४ ऑक्टो. १८१५ (१५८३); किल्ले व्याघ्रगड येथील दुष्काळात करावयाच्या सोयी, (१६१०); चिपळूण व वाकेपे येथील सुरळीत अंमलाबाबत ताकीदपत्रे, (१६८०); व्याघ्रगडावरील भरती, अयोग्य पिकामुळे पट्टी वसुलीतील अडचणी, किल्यांवर करावयाचे बांधकाम वगैरेबाबत, (१६८२); आज्ञेप्रमाणे काम करून व्याघ्रगडावर आगमन, २० मोहरम, सीत, सु. १२१६/२२ डिसे. १८१५ (१६९२); तांदुळाची टंचाई, लोकांचे रोजमुऱ्याची तरतूद, (१६९३); व्याघ्रगडावरील नवीन बांधकाम व दुरूस्ती याचे खर्चाचा अंदाज, १४ जिलकाद, सु. १२१६/ १८ ऑक्टो. १८१५ (१६९४).

**बापूजी लक्ष्मण**—( – ) : आडवली येथे मातुश्रीचे आगमन, सौंदल महालांचा वसूल, १३ ज. खर, सु. १२१६/११ मे १८१६ (१६०५).

**बाजाजी हरी**—( – ) : मौजे देवगांव येथील जहागिरी हक्कासंबंधी निवाडा, २१ रजब, सु. १२१६/३० जून १८१५ (१६००-१६०१); बावतीवाले यांचा कोडगाव येथील आंबराईतील हस्तक्षेप, (१६०२); मौजे भातोडी येथील आंबराईचा बंदोबस्त, २१ रजब, सु. १२१७/१८ जून १८१६ (१६०३).

**मोरोबा**—( – ) : मौजे पाटकल व नवगाव येथील वसूल करण्यातील अडचणी, (१५७२).

**मोरो बाबाजी वैशंपायन**—( – ) : सेरी असलेल्या दाजीबा गोले याने संपुर्ण खंड बुडविल्याबाबत त्यावर कारवाई करण्याची विनंती, (१५५४).

**रामाजी यशवंत देशपांडे**( – ) : स्वतः आजारी असल्यामुळे कुटुंब पोषणाची सोय मुलातर्फे करण्याची विनंती, (१५९५).

**वासुदेव बल्लाळ**—( – ) : कसबे आचारे या देवस्थान इनाम गांवातील वहिवाट, (१६११).

**विठ्ठल गोपाळ**—( – ) : मेढे व कुडाळ या महालांच्या खालसा अंमलाची जप्ती व कारस्थान करणाऱ्या शिवाजी यास परत पाठविण्याची विनंती, (१६७०); प्रेषकाचे हुमगाव येथे गमन, (१६९७).

**विठ्ठल गोपाळ व अंताजी विठ्ठल**—( – ) : हुमगाव ठाणे घेण्यांतील अडचणींचे निवारण करण्याची विनंती, १४ जिलकाद, सु. १२१६/१८ ऑक्टो. १८१५ (१६७६-१६७७);

**विठ्ठल नारायण गोखले**—( – ) : जकातीच्या खटल्यासंबधित बापूखान याच्या चौकशीची मागणी, लासुर्णे येथील वसुलीच्या चिठ्ठ्या, (१५५३).

**सखो गोविंद**—( – ) : देण्याघेण्यासंबंधी किरकोळ व्यवहार (१६३५).

**सखो हरी सहस्त्रबुद्धे**—( – ) : विविध वस्तु पाठविल्या त्याबाबत, १८ रजब, सु. १२१७/१५ जून १८१६ (१५९८); तलागड येथील व्यवहाराचे तपशीलवार निवेदन, ७ ज. वल, सु. १२१५/१८ एप्रिल १८१५ (१६१९-१६२४).

**सदोबा**—( – ) : वाई सुभ्यांतील पांडुरंगपंत यांच्या जुलमी कारभाराबाबत तक्रार, ३ रजब, सु. १२१६/१२ जून १८१५ (१६३६); किरकोळ; मजकूर, (१६३७); जंगली जयगड

पत्रे : चालू

येथील विठ्ठलपंत गाडगीळ यांचे प्यादे, कारकून वगैरेची व्यवस्था (१६४१); जंगलीजयगड येथील व्यवस्थेबाबत, (१६४४).

**फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली**

( — )—**बापूसाहेब** : राबतीचा ऐवज पुण्यास घेऊन येण्याबाबत, (१५४८); खेरीज मुशाहिरा खर्चाचा ताळेबंद, मोजदादयादीतील सुधारणा, परळी किल्याचे लोक ठेवून घेतले त्याबाबत, गडावरील नवरात्र उत्सवाचा तपशील वगैरे, (१५८४-१५८६); ऐवज वसुलाकरितां आसामींची मागणी, १७ रजब, सु. १२१७/१४ जून १८१६ (१६०६); कसबे आचरे व मनेरगांव येथे मख्ते घेऊन येणाऱ्या कारकुनांकडून रयतेस होणारा छळ, इ. स. १८१६ (१६०८); लिंगोपंत देशपांडे, खरसीकर यांच्याविरुद्ध तक्रार, (१६१७); भगवंत याजकडील वाहगाव महिमतगडाकडे सरंजामास, (१६१८); मौजे आमराला व कापसी येथील गैरशिस्त कारभाराबाबत तक्रार, (१६४६); रामोशाची रवाणी, (१६५१); सायगाव येथे आलेल्या संवदल महालाचे देशमुखांच्या बंदोबस्ताची मागणी, (१६५८); किल्याचे तटबंदीच्या डागडुजी बद्दलचा तपशील (किल्याचे नाव नाही), २८ जिलकाद, सु.१२१६/१ नोव्हे.१८१५ (१६७१); घरगुती शिवण, उधार वसुली वगैरे, २० मोहरम, सु. १२१६/२२ डिसे. १८१५ (१६९५); किल्यावरील जिनसांची आवश्यकता, तोफांचे नवे गाडे, इमारत, लाकूड वगैरेबाबत, (१६९६).

याद्या :

जनार्दन नारायण याकडील महिमंडण या किल्यावरील सोने तांबे, पितळ वगैरे दागिने व वस्तूंच्या मोजदादीची, २ र. वल, सु. १२१५/१२ फेब्रु. १८१५ (१६१३-१६१४); किल्ले संतोषगड येथील जकीरा मोजदादीची, १३ मोहरम, सु. १२१६/१५ डिसे. १८१५ (१६३०-१६३१); मौजे देवळाली येथे अहमदनगर येथून येणाऱ्या ऐवजाची, सु. १२१८/इ. स. १८१७-१८ (१६३३); मौजे पांगरे बुा येथील खोतीबाबत सखो रामचंद यांनी केलेल्या तक्रारीवरील निर्णयाची (१६६८); निंबाजी जागोजी राऊत याची जांब येथील जागेबाबत पाटलांविरुद्ध केलेल्या तक्रारीची, (१६६९); खेमचंद वाणी याच्या वस्तूंची आलेली रक्कम पोत्यास जमा करण्याबाबतची, २५ रमजान, १२१५/१० सप्टें. १८१४ (१६९८).

रुमाल क्र. ४ पुडके क्र. १-३ पुडके क्र. १
का. सं. १४६(१७१९-१८६४) सु. स. ११३९-१२१६
इ. स. १७३८ – १८१५

तैनात जाबता :

हरि त्रिंबक भावे यांच्या पोतनीसी दप्तराकडील नेमणुकीचा, सु. ११९८/इ. स. १७९७-९८ (१८०८).

दस्तक :

नाना फडणीस यांजकडील घोडी व उंट नाशिक येथून पुण्यास रवाना करण्यासाठी रहदारीचे, २२ मोहरम,सु. ११६५/२२ जुलै १७६४ (१७८२).

पत्रे :

**आबाजी—बगाजी आन्या** : मोरो हरी, भिवराव पानशे यांच्या हरवलेल्या घोडीचा शोध करण्यास साहित्याची जरूरी, (१७४५).

**काशी —रघुनाथ—पंतप्रधान** : वोरली येथील रामभट कर्वे यांच्या विहिरीचा उपसा आज्ञेनुसार करीत असल्याचे निवेदन, (१७२४)

**पत्रे--चालू :**

**केशव जोशी--पंतप्रधान** (बाळाजी बाजीराव) : भोंद जोशी यांजकडून मिळालेल्या ऐवजाची पोच, कार्तिक शु. ७, श. १६६४/ २४ ऑक्टो, १७४२ (**१७२२**).

**गोपाळराव घोडदेव--गोविंदपंत तात्या** : ज्याबितजंगाचे वेळीं लोहगाव येथील बाबतीचा येणे असलेला ऐवज हस्तगत करून देण्याची विनंती, (**१७३६**).

**गोविंदराव आपटे --कुशाबा चोळकर** : गंगाधरपंत कारलेकर यांजकडून पारचोल येथील वहिवाट खर्चाची तपशीलवार मागणी (१७४२).

**गोविंदराव भगवंत--भगवंतपंत** : यशवंतराव जाधव यांजकडे देऊळगाव येथील कुरण पूर्ववत देण्याची विनंती, १९ जिलकाद, सु. ११९०/११ ऑगस्ट १७८९ (**१७४७**); **गोविंदपंत तात्या** : यशवंतराव जाधव यांचे देऊळगांव घाट येथील कुरणास सेडोलकर यांजकडून होणाऱ्या उपद्रवाचा बंदोबस्त करण्याची विनंती, (१७४८).

**चिमणाजी बल्लाळ--नाना** : शंकराजी वीर व नागोजी वीर यांस ऐवज दिल्याबाबत, १७ सफर, सु. ११३९/२६ मे १७३८ (**१७२७**) : सुलतानजी व वाजोजी घाटगे यास ऐवज देण्याबद्दल सूचना, १५ सफर, सु. ११३९/१३ मे १७३९ (१७२८); निंबाजी कोंडे यास द्यावयाचा ऐवज, २१ सफर, सु. ११३९/ १९ मे १७३९ (**१७२९**); पर्वतराव निंबाजी कोकरे, गोविंद कोठावला, गुणाजी नलगे व सिदोजी गुजर यांना ऐवज देण्याविषयी, ५ सफर, सु. ११३८/१४ मे १७३८ (१७३०); ११ सफर, सु. ११३८/२० मे १७३८ (१७३१); १३ सफर, सु. ११३८/ २२ मे १७३८ (**१७३२**); ११ सफर, सु. ११३८/ २० मे १७३८ (**१७३३**).

**जानोजी कदम--पंतप्रधान** : कुशल वर्तमान कळवित जाणे म्हणून विनंती, (**१७३५**).

**जिवाजी आनंदराव--संभाजी केदार** : बोलीचाली केलेली बाई तांबोली याची बायको नसून बटीक होती म्हणून त्याबद्दल निर्धास्ती, १९ सवाल, सु. १२१७/१२ सप्टें १८१६ (१७५०).

**जिवाजी गणेश--पंतप्रधान** : भीवबाईस दरसाल पाठवित असलेल्या गल्याचा तपशील, (**१७३४**).

**दिनकर अनंत--पंतप्रधान** (माधवराव नारायण) : चांदवड येथील टांकसाळ आज्ञेनुसार बंद, २७ रजब, सु. ११८१/३० जुलै १७८० (**१७२१**).

**दीवाण-- पेटरी मोकदम** : पोताकडे ऐवजाची जमा, ९ रमजान, सु. ११७९/९ ऑक्टो. १७७८ (१८१२); २१ रमजान, सु. ११७९/१३ ऑक्टो. १७७८ (१८१५); परली, **डिंगवले व खडगाव मोकेदम** : १० रमजान, सु. ११७९/२ ऑक्टो. १७७८ (**१८१४**); २१ रमजान, सु. ११७९/ १३ ऑक्टो. १७७८ (**१८१६**); ९ रमजान, सु. ११७९/१ ऑक्टो १७७८ (१८१७); २८ रमजान, सु. ११७९/२० ऑक्टो १७७८ (१८१८); -- **निगडचाल, आबले, बोरणे, आबाळ, केलवली व कुरुलतिजाई येथील मोकदमांना** : गांवाचा वसूल पोताकडे जमा ९ सवाल, सु. ११७९/३० ऑक्टो. १७७८ (१८१९-१८२५) -- **संतु धीवारी** : तूप व लोण्याची जमा, २९ रजब, सु. ११७९/ १४ ऑगस्ट १७७८ (१८१०); (१८११); (१८१३).

**नारो आप्पाजी--मोरोपंत** : हरभट परांजपे व नरसीभट बापट यांच्या उपाध्येपणाचे कजियाबाबत मनसुब्या करितां बापट यांची रवानगी, (**१७४१**).

**पत्रे--चालू** :

**फत्तेसिंग भोसले--बाळाजी पंडित प्रधान** : थेऊर येथील-पाटीलकीबाबत चतुर्भुजपंत व हरकी कुंजरीण यांना ताकीद करून हुजऱ्याबरोबर पाठविण्याची विनंती, इ. स. १७४०-६१ (**१७९७**).

**मलोजी जाधवराव--गोविंदपंत तात्या** : कोपरगावी चाकरीस असलेल्या पथकाचा बंदोबस्त, (**१७३७**).

**महिपतराव कवडे--आप्पासाहेब** : कोकणात जाण्यासाठी कोठीचे दस्तक असतांना खंडाळेकर व खोपवलीकर यांजकडून होणाऱ्या अडवणुकीबाबत ताकीद पत्र देण्याची विनंती (**१७१९**).

**रामचंद्र शिवाजी--पंतप्रधान** : म्हालोजी नाईक व राघोजी नाईक निंबाळकर यांना आहीरवाडी इनाम, (१७२५),

### फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली

**गंगाधर गणेश सरदेशमुख--** ( -- ) : मुलाचे मुंजीसाठी साहित्य देण्याची आज्ञा करावी म्हणून विनंती, ११ सफर, वैशाख अधिक, आर्वा, सु. ११७४/२३ एप्रिल १७७४ (१७७४).

**गंगाधर भास्कर--**( -- ) : जेजुरीचे यात्रेस जाण्यासाठी ऐवजाची मागणी, (**१७६६**).

**चितो कान्हो--**( -- ) : पाडळी गावच्या धान्यासंबंधीचे कागदपत्र शोधण्यासाठी आलेल्या कंठापुरचे पाटीलास तूर्त काम तहकूब करून रजा देण्याची विनंती, साताऱ्याचे वरातदार कोठी व किल्ला गेल्याविषयी हैराण, ७ सफर, अधिक, वैशाख, आर्वा, सु. ११७४/१९ एप्रिल १७७४ (**१७५३**).

**जनार्दन आप्पाजी--**( -- ) : भापकर व वारवकर यांच्या लोणी येथील पाटीलकीच्या मनसुबीयाचे कामकाज नारो आप्पाजी व नारो बाबाजी यांच्याकडे सुपूर्द, (१७४३).

**बाळाजी राम लेले--**( -- ) : मोरोपंत यास ताकीद करून चिमणाजी माणकेश्वर यांस सावंतखेडे हा गाव देत असल्याची हमी, ३० र. वल, जेष्ठ, शु. २, सु. ११४३/ १४ मे १७४३ (१७४०).

**लक्ष्मण बाबाजी--**( -- ) : बहिरोपंत व राघोपंत देशपांडे यांच्यातील रुमालांचे कजियाबाबत, (१७५२).

**हरि बल्लाळ--**( -- ) : संक्रमणाचा तिळगुळ पोहोचल्याबाबत, (१७७७).

### (फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली)

( -- ) **अवधुतराव रघुनाथ** : विठ्ठल नारायण बाखरे यांचे घराचे कर्ज फेडण्यास सांगितले असता उलट त्यास बाजार भरविण्यासंबंधांत होणारा उपद्रव बंद करावा म्हणून ताकीद, १५ मोहरम, आषाढ, खमस, सु. ११६५/१५ जुलै १७६४ (१७९५).

( -- ) **कृष्णाजी बल्लाळ** : बालमगीर वगैरे गोसावी यांस उंट खरेदीसाठी ऐवजाची वरात, १ सफर, सु. ११७४/ १३ एप्रिल १७७४ (**१७७५**).

( -- ) -- **गणाजी चंदररावकर** : तिल्हेरे गांवचा मक्ता दिल्यामुळे गावची आबादानी करण्यासंबंधी, सु. ११७९/इ. स. १७७८-७९ (१७५५-१७५६).

( -- ) --**गोविंद विष्णु** : अली येरुणकर याने कर्ज घेतले म्हणून त्याचा भाऊ महंमदजी येरुणकर याचे बैल जबरदस्तीने नेले ते परत करण्याविषयी, (**१७९१**).

(--) -- **चिमाजीपंत आप्पा** : घोड्यांचे दाणावैरणीसाठीं व इतर खर्चासाठी जादा ऐवजाची मागणी, इ. स. १७२०-४० (**१७२०**).

(--) -- **जिवाजी जयराम** : जानराव घाटगे यांची कुटुंबासहीत महीम येथे रहाण्याची सुखसोय करून देण्याची ताकीद, १६ सफर, श्रावण, खमस, सु. ११६५/१५ ऑगस्ट १७६४ (१८३२).

(--) - **त्रिंबक गोसावी** : हैबतराव मोहीते यास रोजमुरा देण्याबद्दल वरात, सु. १२००/इ. स. १७९९-१८०० (१७५९).

(--) -- **नानासाहेब** (बाळाजी बाजीराव) : थैल्या व खत रवाना इ. स. १७३६-६१ (१७२६).

(--) -- **नारो शिवराम** : कृष्णाजी दाभाडे आजारी असल्याने त्याजवर केलेली लग्नपट्टीची वरात तहकूब, २९ सफर, सु. ११९९/१२ ऑगस्ट १७९८ (१७६१); उंटासाठी वैरणीची मागणी, २ साबान, सु. ११९२/२६ मार्च १७९२ (१८२७).

(--) - **पंतराजाज्ञा**-(भवानी शंकर हैबतराव) : निंबाजी नाईक याचे जथ्यास द्यावयाच्या ऐवजाची वरात, सु. ११९५/ इ. स. १७९४-९५ (१७४४).

(--) - **बाळाजी जनार्दन** : संताजी काळे यांस खर्चासाठी द्यावयाचा ऐवज, १ सफर, सु. ११७०/३ जून १७६९ (१७४९); दीपसिंगासह लष्करात रवानगी व ठाणे बारागाव नांदूर येथे पागेच्या सर्व घोड्यांची मागणी, (१७५१).

(--) - **बाळाजी रघुनाथ** : बाजीराव आप्पाजी यास बेगमीसाठी ऐवजाची वरात, १६ सवाल, सु. ११७४/३१ डिसे. १७७३ (१७६७).

(--) - **भिकाजी विश्वनाथ** : आप्पाजी शितोळे याने खरेदी केलेल्या घोडीस जकात माफ, १५ जिल्हेज, सु. ११७९/४ जाने. १७७९ (१७५४).

(--) - **मोरोबा देव** : जासुद जथ्यास द्यावयाच्या रोजमुऱ्याच्या ऐवजाची वरात, (१८०३).

(--) - **यादवराव रघुनाथ** : हुजूर पागेची, बेगमीची गला खरेदीसाठी घाटपांडेपणांतील द्यावयाचा ऐवज, १० मोहरम, सु. ११७४/ २३ मार्च १७७४ (१७६९).

(--) - **रखमाजी खिजमतगार** : दीनारा येथील मामलत विठ्ठल केशव याचे स्वाधीन करून हुजूर तलब, २६ र. बल, सु. ११६९/ १० ऑगस्ट १७६८ (१७६२-१७६३); केवड्याचे फुलांची पोच, लोकांच्या तलबेबाबतचा ऐवज विठ्ठल केशव यांजकडून घेण्याची सूचना, ३० र. वल, सु. ११६९/ १४ ऑगस्ट १७६८ (१७६५).

(--) - **रघुनाथ बाबा*** : बालमगीर वगैरे गोसावी यांस उंटाचे खरेदीबद्दल रदकर्जाचे ऐवजाची वरात, १ सफर, सु. ११७४/ १३ एप्रिल १७७४ (१७६०).

(--) - **वामनाजी गोविंद** : मामलतीचे ऐवजातून खासगत खर्चास द्यावयाच्या ऐवजाची वरात, सु. १२१६/इ. स. १८१५-१६ (१७५७); २१ र. खर, सु. १२१५/२ एप्रिल १८१५ (१८२८-१८३०).

(--) - **वाघोजी जगजीवन, आनंदराव, खंडेराव व तान्हाजी शिर्के** : लग्नपट्टीच्या ऐवजातून भिकाजी महादेव जोशी यास द्यावयाच्या ऐवजाची वरात, सु. १२००/ इ. स. १७९९-१८०० (१८३३).

(--) - **विसाजी केशव** : रामचंद्र केळकर याचा ऐवज मनुबाईस देण्याबद्दल बापट यास ताकीद, १० मोहरम, सु. ११६५/१० जुलै १७६४ (१७९९).

(--) - **स्वामी*** : कारभारी मंडळी पाठवण्याचा बेत पुढे ढकलल्याचे रामाजी भुजंग याजकडे निवेदन, (१७२३).

### प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली

विज्यापूर प्रांतातील सावोत्र्याच्या मामलतीबद्दल करार केलेले पैसे देण्याबद्दल उदाजी चव्हाण यांस ताकीद द्यावी म्हणून आज्ञा, (१७३८); फौजेच्या कीर्दी व एकंदर पटाबाबत, (१७३९); लष्करातून भालदार पाठवून पालखीची मागणी, (१७४६); दत्तराम मोतीचंद याचे हुंडीबाबत, राधाबाईचा गर्भदान समारंभ, (१७५८); हरजी नाईक जासुदांकडून गाईसाठी गवताची मागणी, २२ सफर, अधिक वैशाख, आर्बा, सु. ११७४/ ४ मे १७७४ (१७६८); हेलकर्णीना खण देण्यास तुटवडा, (१७७०); कलबसीकर यांनी पूर्ववत शाकभाजी देण्याबद्दल लक्ष्मण विश्वनाथ वाहालकर यांची मागणी, १६ जिल्हेज, चैत्र, इहिदे सु. ११७१/ २ एप्रिल १७७१ (१७७९); जवाहिरखान्यातून येकबेर्जी कारकुनास द्यावयाचा रोजमुरा. २५ साबान, सु. ११९६/६ मार्च १७९६ (१७८३); चंद्रावरच्या राज्यात फुलचेडी मठाचे कर्जफेडीबाबत ताकीद देण्याबद्दल प्रतापसिंग महाराजांस विनंती करण्याविषयी, (१७९२); शंकरभट रामकृष्ण क्षेमकल्याण यांस जमीन इनाम, ७ साबान, सु. ११८६/१५ जून १७८५ (१७९४); खंडेराव जाधव भुईंजकर यांजकडून बाजी गोविंद याने घेतलेल्या कर्जाची वसुली करण्याचा मार्ग, १४ मोहरम, सु. ११६५/१४ जुलै १७६४ (१७९६); सर्वोत्तम शंकर याच्या सरसुभ्याचे फडणिशीवर त्रिंबकराव दिनकर याची नेमणूक, ७ साबान, सु. ११८६/१५ जून १७८५ (१७९८); अमृतराव नारायण याजकडे आंबी व खडकी येथील कमाविशी, सु. १२०९/ इ. स. १८०८-१८०९ (१८००); नवजी सेगर याजकडे कुदरा बुा व खुर्द येथील जहागिरीचा अंमल, संवत् १८२६/इ. स. १७६९/७० (१८०२); बाळाजी गणेश यांचे उत्तरकार्यासाठी खर्चास ऐवजाची मागणी, १० सफर, पौष, सु. ११८५/२३ डिसे. १७८४ (१८०९); गंगाधर विश्वनाथ याजकडे परगणे पाटण श्री केसोरायाचे येथील मामलत इस्ताव्याने करार केली असून त्या महालाचा राखावयाचा बंदोबस्त, (१८२६); किल्ले माहुली येथील जमाबंदीने आकारासंबंधीचा ठराव, ३० जिलकाद, सु. ११७४/१२ फेब्रु. १७७४ (१८३१); कान्होजी मोरे याच्या रोजमुऱ्याचा ऐवज देण्याची तरतूद, सु. ११९८/ इ. स. १७९७-९८ (१८३४); नेहर परगण्याच्या झडतीची तपासणी, सु. ११९८ इ. स. १७९७-९८ (१८४३), सदाशिव गोविंद दिवेकर यांजकडे नेहर परगण्याचा मक्ता, सु. १२०६/ इ. स. १८०५-१८०६ (१८४४); धोंडो कृष्ण सोवनी यांच्या मांडवी व रजदीप येथील शेताचे जप्तीसंबंधी, सु. १२०३/इ. स. १८०२-१८०३ (१८४५); सखारामपंत बापू प्रतापगडी गेले असता जयरामपंत याजकडून स्वारास कडवा, २० ज. खर, सु. ११८२/२ जून १७८२ (१८६२).

**याद्या** :

जासूद जथ्यास दिलेल्या रोजमुऱ्याची, १४ रमजान, सु. १२००/९ जाने. १८०० (१७६४); दप्तरातील कारकुनांची, (१७८०); मोईन द्यावयाच्या कारकुनांची (१७८१); कोहजच्या मामलतीबद्दल भिकाजी गोविंद यांजकडून व फडणिशीबद्दल जगन्नाथ महादेव फडणीस यांच्या सरकारात आलेल्या पत्रातील मजकुराची, (१७८५); धोंडो खंडाजी शिलेदार यांस खर्चास दिलेल्या ऐवजाची, २३ रजब, सु. १२००/२१ डिसे. १७९९ (१७८६); चिंतो लक्ष्मण यांस दिलेल्या रोजमुऱ्याची, १४ साबान, सु. १२००/१० जाने. १८०० (१७८७); तातोबाजी याने परगणे पाटण येथील मामलतीसंबंधी पत्रे पाठविलेल्या लोकांची, ७ मोहरम, चैत्र, आर्बा, सु. ११७४/ २० मार्च १७७४ (१७८८); बीड व पाथरी येथील स्वराज्याचे मामलतीविषयी पाठविलेल्या ताकीदपत्रांची, १२ सफर, अधिक वैशाख, आर्बा, सु. ११७४/ २४ एप्रिल १७७४ (१७८९); कारकुनाच्या घरच्या लग्नमुंजीसाठी द्यावयाच्या ऐवजाची, २५ सवाल, सु.११९५/१५ मे १७९५ (१७९०); बाळूमिया जंजिरकर यांच्या कुटुंबियांस दिलेल्या बेगमीची, सु. ११८६/इ. स. १७८५-८६ (१७९३); सुराले गावी दंगा केल्यामुळे कैद केलेल्या मीर अटल याच्या पाटीलकीची जप्ती करण्याबद्दल दिलेल्या ताकीदपत्रांची, सु. ११७४/ इ. स. १७७३-७४ (१८०१); सिंहगडकऱ्यांस द्यावयाच्या रोजमुऱ्याची, ११ रमजान, सु. १२००/३ फेब्रु. १८०० (१८०४);

पत्रे चालू

गोविंद गणेश बिवलकर यांजकडे दिलेल्या वसईकडील ऐवजाची ज. वल, सु. १८८६/ मार्च १७८६ (१८०५); दप्तराकडील नेमणूक केलेल्या आसामींची, सु. ११९८/इ. स. १७९७-९८ (१८०७); राघोजी मान्या याचे बैलांसाठी दिलेल्या कुडेश्वर येथील कुरणास सुटीबाबत, सु. ११८६/ इ. स. १७८५-८६ (१८३५) विठोजी भगतकडे नवलू चव्हाण याजकडून मिळालेल्या ऐवजाची (१८३६); वयासगाव व बाबगांव येथील घरे व नांगर यांच्या पहाणी खर्चाची, सु. १२१७/इ. स. १८१६-१७ (१८३७-१८३८); दीवारीमाण येथील गाड्यांच्या खेपांची सु. १२०३/इ. स. १८०२-१८०३ (१८३९); चिमाजी मेस्त्री याजकडील माणिकपुरा येथील लागवडीसंबंधी व मख्त्याविषयी कलमांची, सु. १२०८/ इ. स. १८०७-१८०८ (१८४०-१८४१); देवदले येथील हिशेबाची, सु. १२१४/इ.स. १८१३-१४ (१८४२); रास्ते यांजकडील पाडली येथील महालातील रयतेस दिलेल्या ऐवजाची, सु. १२१५/इ. स. १८१४-१५ (१८४६-१८४७); मामलेदारांकडून यावयाच्या स्मरणार्थ कागदपत्रांची (१८४८); साकेली येथील वसुलाची. सु. ११८५/इ. स. १७८४-८५ (१८४९); खर्चास ऐवज दिलेल्या लोकांची, (१८५०); कटलरी वस्तूंची, (१८५३); वृत्तीसंबंधीच्या पत्रांची, (१८५४); कर्जदारांची, (१८५५); ऐवज घेणे असलेल्या लोकांची, (१८५६); विठोजी भगत याजकडे राणजी चव्हाण याने दिलेल्या वसुलाची, (१८५७); पारोळे येथील खंडाची सु. ११८६/इ. स. १७८५-८६ (१८५९); आडकरे येथील गुन्हेगारांचेसंबंधीची, सु. ११८६/इ. स. १७८५-८६ (१८५८); मेढे येथील गुन्हेगारीच्या खंडाच्या वसुलाची, सु. ११८६/इ. स. १७८५-८६ (१८६०); खंड पावलेल्या लोकांची, (१८६१); तिजाईकुरूल येथील हिशेबाची, सु. ११७९/ इ. स. १७७८/७९ (१८६३); कडको बाबुराव याजकडील येणे असलेल्या ऐवजाची, सु. १२१२/इ. स. १८११-१२ (१८६४).

रसानगी याद्या :

येकराऊत मांग याची वायको व म्हशी परत देण्याबद्दल जान्या मल्हार यांस पत्र देण्यासंबंधी, ३ जिलकाद, सु. ११७८/४ डिसे. १७७७ (१७८४); मुधोजी भोसले यांनी खरेदी केलेल्या घोड्यांना जकात माफ करण्याबद्दल कमाविसदारांस सनद देण्यासंबंधी, (१८०६); नाईकजी भोईटे याजकडे दिलेल्या वाठार गावास उपद्रव न देण्याबद्दल द्यावयाच्या ताकीदपत्रांची, (१८५१); राहूरकर जोशी यांच्या पूर्ववत वहिवाटीसंबंधी, (१८५२).

वराता :

गंगापूरास रवाना केलेल्या पथकाचा रोजमुरा देण्यासाठीं आबाजी नाईक काबरस याजवर, १३ सफर, सु. ११७४/ २५ एप्रिल १७७४ (१७७१); सखाराम हरि यांस ऐवज देण्यासाठी बाळाजी रघुनाथ याजवर, ३ सवाल, सु. ११७२/ ९ जाने. १७७२ (१७७२); द्वारकोजी निंबाळकर यांस ऐवज देण्यासाठी बाळाजी रघुनाथ याजवर, ३० रमजान, सु. ११७४/ १५ डिसें. १७७३ (१७७३); बालमगीर वगैरे गोसावी यांस उंट खरेदीसाठीं त्रिंबक विनायक व नरहर लक्ष्मण याजवर, १ सफर, सु. ११७४/ १३ एप्रिल १७७४ (१७७६); (१७७८).

**पुडके क्र. २ का. सं. १३० (१८६५-१९९४)**

**सु. स. ११४१-१२१९ इ. स. १७४०-१८१८**

आज्ञापत्र :

**पंतप्रधान** ( बाजीराव रघुनाथ )— वाघोलीकर-मोकदम : मकाजी व सुभानजी मोहिते यांच्या जमिनीची विठ्ठल नरसिंह याजकडे जातीचे खर्चासाठी नेमणूक, २७ मोहरम, सु. १२०८/ २५ मार्च १८०८ (१८८६).

टीप*—मूळ नांवाची निश्चिती होत नाही.

पत्रे चालू

**आकोलेकर मोकदम—देवळेकर भिकाजी पाटील** सरकारांतून निवाडा करण्याचा विचार नसल्याचा खुलासा, ६- सवाल, फ. १२१९/१५ नोव्हे. १८०९ (१८९८).

**आनंदराव भास्कर—विठ्ठल भीमाजी** : हुंड्याच्या ऐवजाबद्दल व महालांच्या वसुलीबद्दल निवेदन, (१९२५).

**आण्णाजी रामचंद्र —नाना*** : ऐवजाबद्दल विनंती, (१९७८) (फाटके).

**आप्पाजी चिमणाजी—मोरोपंत दाजी** : लक्ष्मण जोशी बोरगांवकर याच्या वतनाच्या मोकळिकेबद्दल विनंती, (१९३८).

**आप्पाजी यशवंत कोकजे—मोरोपंत** : मोरोपंताचा यजमानावर रुसवा, तात्याचा आजार व आदोबा याचे लग्न यासंबंधी विनंती, (१९०८-१९१०) (अपूर्ण).

**आबाजी मराळ पुरंदरे—गणपतराव पुरंदरे** : जिनसांची निकड व ऐवज सत्वर घेऊन येण्याबद्दल सूचना, (१९४६).

**कृष्णाजी महिपतराव—विसाजीपंत** : मागितलेल्या जनावरांपैकी बालवाडी येथील निवडलेल्या गाईसंबंधी निवेदन (१९४९).

**केशव—गोविंदपंत** : फेटे, पागोटी व अबदागिरीच्या सामानाची मागणी, (१९७२).

**खंडेराव नरहर—गोविंदपंत** – : शेवगाव परगण्याचा करावयाचा बंदोबस्त व रदकर्जी ऐवज देण्याची विनंती, (१९५३).

**खंडे बाबुराव—गोविंदपंत*** – : महिपतराव प्रल्हाद याने सरकारात गैरवाका समजावून सरदेशमुखी ऐवजावर नाहक केलेल्या वरातेसंबंधी बंदोबस्त करण्याची विनंती, (१९६४).

**गणेश जिवाजी—त्रिंबकजी डेंगळे** : चिमलगे, समदापूर, हालसंगी येथील ऐवजाच्या हुंड्या रवाना व तेथील लावणीबद्दल निवेदन, इ. स. १८००-१८१५ (१९०२).

**गंगाबाई—दुर्गोजी शिंदे** : लक्ष्मण विश्वनाथ याची मुल्हेर तालुक्यात माहुली किल्यावरील लोकांसह नेमणूक, ५ र. वल, सु. ११७४/१७ मे १७७४ (१८६९) ;—**रामराव त्रिंबक**: लक्ष्मण विश्वनाथ याजकडे सत्वर माणसे रवाना करण्याची आज्ञा, ५ र. वल, सु. ११७४/१७ मे १७७४ (१८७०); —**रामचंद्र खंडेराव** : महाडकरी व रायगडकरी लोक जनार्दन राम याजकडे गंगापूर येथे पाठविण्याची आज्ञा, २७ सफर, सु. ११७४/९ मे १७७४ (१८७१) ; लक्ष्मण विश्वनाथ याजकडे मुल्हेरीस लोक रवाना करण्याची आज्ञा, ५ र. वल, सु. ११७४/१७ मे १७७४ (१८७७); —**वामनाजी हरि** : लक्ष्मण विश्वनाथ याजकडे कल्याण पैकीं माणसे वाना करण्याची आज्ञा, ५ र. वल, सु. ११७४/१७ मे १७७४ (१८७२) ; जनार्दनराम यांजकडे कल्याणपैकी माणसे रवाना करण्याची आज्ञा, २७ सफर, सु. ११७४/९ मे १७७४ (१८७६); —**भिकाजी गोविंद** : कोहजकरी लोक जनार्दन राम याजकडे गंगापूर येथे रवाना करण्याची आज्ञा, २७ सफर, सु. ११७४/ ९ मे १७७४ (१८७३) व लक्ष्मण विश्वनाथ याजकडे मुल्हेरी येथे रवाना करण्याची आज्ञा, ५ र. वल, सु. ११७४/१७ मे १७७४ (१८७५) ; —**बाळकृष्ण केशव** : पटा तालुक्यापैकी हशम लोक लक्ष्मण विश्वनाथ याजकडे मुल्हेरी येथे पाठविणे, ५ र. वल, सु. ११७४/१७ मे १७७४ (१८७४) व जनार्दन राम याजकडे गंगापूर येथे हशम पाठविण्यांची आज्ञा, २७ सफर, सु. ११७४/९ मे १७७४ (१८८१) ; —**आनंदराव राम** : साष्टीपैकी महाडकरी व रायगडकरी लोक लक्ष्मण विश्वनाथ याजकडे मुल्हेरी येथे, ५ र. वल, सु. ११७४/१७ मे १७७४ (१८७८) व जनार्दन राम याजकडे गंगापूर येथे रवाना करण्याची आज्ञा, २७ सफर सु. ११७४-९ मे १७७४ (१८८५) ;

पत्रे—चालू :

कोन्हेरपंत याजकडून राघोपंत याजकडे येणे असलेल्या ऐवजाबद्दल बापू फाळके याची रदबदली, इ. स. १७९६–१८१८ (७००२) ; मीर मोहिद्दीन निरखी याची नगर येथे करावयाची रवानगी, शेटे, महाजन, जोशी याची पंचाईत, पिंपळगांव व उज्जैनची करावयाची मोकळीक वगैरे कलमांचा तपशील, इ. स. १७९६–१८१८ (७००३) ; इंग्रजांच्या कैदेतून पळून जाऊन बंड करीत असलेल्या त्रिंबकजी डेंगळे यास ऐवजाची मदत करणाऱ्या पंढरपूरमधील सावकार, बडवे वगैरेंच्या चौकशीसाठीं जामीन कतबे व मुचलके याची मागणी, इ. स. १८१५–१८१८ (७००४) ; इनायतखान व करीमखान यांचे कर्ज घेऊन दरबारखर्चासह जमीनदारांची घेतलेली खंडणी हिश्याप्रमाणे जमीनदारांकडून सावकारांची करावयाची कर्जफेड, इ. स. १७९६–१८१८ (७००५) ; मोरो गोपाळ यांनी मामलत चढ करून करार केल्याबद्दल व त्यांत नारो कोन्हेर यास सहभागी करीत असल्याबद्दल बातमी व मामलतीबद्दल विनंती, इ. स. १७७४–९५ (७००६) ; कल्याण येथील बाकीजाबता, व पौडखोरे येथील अजमास व मुकुंद दामले याच्या कावनई येथील हशमनिशीची सनद यांची मागणी, ८ रमजान, सु. १२०७/१९ नोव्हेंबर १८०६ (७००७) ; श्रीमंत स्वामींचा मुक्काम फराबागेवर असतांना झालेल्या खर्चाचा ताळेबंद वेगळा करून त्यावर मखलाशी करून घेण्याच्या सूचनेबद्दल खुलासा, इ. स. १७७४–९५ (७००८) ; कागदांच्या गड्या व वाळू रवाना, (७००९) ; राजपुरीपैकीच्या हुंडयाची पोच, खानविलकर व शिर्के यांच्या गावांच्या करावयाच्या जप्त्या, देवल दिवाणजीबद्दल विद्याधर जोशी यास पत्र रवाना, इ. स. १७९६–१८१८ (७०१०–७०११) ; माधवराव विचारे याच्या वसई व देवगड येथील शेतसनदांबद्दल चौकशी, इ. स. १७७४–९५ (७०१२) ; अंजनवेल येथील माळ्याच्या बायकोस मारल्याबद्दल बापूजी नवले याच्या शिक्षेबद्दल सूचना, (७०१३) ; ठरलेल्या दिवशी ऐवज न देण्याच्या कारणाचा खुलासा, श्रावण व. १३, सु. ११९८/२० ऑगस्ट १७९७ (७०१५) ; डेंगळे याच्या चौकशीबद्दल इंग्रजांकडील कर्नल थॉमसन याने कारकुनाबरोबर पाठविलेले पत्र, इ. स. १७९६–१८१८ (७०१६) ; पंढरपूर येथील सरदेशमुखीचा अंमल मंत्रीकडील कारकुनाकडे देण्याची सूचना, इ. स. १७९६–१८१८ (७०१७) ; बापूजीपंत भोसले याच्या वाड्याशेजारील बेवारशी जागेवर मालकी सांगणारे ताटे, थिटे व आराध्ये यांना जाबसालासाठीं पुण्याला पाठविण्याची सूचना, इ स. १७९६–१८१८ (७०१८) (७०१९) (मसुदा) ; रामदिन याचा बांसवाडा येथे ज्यानबत्तीस पेंढारी व आण्णा बक्षी यांचा तलेनी येथे, बापू शिंदे याचा प्रतापगड-देवळे येथे मुक्काम, इ. स. १७९६–१८१८ (७०२०) ; यादवराव मोरेश्वर याच्या गुमास्त्याकडून गांवास होणाऱ्या चाऱ्याच्या उपद्रवाबद्दल राऊत व वसुली याबद्दल यादवराव मोरेश्वर वगैरेंना द्यावयाची पत्रे इ. स. १७६१–७२ (७०२३) ; मुल्हेर येथील अजमास तयार करण्यासाठी बाजीपंत भावे व कृष्णाजीपंत रहाळकर यांना पाठवावयाची पत्रे, इ. स. १७७४–९५ (७०२४) ; गोविंद नाईक याच्या तैनातजाबत्याबद्दल रामाजीपंत घाटगे याने पुणे सरकारचा सांगितलेला निरोप, इ. स. १७९६–१८१८ (७०२५); भगवंत याच्या ज्ञातीसंबंधीच्या तंट्याचा निवाडा करण्याबद्दल व नथोपंत गुजराथी याजकडून दरबारखर्चाची कबुली करून घेण्याबद्दल व बडेकरकडील वतनाच्या जप्तीबद्दल सूचना, २६ र. वल, सु. ११६१/५ नोव्हें. १७६० (७०२७) ; मैराळ भगवंत कानलीकर याने बार्शी-पानगांव येथील मामलतीचा रसदभरणा राजाराम देगांवकर याजकडे केला असून देगांवकर यास बाबा उत्पात जामीन असल्यामुळे उत्पात यास ऐवजाचा तगादा करण्याची सूचना (७०३०) ; बाबासाहेब पुण्याला जाणार असल्याबद्दल निवेदन व कारकून पाठविण्याबद्दल विनंती (७०३१) ; नागपूरकर रघोजी भोसले पुण्यास आले असता भेटीप्रसंगी पागेकडील घोडा दिला असल्यास कळविण्याची विनंती, इ. स. १७९५ (७०३२) ; प्रांत कऱ्हाड येथील देशमुखी व कोले-मरळीच्या चौथाई या भगवंत शिवराम याजकडील मामलतीपैकी संताजी जासूद यास मिळालेल्या रोजमुऱ्याची हिशेबासाठीं येण्याची सूचना (७०३५) ; विजयदुर्ग येथील मामलेदार वगैरेस रवानगीसमयी अरबांच्या पावलेल्या ऐवजाच्या हिशेबाची मागणी, इ. स. १७६१–७२ (७०३७) ; बाबतीवाल्याकडील मामलतीबद्दल निवेदन (७०५६–७०५७) (अपूर्ण) ; हरि गोविंद याच्या कल्याण, भिवंडी येथील कारकुनीच्या आसामीबद्दल निवेदन (७०५८) ; कोन्हेर याजकडील ऐवजाबद्दल राघोपंतदादा याजकडे फाळके याची रदबदली, तोफखान्याकडील नवीन कामाबद्दलची अफवा, बापू साठे याची योजना वगैरे कलमांचा तपशील, १८ सवाल, सु. १२१८/१ सप्टें. १८१७ (७०६३) ; विठ्ठल, पांडुरंग व पुरुषोत्तम अनंत ताटे, बापू गोखले याजकडील कारकून व शिपाई यांच्याकडून जागेबद्दल झालेल्या उपद्रवासंबंधी निवेदन, (७१६५) ; शंकराजी व विसाजी केशव (फडके) यांच्या कारकीर्दीतील वसई येथील देशमुखी, सरदेशमुखी वगैरे अंमलाच्या हिशेबाबद्दल सूचना, इ. स. १७७४–९५ (७१७०) ; वसई, साष्टी, राजपुरी येथील फडके यांच्या कारकीर्दीतील देशमुखी वगैरे अंमलाच्या हिशेबाबद्दल सूचना, ३० ज. खर, भाद्र. खमस, सु. ११७५/७ सप्टें. १७७४ (७१७१) ; मादरणे येथील धोंडो राम याजकडील खेरीजमोकासा व मानसिंग कडू याजकडील मोकासा व कसरेच्या अंमलाची दप्तरांतील दाखल्याची व खुलदाबाद वगैरेमधील गांवचा तनखा, कमाल आकार व हाल वसूल याच्या दाखल्याची मागणी (७१७२) ; पिंपळवंडी या हुजूर पागेकडील अंमलाचा एकंदर आकार पाठविण्याची सूचना, शिवाजी गोपाळ याच्या ऐवजाबद्दल नानास विनंती करून तसलमातीत खर्ची घालावयाचा ऐवज बामुशाहिरा लिहिण्याबद्दल सूचना, इ. स. १७७४–९५ (७१७३).

**याद्या (हिशेबी)** :

पंतप्रधानांकडून लोकांना यावयाच्या ऐवजाच्या, इ. स. १७६१–७२ (७०४०) ; शिलेदार वगैरे आसामींस द्यावयाच्या ऐवजाची, इ. स. १७६१–७२ (७०४१) ; गांवगन्नाच्या वसुलीची वर्गदारी संवत १८६९/इ. स. १८१२–१३ (७०४२) ; स्मरणार्थ कलमांची (७०४३) ; भगिरथराव शिंदे, पाराशर दादाजी व हरि बाबाजी यांनी औरंगाबाद येथील घेतलेल्या घासदाणा वगैरेपैकी नबाबास परत द्यावयाच्या करार केलेल्या ऐवजाची, इ. स. १७८० (७०४४) ; ब्राम्हणांस दिलेल्या भांड्यांची नाववार (७०४५) ; द्राक्षे पाठविलेल्या लोकांची (७०४६) ; पाथरी व अष्टी येथील स्वराज्याच्या अंमलदारांची (७०४८) ; गोविंद लक्ष्मण कारकून शिलेदार यांच्या अवचितगडच्या रुजुवातीसंबंधी आलेल्या पत्रांतील मजकुराचा तपशील (७०४९).

**रवानगी याद्या** :

भगवंतराव हरकारे यास घरासंबंधी उपद्रव न देण्याबद्दल रामाजी सखदेव व केशवपंत यांना द्यावयाची ताकीदपत्रे (७०२२) ; सिंगवैकैसा येथील जहागिरी, चौथाई व सरदेशमुखी अंमलाचे इनाम पंतप्रधान यांनी रामराव नारायण यास दिले असून त्यापैकी स्वराज्य अंमल नरहर लक्ष्मण याने घेतला असतां बाबूराव रुद्र याने पुन्हा वसूल केलेला ऐवज परत देण्याबद्दल द्यावयाचे पत्र (७०२९) ; सध्याचा बादशहा व काशीचा वजीर यांच्याकडून पूर्वीच्या सनदेप्रमाणे हशमतुल्ला याची वतनपत्रे करून पाठविण्याबद्दल अंताजी माणकेश्वर यास

**रसानगी याद्या चालू :**

करावयाची आज्ञा (७०३०) ; देगाव, येकरुखे वगैरे गावांच्या आबादानीसाठी पूर्वीच्या जहागिरदाराप्रमाणे सरकारने तिजाईची

**रसानगी याद्या चालू :**

सुट देऊन ७ वर्षाच्या इस्ताव्याने वसूल घेण्याबद्दल विनंती (७०४७).

**रुमाल क्र. १५ पुडके क्र. १–४**

**पुडके क्र. १ का. सं. १८७ (७२०५–७३९१)**
**सु. स. ११५७–१२३४ इ. स. १७५६- १८३३.**

**अर्जदास्त :**

**कासीदजोडी** पाठविली आहे त्यास हुकूम करण्याबाबत सदाशिव गोविंद आठवले याचा फौबक्ष, सुभेदार जंजिरे यास (७२०६).

**अर्जी :**

दक्षिण यात्रेस जाण्याकरिता भाऊसाहेबाची परवानगी मिळालेल्या लोकांस पत्रे देण्याबाबत केशव बहिरव याची (७२०५).

**कलमबंदीची यादी :**

माजी मामलेदाराकडील तफावतीच्या ऐवजाबाबत सिद्ध करून देण्याची (७२४४–७२४५) ; कृष्णा रड्डी याजकडील इनामतीची जमीन बळवाड याजकडे चालत आल्याबद्दल, प्याद्याबाबत तक्रार, जप्त केलेली रुद्रण्णाची इनाम जमीन, जमाबंदी वगैरेबाबत (७२६४).

**चिठ्ठी :**

शिंदे, होळकर याजकडील सरंजामाचे पट पाठवून देण्याबाबत, (७२५१) : बोंबे यांच्या जमिनीचा दाखला पाठवून देण्याबाबत, इ. स. १७८० (७२५२) ; बापूजीपंत व नारो गणेश या दोघांपैकी पाहिजे तो लेखनास ठेवून घेण्याबाबत, (७२५४) ; किल्ले रामशेज येथील परशराम नारायण याचा जमेचा आवर्जा पाठविल्याबाबत, इ. स. १७८३–८४ (७२५६–७२५७) ; रद्दकर्जाबाबत दिलेला ऐवज घेऊन कबज देण्याबाबत अमरसिंग शिर्के याच्यांतर्फे निवळीच्या कमाविसदारास, सु. १२०७/ इ. स. १८०५–१८०७ (७२६७) ; धोंडभट जोग धालवलीकर याच्या ठिकाणास अडथळा करणाऱ्या महादजी अनंत काळे यांची चौकशी करण्याबाबत (७३५३) ; राजा अमरसिंगजी देव याच्या पनरी गांवावर बसविलेली चौकी उठवून कुलबाब कुलकानू हक्कासह परत करण्याबाबत (७३८५).

**जबानी :**

सप्रे यांच्या घरी घडलेल्या किरकोळ गोष्टीबाबत (७२४९).

**पट्टा :**

गिरजाबाई देशपांडे यांना पोा उकली येथील जमिनीचा पट्टा लिहून दिल्याबद्दल कंपनी सरकारकडून, २५ मे १८३३ (७२६८).

**पत्रे :**

**अण्णाजीराव शिरस्तेदार—बापूराव जिल्हेदार धामणे :** ताकीदपत्रे देऊनसुद्धा जमाबंदी ऐवजाचा वसूल भरला नाही त्याबाबत कानउघडणी (७२७९).

**अंताजी गणेश कुलकर्णी—श्रीधरपंत*** : पूर्वी पाठविलेल्या जिनसांची किंमतीसह यादी (७३८०).

**अंताजी नारायण—आप्पा*** : दादोबा याजकडील पाठविलेल्या लखोटयाची पोच देण्याबाबत (७२८५); भुडकीच्या मळ्यांतील तीन हजार देठाच्या पानांची पोच (७३०२); माहे रविलावलचा कीर्दी-जमाखर्च बाकी आकारून पाठविला आहे (७३४४).

**आप्पाजी रघुनाथ—रावजी *** : कुशल पत्रोत्तर पाठविण्याची विनंती (७३५०).

**आप्पाजी सिदराम शिंदे देसाई—मोरोपंत*** : हक्क व इनामसुद्धा हरबाजी नरसिंह मुतालिक यास निमशिरगांव येथील देसकत असल्याबाबत तेथील गावकऱ्यास ताकीदपत्र देण्याबाबत (७३०४).

**पत्रे-चालू :**

**आबाजी बाबाजी करमरकर—दाजीबा करमरकर** : हवाला घेतलेल्या ऐवजाची परतफेड करण्याबाबत (७३४५).

**आबाजी विश्वनाथ गोळे—राघोपंतदाजी** : गोपाळ व मोरोबा याजबरोबर सांगितलेले काम आपलेपणाने करण्याची विनंती (७३३४).

**उध्दव त्रिंबक—नाना*** : चांभारगोंदे येथील केशव राम याच्या मातब्बर गढीच्या बंदोबस्ताबाबत (७२७०).

**कृष्णराव साळोंखे—सिदराम पाटील** : गुंडेवाडीकर यानी हजार रुपयाची मोरोपंत यांची निशा केल्याबाबत (७२७१).

**कृष्णाजी थोरात—रामचंद्रपंत*** : वडिलांनी लष्करातून साद्यंत हकीकतीचे पत्र लिहिल्याबाबत (७३२३).

**केशव*—नाना*** : पुणे येथील कोटाच्या किल्या नारो जिवाजी याच्या स्वाधीन करण्याबाबत (७२९५).

**खंडो रघुनाथ—बाळाजीबाबा*** : आज्ञेप्रमाणे नाशिक येथे स्वामींची भेट घेतली (७३४८).

**गिरमाजी शामराव—बापूसाहेब*** : ऐवजाची तजवीज करण्याबाबत विनंती (७२७२).

**गोपाळ विठ्ठल कर्वे—विठ्ठलपंत आप्पाजी** : भटजीकडून गोष्ट होणार नाही असे वाटत असल्याबाबत (७३१६).

**गोविंदराव*—रावजी सप्रे** : लष्करचे हालचालीविषयी कळविण्याची विनंती (७३३३).

**चिंतोबा*—बापूजीपंत बापू*** : बायकोस डोळ्यावर उपचार करण्यासाठी पाठविले होते त्याबाबत लिहिण्याची विनंती (७३२९).

**जगन्नाथ संभाजी गोखले—लक्ष्मणपंत नाना पंडित** : राणद येथील ऐवज फलटण येथे पाठवून देण्याबाबत (७३४९).

**जगतसिंग रजपूत— साहेब*** : कृपाराम परदेशी याने आपली आई नेऊन बायको केली त्याबाबत तक्रार (७३३९).

**जनार्दन अनंत—येसाजीपंत दाजी*** : वसूल योग्यप्रकारे करण्याची हमी (७२७६).

**जिवाजी रघुनाथ—विठ्ठलपंत तात्या*** : कच्चे हिशेब न पाहता वसूल घ्यावा या पाटलांच्या विधानाचा इन्कार करण्याकरिता समक्ष यावे (७३४६).

**तावजी गाडे—दाजी*** : कौटुंबिक मजकूर (७३२४).

**त्रिंबक गोविंद—रामाजीपंत नाना*** : विठ्ठलपंत याजबरोबर पाठविलेला जिन्नस मिळाल्याबाबत (७२८३).

**त्रिंबकजी डेंगळे—रामचंद्र गोसावी** : मौजे पारगाव व पिंपळगाव येथील हिशेब त्वरित घेऊन येण्याबाबत (७२६०).

**देवराव गोविंद—बळवंतराव*** : यजमानसुद्धा महाराजांना भेटण्याची आज्ञा (७२८१).

**दौलती घोरपडे—मोकदम, मौजे चिंचदरे** : कराराप्रमाणे प्रापक न वागल्यास घरदार पेटवून देण्याची धमकी (७३१७).

**नथाराम जयापाल भोई—महाराज*** : मोहर्त (म्होतूर) लावलेली भागी भोईंग नीट नोंदत नसल्यामुळे योग्य तो निकाल लावण्याबाबत (७२९२).

**नरहर कृष्ण जोशी—गंगाधर नारायण जोशी** : कौटुंबिक ख्यालीखुशाली (७३५५).

पत्रे–चालू :

**नारायण*—वडील** × : कासेगावी जाण्याचा बेत तूर्त रद्द करीत असल्याबाबत (७३३१).

**नारो विश्वनाथ—अंबादास*** : योजनेप्रमाणे मुक्काम करीत घोडे व ऊंट याचेसह खेड मुक्कामी आगमन, पुढील खर्चाची तरतूद करण्याबाबत (७३४७).

**नारो हरि कमाविसदार—अंताजीपंत*** : मामलत प्रापकाच्या हाती स्वाधीन करण्याकरिता रामजी काशी याच्या चिठ्ठीची जरूरी (७३१३).

**परशराम अनंत सावरकर—विनायकपंत*** : निंबाजी जामदार यास त्वरित पाठवून देण्याबाबत (७२५८).

**मिर अब्बास अल्ली जमातदार—तात्यासाहेब*** : आज्ञेप्रमाणे तोफखान्यावर हजर झालो परंतु सनदेशिवाय चिमाप्पा रोजमुरे व खर्चास देत नाही तरी त्वरित सनद देण्याची विनंती (७२८८).

**बाजी रामचंद्र—राघोपंतदादा*** : ऐवजवसुली, कारखान्यांतील लोकांचे रोजमुरे, ऊंटांची रवानगी वगैरेबाबत (७२८६).

**बाजीराव कृष्ण—दादा** × : पांडुरंगपंत ढमढेरे यांची देवलाणे पो. नेवासे येथील जप्तीची मोकळीक करण्याबाबत (७२७३).

**बाबूराव गणेश—व्यंकट रंगा शास्त्री** : प्रापकाचे पिताजी आबाराम शास्त्री यांनी सुभाभट तैलंग यांस दिलेल्या कर्जफेडी-बाबत (७२९३)– **विठ्ठलोपाध्याय तात्या*** : 'श्री'च्या मुकुटाचा चार हजार रुपयाचा येणे ऐवज सिदो त्रिंबक यास रसद भरण्या-बाबत देऊन पावती घेणे (७२७७).

**बाळाजी बाबूराव—विष्णुपंत बाबा*** : कुशल पत्रोत्तर (७२९१).

**महादजी आप्पाजी भिडे—बापूस्वामी** × : बापुशेट खंडकर शिपी यास ऐवज दिला त्याचा निकाल करण्याबाबत (७३३०).

**मोरो बल्लाळ—त्रिंबकरावजी*** : कर्यात खेड येथील कमी जास्ती वसुलाच्या तपशिलाबाबत (७३५१).

**राघो तुकदेव—विठूपंतबाबा** : रामनवमीच्या उत्सवास येण्याची विनंती (७२७५).

**रामचंद्र माणकेश्वर—गोविंदपंततात्या*** : मालोपंत याजबरोबर कळविल्याप्रमाणे बंदोबस्त करण्याची विनंती (७३२७).

**रामाजी गुरनाथ—लक्ष्मणराव शितोळे** : दादा जोगळेकर याज-कडून घेतलेला ऐवज परत करण्याबाबत (७२९६).

**विठ्ठल गोविंद ताम्हणकर—अंताजीपंतभाऊ*** : हरभऱ्यावर कीड पडल्यामुळे व पीक थोडे आल्यामुळे भाव तेजीत (७३३६).

**वैजनाथ गोविंद—नाना** × :– मौजे खरवड येथील कमाविसदार व मोकदम यांना वसुलाबाबत ताकीदपत्र देण्याची विनंती, (७२७४).

**व्यंकटराव नाईक—रामचंद्रतात्या*** : कुशल पत्रोत्तर करण्याची विनंती (७३०१).

**शंकरभट मुळचे—नारायणरावबाबा ताम्हणे** : पांडुरंग यास (पंढरपूर येथे) अभिषेक वगैरे धार्मिक कृत्ये करण्याबाबत (७३२८).

**शंकराजी लक्ष्मण देशपांडे—रामप्पा कुलकर्णी** : रामचंद्रराव वकील याजकडे दोन फैसले दिले होते त्याच्या पुढील कारवाई-बाबत (७२७८).

**शेषो नारायण—रामचंद्रतात्या*** : तांदूळ, डाळ वगैरे जिन्नस पाठविल्याबाबत (७३०५).

पत्रे चालू :

**श्रीधरभट गर्दे—जगन्नाथपंततात्या*** : भेट घेण्याविषयी (७२८२).

**सदाशिव महादेव—रावजीपंतदादा सप्रे** : कराराप्रमाणे गणपत-राव महादेव पटवर्धन याचा ऐवज देण्याबाबत (७२८७).

**सदोबा*—बाबा चिटणीस** : सविस्तर वृत्तांत कळविण्याची विनंती (७२९९).

**सटवोजी गोरे—मोरशेटआप्पा*** : आज्ञेप्रमाणे दोन मण दाणे पाठविल्याबाबत (७३१५).

**सिवराम—आबाजीस्वामी*** : आज्ञेप्रमाणे तमाजी कानगो याची रवानगी (७२८०).

**हरि भगवंत—सदाशिवपंत*, आण्णा* व आबा*** : आसवी येथील धन्याकडे जाऊन पत्रोत्तर करण्याबाबत (७३११).

**हरि शिवराम चक्रदेव—अमृतराव शिंदे** : तिळगूळ पाठविल्या-बाबत (७२६६).

**(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली)**

**अंताजी महादेव** – (—) : गावचे हलाखीचे वर्णन व उपाय-योजना करण्याची विनंती (७३४१).

**आनंदराव राम** – (—) : रोजमुरा, ऐवज व कापड त्वरित पाठविण्याबाबत (७३६९).

**कमाविसदार हिंमत मल्हारजी होळकर** – (—) : एका दिवसात सरंजाम हवाली करण्याचा तगादा करणाऱ्या रामचंद्रपंत यास मुदतवाढीचे पत्र देण्याबाबत (७३५९).

**कृष्णाजी रंगनाथ** – (—) : येण्यास विलंब का लागला त्याचे कारण व कृपालोभ असू देण्याची विनंती (७३००).

**चिंतो त्रिंबक** – (—) : चिंतो त्रिंबक याची कुणबीण धर्माजी पंत याने ठेविली ती परत करण्यासंबंधी त्रिंबक नारायण यास पत्र देण्याबाबत, २९ रमजान, चैत्र, आर्बा, सु. ११६४/२ एप्रिल १७६४ (७२६१).

**नारो नरसिंह** – (—) : शिबंदी व ठाणे यांच्या हिशेबाकरिता पुण्यास येण्याची तयारी (७३८७); आज्ञेप्रमाणे हिंदुस्थानांत सेवा करून आल्याबद्दल, पुढील खर्चाचा बंदोबस्त करण्याबाबत (७३५७).

**पांडू*** – (—) : मौजे कागवई येथील खोती राघो रामचंद्र गोडबोले याजकडे सांगितली त्याच्या पुढील तजविजीबाबत (७३४०).

**बापूजी लक्ष्मण**– (—) : ठरल्याप्रमाणे हप्त्याचा ऐवज देत जाऊ म्हणून (७२८९).

**भिकाजी महादेव कोल्हटकर** – (—) : प्रापकाने पाठविलेले दोन बेरड आसामी परत पाठवीत असल्याबाबत (७३८९).

**रामचंद्र** – (—) : मालोजी नाईक देशमुख यास जेजुरीचा शिक्का देण्याबाबत (७२९७).

**लक्ष्मण महादेव हर्षे** – (—) : त्वरित घरी येण्याविषयी (७३६०).

**लक्ष्मण विठ्ठल देशपांडे** – (—) : बाबाजीसह पुण्यात यावयाचे होते परंतु गंगाधररावआण्णा याच्या विचारामुळे फिस्कटले, त्यांच्या पुण्यातील निकटवर्तियांवर लक्ष ठेवण्याची विनंती (७३३२).

**विठ्ठल गोविंद ताम्हनकर** – (—) : शाळूची मोडणी, ऐवज-फडशा, शेताची नांगरणी वगैरेबाबत (७३६७).

पत्रे चालू :

**शहाजी सोमवंशी** – (—) : मोहाडी, प्रा दिंडोरी येथील बाबतीविषयी खळखळ करणाऱ्या अंताजी त्रिंबक यास ताकीद करण्याबाबत (७३५८).

**शामजी गोपाळ थोरात** – (—) : शकभाजी करण्याकरिता दिलेल्या जागेच्या तंट्याबाबत (७३७४).

**शहाजी खिजमतगार** – (—) : घराच्या तंट्याबाबत जबरदस्ती करणाऱ्या जमालखानास ताकीद (७३७९).

**सदाशिव नारायण साठे** – (—) : किल्ले धनगड येथील हिशेब किल्लेदारांनी न दिल्यामुळे पाठविता आले नाहीत (७३६१).

**सदोबा*** – (—) : स्वार वगैरेचा बंदोबस्त योग्य प्रकारे करण्याची हमी व इतर सूचनांना उत्तरे (७३७०); जंगली-जयगड हा किल्ला जकिऱ्यासुद्धा रामसिंग याच्या हवाली करावा का याविषयी आदेश देण्याची विनंती, वैराटगड येथील खर्च वगैरे (७३३५).

**संभाजी सोमराले** – (—) : हिवरे प्रा नारायणगाव येथील पाटीलकी प्रेषकाच्या भावांनी न विचारता विकली त्याबाबत योग्य तो निवाडा करण्याबाबत (७२२०).

**हरि बाबाजी** – (—) : कुरणातून गवत कापून नेण्याबाबत योग्य ती तजवीज करण्याबाबत (७३९१).

**(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली)**

(—) – **अंताजी विठ्ठल** : रामकृष्ण दिवाण याजकडील शंकराजी नाईक भिडे याच्या कर्जाच्या वसुलीबाबतची उपाययोजना (७३७६).

(—) – **दुल्लभशेट*** : गोविंद विष्णु व राघो यांच्या कर्जाच्या लढ्यांत योग्य तो निर्णय लावण्याबाबत (७३२२).

(—) – **नारायण मोदी कसबेकर** : नैवेद्याकरिता गूळ देण्याबाबत, १२ जिल्हेज, सु. १२१३/१७ डिसें. १८१२ (७२५५.)

(—) – **पांडुरंगआबा*** : भास्कर नारायण देशपांडे यास प्रतापगडावरील कैदेतून सोडविण्याबाबत (७२६९).

(—) – **पंतप्रधान**× : गल्लाखरेदी करावयास पाठविलेल्या राघो खंडेराव याची या प्रांतात आल्यावर समग्र चौकशी करीन म्हणून (७२५९).

(—) – **बळवंतराव*** : ता वरेडी व नेरळ येथील बाकीचा फडशा करण्याकरिता त्वरित येण्याची आज्ञा (७२९०).

(—) – **बळवंत मोघे** : आप्पा धनचक्कर व क्षेत्री गोसावी यांचा देण्याचा खटला होता त्याचा उलगडा करून घेण्याबाबत (७३८४).

(—) – **मोरोपंत**× : कर्जपट्टीचा ठरावाचा मजकूर कळविला तो समजला (७३२०) ; कर्यात मावळ येथील देशपांडेपणाबाबत शांतपणाने व योग्य तोच निर्णय घेण्याबाबत (७३२१).

(—) – **मोरो बल्लाळ** : कुशल पत्रोत्तर करण्याची विनंती (७३२६).

(—) – **राघोपंत दादा गोडबोले** : कान्नज बागेकडील सरकार वरातीचे बाकी येणे आहे ते पाठविण्याबाबत (७३८२)

(—) – **रावजी**× : पैशाच्या अडचणीचे सविस्तर निवेदन व त्यावरील उपाय योजनेबाबत (७३३७).

(—) – **सातबा दादा*** : हरि उमाजी याजकडून गुलाबाच्या फुलांची रवानगी (७३१२).

पत्रे–चालू :

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]**

भिकाजी याने खरेदी केलेल्या बैलाच्या मालकीसंबंधी जखाप्पा याने कमाविसदारास पत्र देण्यासंबंधी विनंती (७२०८) ; सहस्रभोजनी व जोशी यांच्या वतनाबाबतच्या कजियांत जोशी यांची बाजू बरोबर असल्याचा निवाडा (७२१७) ; विजयदुर्ग येथील मोईनदार याचा जाबता पाठविला, बाकीच्या यादीवर मल्लाशी, धोंडप व मुल्हेर येथील बेहड्याच्या नकलांची रवानगी वगैरे, (७२३६) ; पा खुलताबाद येथील सोळा गांवच्या तनख्याच्या आकाराचे पत्रक, जहागिरी व स्वराज्य वगैरे नावनिशीवार व तपशीलवार पाठविण्याबाबत (७२३७) ; नारोपंत पोंक्षे व फडणीस यांना तगादा लावून चार वर्षांचा सिंहगड किल्ल्याचा हिशेब तपशीलवार पुरा करण्याबाबत (७२३८) ; चिमणाजी मानकर याजकडील राजपुरी येथील कर्जाचा झाडा पाठवून देण्याबाबत, (७२३९) ; वसुली लोहगडाकडील दुमाला मोकाशाचा तपशील, किल्ले निहाय अधिकाऱ्यांची यादी वगैरे (७२४०) ; किल्ले माहुली येथील अजमास, तालुके विजयदुर्ग येथील हप्तेबंदी वगैरेबाबत तपशील देण्यासंबंधी (७२४१) ; दादो दामाजी याच्या झांशी येथील आसामीचा दप्तरचा दाखला पाठविण्याबाबत (७२४२) ; पा वाळुंज येथील पांच गांवे सरकारात जबरदस्तीने घेतली असल्याची तक्रार, मौजे सरसिकन पा खुलताबाद येथील तनखा, कमाल, आकार वगैरेसंबंधी तपशीलवार लिहून पाठविण्याबाबत (७२४३) ; किल्ले देहरे येथील हिशेबाचे कागद त्वरित पाठवून देण्याबाबत, इ. स. १७७४–७५ (७२४८) ; कै. महादेवभटजी याच्या निवर्तलेल्या स्त्रीची वस्तवानी वगैरे जनार्दन गोखले याजकडे सुपूर्त करण्याबाबत (७२५०) ; वाफगांव येथील मोकासा ऐवजाचा तपशील पाठविण्याबाबत, इ. स. १७६७ (७२५३) ; आप्पा यास न आल्याबाबत ताकीद करणे (७२८४) ; कुशल पत्रोत्तर करण्याची विनंती (७२९४) ; बापूजी नाईक यांनी हजरत सराफाकडे जाऊन मोठ्या प्रयत्नांनी ऐवजव्यवस्था केल्याबाबत (७२९८) ; मौजे जांब प्रांत खटाव येथील शेतभाताच्या शिवारात सरकारी तोफखान्याचे बैल उपसर्ग देतात त्याच्या बंदोबस्ताबाबत (७३०३) ; पुण्यास जाताना प्रापकास कळवून जाण्याबद्दल (७३०६) ; कल्याणच्या मामलतीवर नेमणूक झालेल्या रामराव त्रिंबक यास पालखी व शागीर्द-नेमणूक सरसुभ्याच्या बेहड्यांतून झाल्यामुळे तशी रुजू करुन घेण्याबाबत (७३०७) ; धर्मबाह्य लग्नसंबंध केलेल्या वावी येथील कडभट गोविंद भावे यास प्रायश्चित देऊन शुद्ध केल्याबाबत (७३०८) ; रंग दीक्षित वाईकर या भटजीचे दाणे बुडविणाऱ्या अंदो पाटील यास ताकीद करण्याबाबत (७३०९) ; शहाजी बाबर याच्या कामास गेलेल्या भवानजी व लक्ष्मण याच्या हातून वसुलीच्या कामाची खात्री नसल्याबद्दल (७३१०) ; साडेतीनशेच्या कसरेसाठी नानाच्या चिठ्ठीची जरुरी (७३१४) ; तालुके अंजनवेल येथील हिशेब व जाबसाल करण्याबाबत, इ. स. १७८५–८६ (७३१८) ; कऱ्हेपठारी ज्या ज्या गांवी ऐवज घेतला त्याचा तपशील श्रीपतराव बापूजी याजबरोबर रवाना (७३१९) ; मालगांव येथील सनदा बार करून पाठविल्या आहेत त्या कीर्दीस घेण्याबद्दल (७३२५) ; सोलापुरातील रेणुका भगवती या देवीच्या पूजेच्या खर्चाची नेमणूक, इ. स. १७७८–८० (७३३८) ; गुलाबकंद पावल्याबाबत (७३४२) ; गुजराथ येथील खिमतदार कारगिरी व गुमास्ता प्रेषकांचा आहे तो तसाच चालू ठेवण्याबाबत (७३४३) ; आज्ञेप्रमाणे जामीन कतबा पाठवीत असल्याबाबत (७३५२) ; राऊतांच्या रोजमुऱ्याची व्यवस्था करण्याबाबत (७३५४) ; कारकून व ढालाईत यांची भरती करण्याबाबत (७३५६) ; नाना बडवे, परशराम नाना वगैरे लोकांकडून पत्रोत्तराबाबतचे मार्गदर्शन, अंतर्गत व्यवहाराबाबत बोलणी करण्याची विनंती (७३६२–७३६३) ; पंढरपूर येथील सरदेशमुखीचा खर्च, श्रींच्या नैवेद्य, नंदादीप व रथाच्या खर्चास चालू आहे तो

पत्रे—चालू :

तसाच चालू ठेवण्याबाबत (७३६४) ; केशवराव सखाराम सोलापूरकर, गोपाळ नाईक कानडे व मल्हार नाईक पारेख नीट फडशा करीत नाहीत त्यास ताकीद करण्याबाबत (७३६५); बिकानेर येथे ठाणे बसविणाऱ्या मल्हार गणेश यास आश्रय देणाऱ्या गोविंदजी व बाजी दवे यांचे घर अन्यायाने जाळून टाकणाऱ्या गावकऱ्याविरुद्ध घ्यावयाची पत्रे (७३६६) ; कृष्णरावजी याने सांगितल्याप्रमाणे आण्णाजी व बाळाजी महादेव यांचे जाब घेण्याबाबत (७३६८) ; हत्तीच्या चारणीची व्यवस्था, राहण्याचे ठिकाण इत्यादींची माहिती असलेल्या लक्ष्मण बल्लाळ यांच्या पत्राची रवानगी (७३७१) ; मामलत तोटयाची असल्यामुळे जमीन वसुलीतील विलंब (७३७२) ; घर बांधण्यासाठी आबाजी रघुनाथ याने गंगाधरपंत सुभेदार याजपाशी केलेल्या पत्रव्यवहाराबाबत (७३७३); कारलेकर यास चढ देऊन मामलत द्यावयाची याबाबत निश्चित स्वरुपाचे धोरण आखण्याबाबत (७३७५) ; निरनिराळ्या प्रकारचे नऊ किनखाप पाठवीत असल्याबाबत (७३७७) ; परगणे बीड येथील वर्षासनाच्या ऐवजाचे कागदपत्र सासवड येथे मागवून रवाना करण्याबाबत, श्रावण व. ११, सु. ११७९/१८ ऑगस्ट १७७८ (७३७८); गोपाळराव व गोविंदराव बुळे यास पत्र द्यावे की, कृष्णाजीपंत याच्याऐवजी जळेश्वर येथे दुसरा कमाविसदार नेमून कराराप्रमाणे मोगलाकडे अंमल द्यावा याबाबत (७३८१) ; राऊतराव यास जप्त केलेले सदाशिव त्रिंबक याचे पांच गांवचे कुलकर्ण परत देण्याबाबत (७३८३) ; रामचंद्र लक्ष्मण व राघो विठ्ठल देशपांडे याच्या कर्यात चाकण येथील कुलकर्ण खटल्याच्या निर्णयाबाबतचे चिंतो देशमुख याचे पत्र (७३८६) ; कृष्ण जोशी, रावजी उमदी व बाबा बल्लाळ यांच्या कर्जव्यवहारांबाबत (७३८८) ; देण्याघेण्याविषयीचे कागदपत्र जवळच ठेवून पुढचा व्यवहार करण्याबाबत (७३९०)·

याद :

चाडगांव येथील अजमखान घोरपडे यास खोटी माहिती सांगणाऱ्या हणमंतराव पाटील यास ताकीद करण्याबाबत कमाविसदारास, (७२३१).

यादी :

लक्ष्मण खंडेराव यांना सर्व प्रकारें मदत करण्याबाबत पत्र द्यावयाच्या लोकांची (७२०७).

यादी ऐवज :

यादीप्रमाणे लोकांस ऐवज देण्याघेण्याविषयी सु. ११५७/ इ. स. १७५६–५७ (७२४६).

यादी पत्रे :

कर्जवसुलीसंबंधी रामचंद्रपंत संभुदास देशपांडे, वडेलकर मोकदम यास ताकीद देण्यासंबंधीच्या पत्रांची (७२१०); संजनखान आकोलकर याच्या पुत्राने निष्कारण त्रास देऊन मारहाण केली त्यास शासन करण्याबाबत निरनिराळ्या लोकांस पत्र देण्याबाबत शेख जमातदार याची, ९ रमजान, सु. ११६४/१३ मार्च १७६४ (७२१६) ; विपरोबा हा गांव राव रामचंद्र अहिरराव यास दरोबस्त जहागिरीस दिला आहे. तरी त्याजकडे सुरळित अंमल देण्याबाबत सदाशिव दामोदर यास (७२१९);

यादी विनंती :

सरकारच्या आखत्यारीतील इनाम शेते वगैरे असलेल्या वैदिक भिक्षुक ब्राह्मणास मराठपट्टीचा तगादा न करण्याबाबत कृष्णाजी नारायण यास, (७२०९).

रसानगी याद्या :

भावाच्या सांगण्यावरुन जबरदस्तीने मौजे आजमपूर येथील स्वतःच्या जमिनीवर जमावबंदी करणाऱ्या चिमणाजी हरी कमाविसदार यास द्यावयाच्या ताकीदपत्रांची, ४ सवाल

रसानगी याद्या—चालू :

चैत्र, आर्बा, सु. ११६४/६ एप्रिल १७६४ (७२११) ; येसाजी जगताप याचे कर्ज वेळेवर देण्यासंबंधी निरनिराळ्या लोकांस द्यावयाच्या आज्ञापत्राची (७२१२) ; सुभानजी शेलार याच्या वडगांव येथील कुरणास उपद्रव न देण्याबाबत बापूजीबाबा यास द्यावयाच्या पत्राची (७२१३) ; बाटगणहाण येथील गुरे वगैरे वस्तभाव व्यंकोजीने पाडळसिंगे येथील पाटलांच्या मदतीने नेली ती परत देण्याबाबत अली महमदखान कमाविसदार मोगलाई यास पत्रे देण्यासंबंधीची (७२१४) ; रणजितराव गरुड याच्या बालम–टाकळी गावाबद्दल गैरवाका समजाविणाऱ्या कृष्णाजी नाईक खिस्ते याजवरील कारवाईसंबंधी पत्रे देण्याबाबतची, (७२१५) ; कर्जफेडीबाबत नगरशेट, सोनेसा व वेझे यांस द्यावयाच्या ताकीदपत्राबाबतची (७२१८) ; घोंडी काळे याच्या चोरलेल्या कडी व चौकडा त्यास परत करण्याबाबत बिबवीच्या पाटलास ताकीदपत्र देण्यासंबंधीची, २१ सवाल, चैत्र, आर्बा, सु. ११६४/२३ एप्रिल १७६४ (७२२१) ; विठोजी मोरे याने चोरून नेलेली मदनसिंग नगदे याची वस्तभाव परत करण्यासंबंधी काशीराव सिदोजी देशमुख यास पत्र देण्याबाबतची (७२२२) ; कृष्णाजी केशव टिळक याच्या माथेगुजर तालुका हवेली जाफराबाद येथील डोंगरतोड अनाधिकाराने करणाऱ्या लक्ष्मण जवळ याचे पारिपत्य करण्यासंबंधी द्यावयाच्या पत्राची (७२२३) ; कादलीकर व उदापूरकर यांचा जबरदस्तीने संबंध घडवून आणणाऱ्या भास्कर जिवाजी कमाविसदार यास ताकीद करण्याबाबतची, २० सवाल, चैत्र, आर्बा, सु ११६४/२२ एप्रिल १७६४ (७२२४); दामले व आगाशे या दोघामध्ये मौजे कोलंबे ता पावस येथील खांबच्या मळ्यासंबंधी चाललेल्या तंटयाची त्वरित मनसुबी करण्याबाबत रामशास्त्रीबाबा यास द्यावयाच्या पत्राची, २१ सवाल, चैत्र सु. ११६४/२३ एप्रिल १७६४ (७२२५) ; इमारतीस योग्य लाकडे असतील ती त्वरित चावडस येथे पोचविण्याबाबत निरनिराळ्या गांवास द्यावयाच्या आज्ञा पत्रांची (७२२६) ; व्यांपारी लोकांस जकातीविषयी त्रास देणाऱ्या त्रिंबकजी जमादार यास ताकीद, होळकरांची खोटी दस्तके देऊन सातशे गाड्या लाकडे हासील चुकवून नेणाऱ्या राजाराम गोलक यास ताकीद अनाधिकाराने माफीनी दस्तके देणाऱ्या प्रा पाटोदे येथील जमीनदारास ताकीद वगैरेची, २२ सवाल, चैत्र आर्बा, सु. ११६४/ २४ एप्रिल १७६४ (७२२७); शेख अब्दुल लतीफ यास खानापूर येथील इनाम चालू ठेवण्याबाबत कमाविसदार यास पत्र देण्यासंबंधीची, २९ रमजान, सु. ११६४/२६ मार्च १७६४ (७२२८) ; सावकाराची दंडेली, सामाजिक स्थिती वगैरेबाबतची (७२२९) ; मौजे जांब येथील जप्तींत शिवाजी विठ्ठल कुलकर्णी यास तोशीस लागू न देण्याबाबत दादो महादेव यास द्यावयाच्या पत्राची (७२३०) ; क्षेत्री कापडाचे दुकान असलेल्या आप्पा घनचक्कर यास कर्जाबाबत तगादा न करता ठरलेल्या हप्त्याने वसुली घेण्याविषयी सावकार यास ताकीद करण्याबाबतची (७२३२) ; गोपाळराव गणेश यास पागेकरिता कुरणजागा नेमून देण्याबाबत बच्याजीपंत यास द्यावयाच्या पत्राची (७२३३); बटीक विकत घेतलेल्या रामवट याजकडून घेतलेले दस्तक व जकातीबद्दल घेतलेला ऐवज परत करण्याबाबत द्यावयाच्या पत्राची (७२३४) ; खरेदीचे बैल खानदेशात पाठविण्याकरिता दाऊरजी खारेकर यास दस्तक देण्याबाबतची (७२३५); दहा बैलांचा जकात–वसूल माफ करण्याबाबतची (७२४७) ; रामचंद्रबाबा यांच्या पंढरपूर येथील रामायणी यांच्या वाड्याजवळील जागेतील दुकानाचे भाडे वगैरे त्यास तसदी न देता देण्याबाबतची (७२६३) ; खंडोजी नागोजी चौधरी याची कुळांनी कर्जाऊ घेतलेली रक्कम त्याजपासून वसूल करून देण्याबाबतची, (७२६३) ; सोनाराची मुलगी केली त्या आरोपातून मुक्त केल्याबाबत बाळंभट पंचवटीकर यास द्यावयाच्या पत्राची (७२६५).

**रुमाल क्र. १५ पुडके क्र. २ का. सं. १२२ (७३९२–७५१३)**
**सु. १२३५–११७५ इ. स. १७३४–१७७५**

**अर्ज :**

**[फक्त प्रेषकाचा नामोल्लेख असलेला]**

**लक्ष्मणदास बैरागी–(–):** पंचवटीतील गुरुची जागा गोविंददास बैरागी यांनी जबरदस्तीने घेतली त्याची मनसुबी करण्याबद्दल **(७४७७).**

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेला]**

लछीराम हजारी याच्या सालझाडयाच्या हिशेबात घोळ व शिपायांना तलब देत नसल्याबद्दल भागवत परदेशी वगैरे लोकांच्या तक्रारीबाबत, सु. ११३५/इ. स. १७३४/३५ **(७४८३).**

**तेरीज :**

कोठीकडील जमाखर्चाचे **(४५०३–७५१३).**

**दस्तक :**

बाळाजी बाबूराव यास किल्ले मुल्हेर येथे घर बांधावयास लांकडाच्या रवानगीसाठी, ३० सवाल, वैशाख, आर्बा, सु. ११६४/२ मे १७६४ **(७४३३).**

**पत्रे :**

**आप्पाजी विश्वनाथ—रामाजी गणेश :** नेरळ येथील तांदूळ बैलांची तरतूद करुन रवाना करणे **(७४५१).**

**कृष्णाजी जिवाजी—पंतप्रधान :** शिबंदीची जास्ती नेमणूक दूर करीत असून राऊतांचा आदा केलेला हिशेब रवाना केल्याबाबत **(७३९४).**

**खेडचे मोकदम, चौगुले—बाईसाहेब** × : आंबे रवाना" **(७४७९).**

**गणेशभट फडके उपाध्ये—आबा देशमुख :** रावजींच्या आज्ञेनुसार नवीन घराची पायाभरणी **(७४५८).**

**चांदखान—रामचंद्र विठ्ठल :** श्रीमंताच्या व लष्कराच्या मुक्कामाबाबत व जामगांवी मातुश्रींचा निभाव कसा होईल त्याची चौकशी करण्याबद्दल **(७३९८).**

**चिमाजी माणकर—पंतप्रधान** (माधवराव नारायण) : श्री हरिहरेश्वर, दिवे व श्रीवर्धन येथे अनुष्ठानास बसलेल्या गोपाळभट मेहेंदळे व आबा जोशी श्रीवर्धनकर यांना सनदेनुसार ऐवज रवाना, १० सवाल, खमस, मार्गशीर्ष, सु. ११७५/१४ डिसेंबर १७७४ **(७३९३).**

**त्रिंबक विनायक—पंतप्रधान** × : बलसिंग हेमसिंग बिसन याचे सामान बारगिरास सनदेअभावी देण्यास नकार **(७३९६).**

**धोंडो महादेव—पंतप्रधान** (माधवराव नारायण) : नगारे मढवण्यासाठी चरशांची औरंगाबाद येथून खरेदी, ६ रमजान, खमस, कार्तिक मास, सु. ११७५/११ नोव्हेंबर १७७४ **(७३९२).**

**नंदराम*—गोविंदराव रजपूत :** कुशल वर्तमान **(७४५६).**

**नारो रघुनाथ—पंतप्रधान** × : केवडा रवाना **(७४६२).**

**बापू* —विष्णुपंत दादा* :** पत्र पाठवून संतोषवीतजाण्याची विनंती **(७४५४).**

**बापू माने, सदू माने चौगुले—बळवंतरावजी* :** वाघ यांच्याकडून जामीन घेण्याबद्दल पत्र रवाना **(७४८२).**

**बापूजी पाटील—अब्दुल अजीज :** बाळोबा पाटील जामगांवकर सरमे (गवत) घेऊन गेला म्हणून त्याचा शोध करण्याचा प्रयत्न **(७४०३).**

**बाबाजी भाईजी—डबीरजी दाजी* :** पत्रांचे जाब सत्वर पाठविण्याची विनंती, फौजेचा अलटुकवाडे येथे मुक्काम **(७४५५).**

**मल्हार हरि—कृष्णाजी काकाजी* :** शामजी बाबा यास जिन्नस देण्याबाबत विनंती **(७४५३).**

**पत्रे—चालू :**

**मानाजी शितोळे—पंतप्रधान** × : पक्ष उरकून हुजूर येत असल्याची विनंती **(७४६५).**

**महादजी गोविंद—विठ्ठलपंत* :** रामाची पोटदुखी बरी असल्याचे निवेदन[१] **(७४१२).**

**मोकदम व्याहाली—बाळकृष्णपंत वैद्य* :** देशमुख याच्या पत्राचा जाब रवाना **(७४००).**

**मोरो बल्लाळ—त्रिंबकरावजी* :** वाढेरे गांवास अभयपत्र देण्याची विनंती **(७४५७).**

**राघो बाबूराव शिराळकर—विसाजीपंत दादा* :** शिराळे येथील मामलतीसंबंधी **(७४६१).**

**लक्ष्मण हरि—गोविंदपंत दाजी :** सोमवंशी यास मोकाशाचा ऐवज देण्याची विनंती **(७४११).**

**विद्याधर जोशी—सदाशिवपंत देवल :** दिवाणजीचे प्रकरणी अग्नीहोत्री व पेंडसे यांस दुरुत्तरे केली तसा अपमान करू नये म्हणून विनंती **(७४६८).**

**विनायकभट*—विष्णुपंत* :** सदाशिव नाईक अनगळ यांचा सांभाळ करण्याची विनंती **(७४३०).**

**विनायक केशव—बाबूभट खरे :** गांवच्या ऐवजाबाबत **(७४६७).**

**शिवाजी बल्लाळ—पंतप्रधान** × : बिरनहाळकर गोसावी यांचे साक्षीदार रवाना **(७४६४).**

**शिवाजी बल्लाळ जोशी—वामनराव तात्या* :** राजपुरीकडून किल्ले प्रतापगड येथे भाताची नेमणूक असून त्याच्या वहिवाटीसंबंधी **(७४५९).**

**शेरीकर मोकदम बेलसर येथील—नाना पुरंदरे :** तिळगूळ व गाजरे रवाना **(७३९५).**

**श्रीधर अनंत गर्दे—परशरामपंत* नाना* :** क्षेत्री तह करून शास्त्री मंडळी आली असल्याने सावध राहण्याची सूचना **(७४६९).**

**संकराजी निकम—मोरशेट करंजे :** शहरातून माणसे येत असून चंद्रसेन अद्याप आले नसल्याचे निवेदन **(७४०९).**

**सखोजी काटे—मल्हारपंत भाऊ* :** चंदीसाठी बारगीर व शिलेदार यांचा गवगवा **(७४५२).**

**सिदप्पा शेट वीरकर—आनंदराव* :** राघोबापंताबरोबर पाठविलेल्या ऐवजाची पोंच **(७३९९).**

**सुभानजी केशरकर—पंतप्रधान** × : किल्ले सरसगडच्या बेगमीसंबंधी विनंती **(७४६६).**

**हरभट नावलेकर—बाबूराव :** आज्ञेनुसार वर्तणूक करू म्हणून विनंती **(७४७३).**

**हवालदार व कारकून किल्ले सरसगड—बाबा फडणीस :** आंब्याची पोच देण्याविषयी विनंती **(७४०५).**

**हमीदखां देशमुख—त्रिंबकराव सुभेदार :** भाई अजावलखान याच्या तर्फेने कापड खरेदीस आल्याबद्दल **(७४७६).**

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली]**

**भिकाजी चौगुले गवळी—(—) :** पाली येथील जमाबंदीच्या मक्त्यासंबंधी **(७४८०).**

**राणबा कुकडे—(—) :** बापू पाटील चिखलीकर याजकडून झालेल्या उपद्रवाचे निवेदन **(७४८६).**

**रामाजी कोन्हेर कुलकर्णी—** (—) देऊगांवच्या कुलकर्ण वतनाच्या वांटणीविषयी **(७४०७).**

**पत्रे–चालू :**

**(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली)**

(––) – **काशीपंत मासा*** : दप्तरी येऊन ऐवजाचा फडशा करण्याची विनंती, सु. ११७५/इ. स. १७७४–७५ (७४०६).

(––) – **दीक्षित*** : देवालयास लागणारे दगड, परसोजी बेलदार याजकडून घेण्याची विनंती (७४७१).

(––) – **पंतप्रधान**× : पिकांची खराबी, पागेच्या खरेदीबद्दल व शेरीच्या गल्याबद्दल विनंती (७४६३).

(––) – **बाळाजीपंत*** : ऐवज पाठवून सुटका करुन देण्याची विनंती (७४०४).

(––) – **मनसाराम भट*** : औषधांची मागणी (७४७२).

(––) – **राघोपंत आबा*** : अंबादासपंतभाऊ यांनी नेमून दिलेल्या गंगाबाईच्या वार्षिक पट्टीसंबंधी (७४६०).

(––) – **वामनराव तात्या*** : मारामारीची चौकशी (७४९७).

**(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली)**

पळून गेलेल्या राजेखान बंदिवानास बापूकडून अटक (७३९७); शिवराम पवार याच्या बाकीबद्दल व माधवराव पवार याच्या वरातीच्या फडशाबद्दल ताकीद करण्याची विनंती, ताथवडेकर पाटील याचा जाबसाल गुरुजीबाबा याजकडे देण्याची विनंती (७४०१); आखाडे येथील कमाविसदारास बाजवी एवज देऊ नये व गांवात उपद्रव होऊ नये म्हणून विनंती (७४०२); घरपट्टी व उदीम पट्टीसंबंधी निवेदन (७४०८); व्याजासह ऐवज मिळेल अशी व्यवस्था (७४१०); घराच्या जागेची हद्द ठरवून देण्याबद्दल रामाजी महादेव यास आज्ञा (७४१४); रामराव नारायण याच्याकडील मिरी या इनाम गांवास उपद्रव व त्याच्या बंदोबस्ताविषयी (७४१५); दादाचार्य करंजगी यांस वर्षासन (७४३६); परमेश्वराची आराधना (७४७४–७४७५); तुकोजी पाटील याचे कर्ज बहिरजी पाटील याजकडे आहे त्या कजियासंबंधी (७४८१); हरिदास याच्या कर्जफेडीसंबंधी कजिया (७४८४); शिवराम हणमंत यास रहदारीचे दस्तक देण्याबाबत २ सवाल, चैत्र, आर्बा, सु. ११६४/४ एप्रिल १७६४ (७४८८); त्रिंबक राम जोशी यास हरभरे नेण्यासाठी दस्तक देण्याबाबत (७४८९); भुजंगराव, आत्मारामपंत वगैरे स्वारांस पारनेर येथे जाण्यासाठी दस्तके देण्याबद्दल (७४९१); बहिरजी बाबर याच्या पागेचे ऊंट जामगांवी नेण्यासाठी रहदारीचे दस्तक देण्याबाबत (७४९२); आषाढी कार्तिकीच्या वसुलीबाबत सावकाराने केलेल्या करारासंबंधी (७४९३); दप्तरचे कागदपत्र जपून ठेवण्याविषयी (७४९५); कान्होजी धोंड याने जामखेड येथे केलेल्या चोऱ्यांसंबंधी (७४९६); येकलारे व तोडवली या पाटीलकीच्या गांवाची जप्तीतून मोकळीक करण्याची विनंती (७४९८); पूर्ववत वाटणीची मागणी (७४९९–७५००).

**याद्या :–**

सदाशिव बाळंभट केळकर यास धर्मादाय पावत असलेल्या गल्याची (७४९४); चंदीसाठी झालेल्या खर्चाची (७५०१); जंबूसर येथील पोर्णिमेच्या वरातेसंबंधी (७५०२).

**यादी ताकीदपत्रे देण्याची :**

महमदापूर येथे खंडोबा नाईक याने बांधावयास घेतलेल्या घरास अडथळा करु नये म्हणून, (७४१७); धाल, डोन, पांढरे–वाहाळ खांबगांव येथील जहागिरीच्या अंमलाबाबत (७४१८); धामोरी व सिरोडे गांवच्या शिवेच्या कजियाबाबत व विठ्ठल शिवदेव यांस शेरी देण्याबद्दल (७४१९); महादजी निकम याजकडील जळगांव येथील मामलेतीस उपद्रव

**यादी ताकीदपत्रे देण्याची–चालू :**

न देता पूर्ववत चालू देण्याबाबत (७४२०); जोहारीमल मथुरेहून लग्नाचे काम उरकून माघारी येत असतां गांवकऱ्यांनी लुटून नेले त्याबाबत (७४२३); त्रिंबक बापूजी यांच्या कर्जासंबंधी, १२ रमजान, फाल्गुन, सु. ११६४/१६ मार्च १७६४ (७४२४); साकोरे गांवी दिलेल्या पत्राची (७४२५); फत्तेसिंग व सभासिंग यांच्या वाटणीच्या कजियाबाबत (७४४१).

**रसानगी याद्या :**

गिरमाजी शंकर यांचा घरवाडा, शेतमळा पूर्ववत् चालू देण्यासंबंधी माणकोजी भापकर यास द्यावयाच्या पत्राची (७४१३); नाईकजी बाबर याने सरकारची द्वाही मोडून होळीची पोळी बांधली म्हणून त्यास हुजूर आणण्याबाबतची (७४१६); श्रीनिवास दिवाकर याची खंबायत येथे दुकाने आहेत तरी कमाविसदारास ताकीद करून सावकाराचे व इतरांचे देणे द्यावे म्हणून (७४२१); लालाखेम खेमकर्ण यांच्या इनाम जमिनीच्या ताकीदपत्राची (७४२२); शिंदे यांच्या कारकीर्दीच्या हिशेबासंबंधी (७४२६); आत्माजी घामण याने मल्हार पुतळाजी व येसाजी महादेव यांच्या कुणबिणी पळविल्यामुळे आत्माजी घामणे याची बायको व मुले अटकाविली आहेत त्यास कुणबिणीचा शोध लागेपर्यंत सोडू नये म्हणून द्यावयाच्या पत्रांची, (७४२७); अलीज्याबहाद्दर शिंदे यांच्या पंढरपूरक्षेत्री असलेल्या वाड्याची जागेसाठी मोडतोड न करण्याबाबत तेथील कमाविसदारास द्यावयाच्या पत्राची (७४२८); वासुदेवभट संगमनेरकर व गोदाजाचा घरासंबंधी तंटा, ९ रमजान, सु. ११६४/१३ मार्च १७६४ (७४२९); वारस नसल्यामुळे उत्तरकार्य करण्याबाबत तंटा करणा यास सरकारात आणण्याबद्दल तांबवे येथील कमाविसदारांस द्यावयाच्या पत्राची (७४३१-३२)- कृष्णाजी भैरव याच्या कर्जासंबंधीची, (७४३४); विनाजी कासार याच्या मुंबई येथील लोकांकडील कर्जाबद्दल त्याचा गुमास्ता लबाडी करितो तरी त्याजकडून ऐवज घेण्याबाबतची, १ र. वल, कार्तिक, तिसा, सु. ११५९/३ नोव्हें. १७५८ (७४३५) हरिसिंग कासीद यास रहदारीचे दस्तक देण्याविषयीची (७४३७) चाफाजी बाबले यांस कोठीचे व जकातीचे दस्तक देण्याबद्दलची १ ज. वल, तिसा, सु. ११५९/१ डिसें. १७५८ (७४३८); दामोदर घनःशाम याच्या नेमणुकीबाबतची (७४३९); कोकमठाणमधील रानांतील गुरेचारणी व वसुलाबाबत करावयाच्या ताकिदीसंबंधीची (७४४०); फतेसिंग व सभासिंग यांची वाटणी बरोबर करण्यासंबंधीची (७४४१); बहुरुपे, वडगांव, तितरी येथील जहागिरीचा वसूल सुरळित देण्याबद्दल कान्होजी कदम, बिजेसिंग वगैरेस द्यावयाच्या ताकिदीची, (७४४२); बाळाजी बाबूराव यांस वराता दिल्यापासून किल्ले मुल्हेरचा कारभार सुरळीत चालू राहाण्याबद्दलची (७४४३); रंगराव शिवदेव यांनी बैल खरेदी केले असून हसील न घेण्याबद्दलची (७४४४); यशवंतराव व सुल्तानजी धायभर यांजकडून खंडणी वसूल करण्याविषयीची (७४४५); खंडो बाबूराव याजकडील मामलत सुरळित चालू ठेवण्याबद्दल थोरात यांस पत्रे पाठविण्याबद्दलची (७६४६); कसबे काळे येथील काजीपणाचे कामकाज पूर्ववत् चालविण्याबद्दलची (७४४७); गोदजी कोरले याच्या किल्ले मुल्हेर येथील वतनासंबंधी ताकीद करण्याबद्दलची (७४४८); लोणावे खुर्द येथील मोकदमीस मोगलांकडून उपद्रव तरी बंदोबस्त करण्याची राघो गोविंद वगैरेस ताकीद करणेची (७४४९); परगणे नसराबाद येथील जहागिरीबाबतची (७४५०); येसूबाई हीस मारहाण केल्याबद्दल हरभट रहाळकर यास ताकीदपत्र देण्याबद्दलची (७४७०) बाजीपंत पाटणकर याजकडे चाकरीस असलेल्या बहिरजी यादव यास द्यावयाच्या मुशाहिऱ्याची, २६ सवाल, चैत्र, आर्बा, सु. ११६४/२८ एप्रिल १७६४ (७४७८); हसनखान व परशराम पाटील यांचा हुसेनखान यास विकत घेतलेल्या शेताच्या बाबतीत उपद्रव

रसानगी याद्या—चालू :

(७४८५); कानशेट सोनार, खोत व बाळाजी नाईक तांबे यांच्यामधील ओवरे गावच्या खोतीच्या वतनाबाबतच्या तंटया-विषयी (७४८७); मैरप्पा गवळी बाजारकर यास वसई येथे जाण्यासाठी दस्तक देण्याबद्दलची (७४९०).

रुमाल क्र. १५ पुडके क्र. ३ का सं. १७८ (७५१४-७६९१)
सु. स. ११११-१२१९ इ. स. १७१०-१८१८.

अर्ज :

लिंबवलेकर मोकदम—सुभेदार : धारकरी याच्या ऐवजा-करितां ताथवडेकर शिपायांचे धरणे असल्यावद्दल निवेदन (७६६७) (नक्कल).

पालनजी हुमजी—(–) : मोदीकडून येणे असलेल्या ऐवजा-बद्दल सावकारखान्यात पंचाईत करण्याची विनंती (७६२४).

कतबा :

जनार्दनपंत भिडे—रावसाहेब* : केळवडेकर पाटील याने सुताराकडून ऐवज घेऊन जमीन इनाम दिल्याबद्दल, वैशाख व. ६, रा. श. ३६/७ मे १७१० (७६०७).

करारयाद्या :

गणेश बल्लाळ व हरि गणेश यांच्याकडील मामलतीच्या हिशेबासंबंधी, इ. स. १७८४ (७५७९); माधवराव भुसकुटे वगैरे सावकारांनी केलेल्या महालाच्या वहिवाटीच्या रुजुवातीस सरकारातून नेमलेल्या गणेश संभाजी व दोन आसा-मींच्या रोजमुऱ्याबद्दल, इ. स. १७७४-९५ (७५८२).

पत्रे :

अंताजी गोविंद आपटे—बच्याजीपंत जोगळेकर : दरबारी वर्तमान कळविण्याबद्दल व दरबारसमई जपून वागण्याबद्दल विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७६४२).

अंताजी चिंतामण सहस्त्रबुद्धे—भिकाजीपंत* : तोफखान्याकडील नेमणूक व खर्चास दिलेला ऐवज याबद्दल खुलासा, इ. स. १७९६-१८१८ (७५९१); तोफा मुहूर्तानें बाहेर काढल्याबद्दल व सरकारचे व भाडयाचे बैल न आल्याबद्दल निवेदन, पूर्वी घेतलेल्या ऐवजाचा तपशील, इ. स. १७९६-१८१८ (७५९२).

अंताजी बाजी वैद्य—राघोपंतदादा* : श्रीपतराव खंडेराव याज-कडून उत्तरे पाठविण्याचे आश्वासन, कार्याचा बंदोबस्त करून देण्याची विनंती (७६५०).

अंताजी यशवंत चापेकर—गुंजाबाई* : घरगुती मजकूर, इ. स. १७९६–१८१८ (७६५१).

आत्माराम रामचंद्र सातभाई राम कडेगांवकर—भिकाजीपंत यजमानाजवळ प्रेषकाची बाजू सांभाळण्याबद्दल विनंती (७५९५).

आप्पाजी चिमणाजी गोंधळेकर—नारोपंत* : नानांचे नाशिक येथून पुण्यास आगमन, दाजीबाकडील ऐवजाबद्दल निवेदन, बडशिऱ्यासंबंधी बाजी प्रल्हाद याने राहुजीपंत यांचा अडथळा घातल्याबद्दल, बाबाजीपंत याजकडील रसदेच्या ऐवजाबद्दल निवेदन, इ. स. १७६१-७२ (७६८४).

आप्पाजी रघुनाथ—बाबा* : बाबांच्या पत्रांत प्रेषकावर कृपा करण्याबद्दलचा मजकूर लिहिण्याची व प्रेषकाचा ऐवज घरी पाठविण्याची विनंती इ. स. १७६१-७२ (७६६४).

आप्पाजी विश्वनाथ—रामकृष्ण केशव व मोरो सुंदर : मीठ भरण्यासाठी येणाऱ्या ठाण्याच्या बैलांवर पेणपैकी सरकारी दास्तानांत भरावयाचे तांदूळ भरून पाठविण्याबद्दल ताकीद, इ. स. १७६१-१७९५ (७६४५) (नक्कल).

आबाजी राम गोडबोले—भिकाजीपंत जोगळेकर : बापूजी नाईक तोडवलकर याजकडील येणे असलेला ऐवज घेऊन पाठविण्याची विनंती (७५९०).

पत्रे—चालू :

आबाजी सदाशिव करमरकर—भिकाजीपंत गोडबोले : चिरं-जिवाच्या बंदोबस्ताबद्दल व भिकाजीपंत पटवर्धन याचा लखोटा दाजीबा पटवर्धन यास पावता करण्याची विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७५८७); बाबाजीच्या सोयीबद्दल विनंती, नांवनिशी-वार पत्र लिहिण्याच्या सूचनेबद्दल खुलासा, इ. स. १७९६-१८१८ (७५८८).

कृष्णाजी रघुनाथ—सदाशिवपंत* व विसाजीपंत* : बारगीर व मोतद्दारांना ऐवज आदा (७५१९).

कृष्णाजी रघुनाथ वालवलेकर—बळवंतराव मोघे : त्वरित वरा-तेचा ऐवज देण्याबद्दल देवरावबाबा यास पत्र पाठविण्याबद्दल विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७५६३).

खंडेराव त्र्यंबक—राघोपंत दादा* : स्वारी खर्चास ऐवजाची तजवीज करण्याची विनंती (७५३४).

खंडोजी शेळके अंकूशराव—नानासाहेब (बाळाजी बाजीराव) : आज्ञेप्रमाणे तयारीनिशी सत्वर येत असल्याबद्दल निवेदन, इ. स. १७४०-६१ (७५४६).

गणेश नारायण जोशी—भिकाजीपंत जोगळेकर : यशवंतराव याजकडून लखोटयाचे उत्तर आणविण्याबद्दल विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७५९७).

गणेश रघुनाथ नेने—भिकाजीपंत जोगळेकर : रोजमुऱ्याबद्दल विनंती (७५९६).

गोपाळ राम—अंतोबा बापू* : मोरो बाबाजी, खंडो सामराज बेलसरे यांच्या जेजुरी, साकुर्डे, अंबिले व राजेवाडी येथील ज्योतिष कुलकर्ण तंटयाच्या निवाडयास जाण्याबद्दल विनंती इ. स. १७६१-७२ (७६८१).

गोपाळभट गोखले—राघोपंत गोडबोले : औषधांची पोच व लिंबाची मागणी (७५२७).

गोविंद लक्ष्मण लिमये—रामचंद्रपंत* व अंताजीपंत* : अंताजी-पंत मिरजोळकर याजकडून वरातेचा ऐवज आगल्याबद्दल निवेदन, इ. स. १७९६-१८१८ (७६८६).

गोविंदभट साठे—गोविंदपंत आपटे : कार्याच्या बंदोबस्ताबद्दल विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७६३६).

गोविंदराव कृष्ण मेहेंदळे—बाबा आपटे : सखोपंत व विठ्ठलपंत फडणीस यांच्या विद्यमाने तंटयाचा निकाल लावल्याबद्दल निवेदन, इ. स. १७९६-१८१८ (७६३१).

गोविंद बापूजी बापट व अंताजी गणेश—भिकाजीपंत जोगळेकर : यज्ञोपविताच्या जोडयासंबंधीचा मजकूर, इ. स. १७९६-१८१८ (७६०४); भेटीसंबंधी मजकूर (७६०५).

चिंतो कान्हो—नाना फडणीस : बारामती येथे घोडयांना पाणी पाजण्यासाठी असलेल्या पखाल्यांच्या रोजमुऱ्याबद्दल विनंती, इ. स. १७७४-१७९५ (७६२०).

चिंतो वामन देशमुख—विनायकराव देशमुख : कातजच्या तळयां-तील गाळ काढणाऱ्या गवंड्यांना खर्चास द्यावयाच्या ऐवजाबद्दल खुलासा, पौष व. ७, सु. १२१३/२३ जानेवारी १८१३ (७६०९).

चिमाजी नाईक संकपाळ—मोरोपंत दादा* : पदमसिंग पिसाळ व संभाजी भोसले यांच्यामधील खुनासंबंधीचा तंटा ऐवजावर मिटला असूनहि संभाजी भोसले प्रापकाकडे गेल्यामुळे तेथें गैरवाका समजाविण्याचा संभव (७६२९).

पत्रे–चालू :

जेगन्नाथभट पळणीटकर—सदाशिवपंत साठे : बाजीराव गुजर यांस दिलेल्या कर्जाचा ऐवज वसूल करून देण्याची विनंती (७५२५).

ज्ञानराव परकाळे—रावसाहेब (माधवराव बल्लाळ) : आज्ञेप्रमाणे सरंजामासह येत असल्याबद्दल विनंती, इ. स. १७६१-१७७२ (७६५२).

तुळसाजी नाईक देशमुख—मोरोपंत दादा* : वृत्तीच्या बंदोबस्ताबद्दल विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७६३०).

दत्ताजी शिंदे–भाऊसाहेब (सदाशिव चिमणाजी) : पत्रांची पोच, (७५२८).

धोंड जोशी—नाना ✕ : चांगल्या गाईची मागणी (७६९०).

धोंडो महादेव—रावसाहेब (माधवराव नारायण) : दौलताबाद येथून जिन्नस रवाना, इ. स. १७७४-१७७९५ (७६९१).

नरसोबा*—बळवंत* : पोहोचल्याचे पत्र पाठविण्याची विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७५५५).

नानाजी व्यंकटेश—भिकाजीपंत* : कर्ज फेडीसंबंधीचा कतबा, २० रजब, सु. ११९३/४ मार्च १७९३ (७५५०).

परशराम बल्लाळ जोशी—राघोपंत गोडबोले : जनावरांच्या चंदीची बेगमी करण्याची व कर्जमुक्त करण्याची विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७५३६) ; मामलतीच्या घालमेलींसंबंधी प्रेषकाची बाजू राखण्याची विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७५४०).

परशराम रामचंद्र—जीवनराव* : मोरोपंत दादा यांस विनंती करून आनंदराव मोरे यास लोहोकर येथील जप्तीचा उपद्रव लागू न देण्याबद्दलचा बंदोबस्त करण्याची विनंती. (७५५९).

परशराम हरि कोल्हाटकर देसाई—भिकाजीपंत जोगळेकर : कोकणात गमन, इ. स. १७९६-१८१८ (७५९३) ; श्रावणातील उत्सवप्रसंगी प्रापकाची मार्गप्रतिक्षा, बाबाजी नाईक बने यांच्याबद्दल विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७५९४).

बनाजी माधवराव—नाना ✕ : तुळाजी आंग्रे यास अहमदनगरच्या किल्यांत पोहोचवून आलेल्या वंदनगडकरी आसामीचा हजेरीपट रवाना, इ. स. १७७४-१७९५ (७५६८).

बहिरो राम—नाना ✕ : शास्त्रीबाबा यांच्या आज्ञेप्रमाणे बाजी गलांडे यास करकंबच्या आबादानीबद्दल ताकीद, महादजी गलांडे याच्याशी असलेल्या तंटचामुळे आबादानीकडे बाजी गलांडे याचे दुर्लक्ष झाल्याबद्दल व त्याच्या पुत्राने केलेल्या आबादानीबद्दल निवेदन, इ. स. १७७४-९५ (७६५८).

बहिरो व सदाशिव अनंत इंदोलकर—बाबा ✕ : राजसच्या लग्नाचे निमंत्रण (७६२३).

बापूजी बाबाजी साठे—भिकाजीपंत जोगळेकर : खर्चाची तजवीज करण्याची विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७५८९).

बाळाजी जनार्दन—गोविंद लक्ष्मण : जिन्नस रवाना (७६५३), —गोविंद लक्ष्मण : गणेश बल्लाळ व हरि गणेश यांच्या अवचितगड व वीरवडी येथील मामलतीच्या तफावतीची रुजुवात लवकर करून जरूर असलेले कागदपत्र सत्वर देण्याबद्दल सदाशिवपंत यास ताकीद करण्याची सूचना. (७६५४).

बाळाजी नारायण—अंबादासपंत* : मामलतीच्या जाबसालास समक्ष येण्याच्या आज्ञेबद्दल खुलासा (७५३९).

बाळाजी महादेव—नाना ✕ : पंतसचिवांकडील दादा फडणीस यास साहोत्रा वगैरेसंबंधी जरूर असणारी पत्रे देण्याची विनंती, इ. स. १७७४-९५ (७५१४) ; कल्याणकडे पाठविलेले भात कोळ्यांना गलबतांतून खाली उतरून देण्याबद्दल कल्याण येथे पत्र पाठविण्याची विनंती (७५६६).

पत्रे–चालू :

बाळाजी हरि मोघे—भाऊसाहेब : ✕ ऊंबऱ्याहून श्रीक्षेत्री आगमन मंडळींची माहुली येथे रवानगी (७५५३) ; – देवराववाबा : हुंडीची चिठ्ठी घेऊन येणाऱ्यास ऐवज देऊन चिठ्ठीवर भरपाई करून घेण्याची सूचना, कार्तिक व. ११, श. १७३८/१५ नोव्हें. १८१६ (७६१०).

बाळोजी व बापूजी पाटील घोरपडे—तांदूळवाडी व मंगलापूर येथील मोकदम : तांदूळवाडी व मंगलापूर येथील पाटीलकी वतनतंटचाबद्दलचा मजकूर (७६३३) (नक्कल).

भगवंत देवजी कात्रे—आप्पा* : इनामपत्रे करून देण्याची विनंती (७५४१).

भगवंत शिवराम—मल्हारपंत : नाना स्वामींच्या नांवाची दोन पत्रे करून देण्याची विनंती, (७५५४).

भिकाजी गोविंद—मोरोपंत दाजी : गणाजी मोरे, अनाजी व माधवराव बेलसे यांच्या चाकरीच्या रोजमुऱ्याबद्दल विनंती (७६४७).

भिकाजी बाबाजी—यशवंतराव* : अतीत येथील सदाशिवपंत वगैरे कुलकर्णी व पाटील यांच्या तंटचाचा निवाडा (७५३०) (अपूर्ण).

भिकाजी महादेव गोखले—राघोपंतदादा* : –सुभेदाराच्या गैरवर्तणुकीबद्दल निवेदन व कार्य करून देण्याची विनंती (७५१८).

भैरवभट संकल्ये—त्रिंबकजी डेंगळे : आबाजी चिंतामण याजकडे यजमानांच्या इच्छित कामनासिद्धीसाठी श्रीमहाकाली व महालक्ष्मी प्रित्यर्थ करीत असलेल्या शतचंडीच्या अनुष्ठानाबद्दल, मार्ग व. १, संवत १८६५/४ डिसें. १८०८ (७५९९) ; वरील मजकुराचेच विनायकभट नाशिककर याचे, मार्ग. व. १, श. १७३०/४ डिसें. १८०८ (७६०८).

मल्हारजी होळकर—दादासाहेब (रघुनाथ बाजीराव) : कुशलतेचे वर्तमान (७६२१) (अपूर्ण).

मल्हारराव नरसो—बच्याबाई घाटगे : कर्जपटचाच्या हिशेबासह कारकून कऱ्हाड येथे पाठविण्याची सूचना, इ. स. १७९६-१८१८ (७५६९).

महादजी आप्पाजी भिडे—बापूजीपंत बापू* : भोजेगावच्या आबादानीबद्दल निवेदन, बाळोजी घोरपडे व बापूजी पाटील यांनी गांवावर केलेल्या दावेचिठ्ठयासंबंधी करावयाच्या बंदोबस्ताबद्दल व वरील दोघांना द्याव्या लागणाऱ्या अभयपत्राबद्दल निवेदन, इ. स. १७९६-१८१८ (७६३५).

महादजी गोविंद—राघोपंत सुभेदार : दहेजवारे येथील गावांच्या वसुलीची बाकी देणे नसल्याबद्दल व वांगणी गांवच्या खराबीबद्दल निवेदन, ११ सवाल, सु. १२०८/११ डिसें. १८०७ (७६५५) ; – नानासाहेब* : रसदेबद्दल दादासाहेबांना विनंतीपत्रे लिहिल्याबद्दल निवेदन, इ. स. १७७४-९५ (७६५६).

महादजी व बाळाजी नारायण पटवर्धन—गणेशपंत बेहेरे : स्वारीचे देशावर आगमन होण्याबद्दल विनंती, तात्या व लक्ष्मणपंत देसाई यांना लिहून तरवलगांव येथे गुरांची व माणसांची सोय करण्याची विनंती, इ. स. १७७४-९५ (७५६१).

माधवराव नाईक देशमुख—नरसिंगराव, ठाणे जामगांव : प्रापकाकडील वाळुंज गांवची वहिवाट माजी मामलेदार याने नगरच्या बाबाजीपंत यास सांगितल्यामुळे आपटे याचे पत्र नगरकर

पत्रे–चालू :

कमाविसदारास गेल्यामुळे ठाणे स्वाधीन होण्याची आशा, कारकून व शिपाई यांना सुरक्षित येऊ देण्याबद्दल आपटे यास लिहावयाचे पत्र याबद्दल सूचना, इ. स. १७९६-१८१८ (७६४०).

**मुरार गुंडाजी—दादा**× : देवजी व कान्होजी तापकीर याजकडील घोड्यांच्या गणतीची यादी रवाना, इ. स. १७६१-७२ (७६८०).

**मोरो पंताजी—मोरोपंतदादा*** : तीर्थरुपांनी तांदळावर घेतलेल्या ऐवजापैकी पाठविलेल्या तांदळाबद्दल व जिरेसाळ न पाठविल्याबद्दलचा खुलासा (७६६०).

**मोरो बाबूराव—बाबूराव*** : चंद्रसेन खुळे याजकडे पोळच्याच्या विद्यमाने येणाऱ्या ऐवजाच्या दिलेल्या वरातीचा ऐवज न आल्याबद्दल निवेदन (७६६१).

**मोरो रघुनाथ मेहेंदळे—सखोपंत सुभेदार*** : ब्राह्मणवलीकडील भाक्यावर असलेले घोसाळकर आसामी सुभ्यास गेल्यामुळे तेथे दुसरे लोक नेमण्याबद्दल विनंती (७६४४).

**मोरो हरि—हरिपंत*** : पदमसिंग पिसाळ देशमुख याजकडून खुनाच्या गुन्हेगारीबद्दल यावयाच्या ऐवजाची करारयादी व सदाशिवपंत भोळे याचा निशेचा कागद नारोपंतनाना याजकडील व्यापकाकडील त्यासंबंधीच्या जामीन कतब्याची मागणी, इ. स. १७७४-१७९५ (७५२२) ; —**दादा**× : सोनगांवडे मिटगव्हाणकर, राम गावडे मिठबावकर व रामजी मिठबावकर यांच्या जातीच्या तंट्यात सोनजी व रामजी यांच्या बाजूने योग्य न्याय मिळण्यासाठी या दोघांना मदत करण्याबद्दल सूचना, इ. स. १७७४-१७९५ (७६३८) सदाशिवपंत व बळवंतराव परांजपे यांच्या नेवरे येथील पोतदारीच्या तंट्याबद्दल हरचिरी येथील लोकांच्या द्यावयाच्या साक्षीबद्दल सूचना, इ. स. १७७४-१७९५ (७६८२).

**येसाजी गोपाळ—राघोपंतदादा*** : आप्पाजीपंत यास ऐवज आदा, (७५४९) ; पाठविलेल्या पत्रांचा तपशील, इ. स. १७९६-१८१८ (७५७८)

**येसाजी नन्हेर—रावसाहेब** (माधवराव बल्लाळ) : जाटांची, फौज अटेरी येथे व गुजरांची फौज जयनगर येथे असल्याबद्दल व फौजेच्या तलबेसाठी झालेल्या दंग्याबद्दल विनंती, इ. स. १७६१-७२ (७६४९).

**रंगो खंडेराव—नाना स्वामी**× : जमीनदारासह रुजवातीचे कागदपत्र घेऊन येण्याच्या आज्ञेबद्दल खुलासा, (७५३२).

**रघुनाथ आनंदराव दिवाण—गोविंद काशीराव** : बीड येथील चौथाईपैकी पथकाच्या नेमणुकेच्या ऐवजाची पोच, (७६०१).

**रघुनाथ शिवराम—आप्पा**× : अयावर्दीखान दिवाण याने नबाब नासरजंग याच्या लष्करात अन्वरुल्लाखान यास पाठविलेल्या पत्रांच्या जाबाप्रमाणे वर्तन करण्याबद्दलचा अयावर्दीखान याचा विचार, इ. स. १७२०-४० (७५२०) (अपूर्ण).

**राघो कृष्ण —तात्या**× : पांडुरंग बाबूराव याच्या शहाजी राळेकडील कर्जाऊ ऐवजाच्या तंट्याचा निकाल करून सत्वर येत असल्याबद्दल विनंती, (७६६३).

**राघो दादाजी घाणेकर—गोविंदपंत आगाशे** : कृष्णाजी महादेव याजकडील कारखान्याच्या लोकांच्या रोजमुऱ्याबद्दल विनंती, इ. स. १७६१-१७७२ (७६८९).

**रामचंद्र तकुदेव—दादोपंत*** ; मुलीच्या लग्नाचे आमंत्रण, इ. स. १७४०-६१ (७५४२).

**रामचंद्र शंकर—मोरोपंतदादा*** ; हरिपंत तात्या (फडके), परशरामभाऊ (पटवर्धन) यांची भेट, परशरामभाऊ यांनी शिवाजीपंत व गंगाधरपंत यांना दिलेली पत्रे गोपाळराव याजकडे रवाना, इनामाबद्दल परशरामपंत याच्या नावे सरकारचे पत्र देण्याची विनंती, इ. स. १७७४-९५ (७६५९).

**रामचंद्र सावंत—सदाशिव रामचंद्र** : पंतप्रधानांकडील पत्रोत्तरांची पोच, प्रधानाकडे पत्रे रवाना, मनसब्याच्या साहित्याबद्दल पांडुरंग व जिवाजी विश्राम यांची पत्रे प्रापकास रवाना (७५३३).

**रामभट कर्वे—हरिपंत तात्या*** : वीरेश्वर यांच्या गांवाच्या मोकळिकेबद्दल विनंती (७६००).

**रामशास्त्री*—महिपतराव*** : नारो जनार्दन खोत यांच्या अंताजी डोंगरे, रामाजी घाणेकर यांच्याशी असलेल्या चिद्रवली येथील वतनतंट्यामुळे अमानत असलेल्या खोतीच्या ठिकाणांचा अंमल नारो जनार्दन याजकडे चालविण्याबद्दल आज्ञा, इ. स. १७६१-७२ (७६११).

**रामाजी शितोळे—नानासाहेब**× : सरंजामाअभावी सेवेंत अंतर पडल्याबद्दल दिलगिरी (७६७९).

**रेणको अनाजी—दादासाहेब**× ; कुशलतेचा समाचार, इ. स. १७६१-७२ (७६८५) (अपूर्ण) ;

**लक्ष्मण विश्वनाथ—आप्पा** (चिमणाजी बल्लाळ) ; लोहगडच्या बेगमीस भात व ठरविलेल्या दराप्रमाणे नागलीचा ऐवज यांची लोहगडाकडे तजवीज करण्याबद्दल वासुदेव जोशी यास पत्र लिहिण्याची विनंती, इ. स. १७२०-४० (७६८८).

**लक्ष्मणराव नागनाथ—नाना**× : नगरहवेली येथील गांवांची वसुली व जेऊरचे ठाणे घेतांना जखमी झालेल्या गारद्यांना खर्चास द्यावयाचा ऐवज याबद्दल निवेदन, १२ जिल्हेज, सु. ११८९/१३ सप्टें १७८८ (७५५७).

**लालखान पन्ही—बाबासाहेब**× : सरकारांतून घेतलेल्या ऐवजाचा फडशा करण्याबद्दल कबुली, भाद्र. व. ३, श. १७३५/१३ सप्टें. १८१३ (७५१६).

**विठ्ठल उपाध्ये—बळवंतराव मोघे** : ठरविलेल्या बेताबद्दल पत्र रवाना, इ. स. १७७४-१७९५ (७६२६).

**विठ्ठल मुकुंद—दादासाहेब**× : श्रीत्र्यंबकेश्वराकडे गेल्यामुळे वाटत असलेली चिंता व शहाजीराव सुपेकर याचे प्रापकास पत्र याबद्दल निवेदन (७५६०).

**विनायक बाबाजी—भिकाजीपंत जोगळेकर** : शिवरामपंत पेंडसे यास खर्चास ऐवज देण्याची विनंती, इ. स. १७९६-१८१८ (७६०२) ; काशीनाथपंत याची रवानगी, गाडगीळ व गोखले यांना झालेले तगादे वगैरे कलमांचा तपशील (७६०३).

**विष्णु जनार्दन कोल्हटकर—भिकाजीपंत दादा*** : बाबाजीपंत जोशी याजकडून घेतलेल्या ऐवजाबद्दल व जामदारखान्यांत जात असल्याबद्दल निवेदन, इ. स. १७९६-१८१८ (७५८४).

**विष्णु राम—रामरावदाजी *** : सिदाप्पा शेटी यास द्यावयाच्या ऐवजाबद्दल विनंती, पौष शु. १, श. १६७५/२५ डिसें. १७५३ (७६४८).

**विसाजी आप्पाजी—तात्या**× **व आबा**× : यजमान स्वामींचे बारामती येथून नगर येथे आगमन व तेथून टोक्यास देवदर्शन घेऊन श्रीमंतांच्या भेटीस येत असल्याबद्दल यजमानाचे पत्र रवाना (७५४३).

**विसाजी केशव—महादजीपंत सुभेदार**; वाडे येथील महाजनकीबद्दल गणेशभट केळकर याने निवेदन केलेला मजकूर (७६६५) (अपूर्ण) (नक्कल).

रुमाल क्र. १६ पुडके क्र. ५ का. सं ८८(८१७३-८३६०)
सु. सं. ११९० इ. स. १७८९-९०

**आज्ञापत्रें :(मल्हारराव नरसी यांची खालील लोकांना आलेली) (कृष्णराव साळोंखे याच्या सनदी जमिनीवरील देशमुखी व सरदेशमुखी वसुलीच्या जाबसालास वाटेकऱ्यास कऱ्हाड येथे पाठविण्याबाबतची,** या सर्व पत्रांचा काल-साबान, सु. ११९१/मार्च-एप्रिल १७९१ असा आहे)

**निगडी**:(८१७३); **वाहवली**:(८१७४); **गोंदी** :(८१७७); (८२५०) **वेणेगांव**:(८१७८); **प्रांत कऱ्हाड**:(८१७९); **मनू**:(८१८१); **कोडोली**:(८१८३); **कोपर्डे**:(८१८७); **कासील**:(८१८८); **खेडद**:(८१८९); **कवठे** : (८१९०); **गारवे** : (८१९१) ; **मारूल** : (८१९२) ; **विहे**: (८१९३); **सेणे** :(८१९४); **हलगांव** :(८१९६); **कारवे** :(८२०२); **बिचुद** :(८२०३); **कुरली** :(८२१२); (८२४१); **टेंभू** :(८२२२); **नावडी** : (८२३१); **निसरे** :(८२३२); **सांगवड** :(८२३३); **मुटे** : (८२३९); **वादेकरी** :(८२४०); **सुपने** :(८२४९); **कसबे कऱ्हाड येथील मोकदम यांना** :(८२५५); **(मागील हिशबाच्या फडशासाठी कुलकर्णी कऱ्हाड येथे पाठविण्याबाबत)**

**चांदोली घेरा** : ३ ज. वल, सु. ११९१/८ जानेवारी १७९१ (८१८०); **वराडे** : १३ साबान, सु. ११९१/१७ एप्रिल १७९१ (८१८५); **वडोली** : १३ साबान, सु. ११९१/१७ एप्रिल १७९१ (८१८६);

**चिखलवहाळ** :५ साबान, सु. ११९१/९ एप्रिल १७९१ (८१९८); **येडे** :५ साबान, सु. ११९१/ ९ एप्रिल १७९१ (८१९९) ; **येलावी** : १२ र. वल, सु. ११९१/२० नोव्हेंबर १७९० (८२००);

**बुरली** : १७ र. खर, सु. ११९१/२४ डिसेंबर १७९०(८२०१); **पाडळी** : १७ साबान, सु. ११९१/ २१ एप्रिल १७९१ (८२०४); **साल सिरवे** : २८ साबान, सु. ११९१/ २ मे १७९१ (८२०५); **गोळेश्वर** : १५ रमजान, सु ११९१/१९ मे १७९१/ (८२०६); **कवठे** : सु. ११९१/ इ. स. १७९०-९१ (८२१३).

**आज्ञापत्रें—(मल्हार नरसी यांची खालील लोकांना आलेली)**

**तलबीड** : २३ साबान, सु. ११९१/२७ एप्रिल १७९१ (८२१४); **घोटी** : ३० रजब, सु. ११९१/५ एप्रिल १७९१ (८२१५); **कोकित्सरे** : २० साबान, सु. ११९१/२४ एप्रिल १७९१ (८२१६); **मरळी**: २० साबान, सु. ११९१/२४ एप्रिल १७९१ (८२१७); **सिरटे** : ९ साबान, सु. ११९१/ १३ एप्रिल १७९१ (८२२०); **कापील** : १५ रमजान, सु. ११९१/१९ मे १७९१ (८२२३); **दरूज** : २४ साबान, सु. ११९१/२८ एप्रिल १७९१ (८२२६); **सोवली**; ५ साबान, सु. ११९१/९ एप्रिल १७९१ (८२२८); **काखे** : ८ ज. वल, सु. ११९१/१३ जानेवारी १७९१ (८२३४); **हिंगणगाव** : ६ साबान, सु. ११९१/१० मे १७९१ (८२३७); **कुसूर** : ३ ज. वल, सु. ११९१/८ जानेवारी १७९१ (८२४३); **इंग**: ७ ज. वल, सु. ११९१/१२ जानेवारी १७९१ (८२४४); **पाटवडे**; ३ र. खर, सु. ११९१/१० डिसेंबर १७९० (८२४७); **वायकल** : २३ र. खर, सु. ११९१/३० डिसेंबर १७९० (८२४८) **शेर** : ३० रमजान, सु. ११९१/१४ जून १७९० (८२५१); **कुरोली** : २० साबान, सु ११९१/२४ एप्रिल १७९१ (८२५२); **खटाव** : २० साबान, सु. ११९१/२४ एप्रिल १७९१ (८२५३); **घोटी खुर्द** : ३० रजब, सु. ११९१/५ एप्रिल १७९१ (८२५६); **तलबीड** : १४ रमजान, सु. ११९१/१८ मे १७९१ (८२५९); व **हलगाव येथील मोकदम यांस** : २८ र. खर, सु. ११९१/४ जानेवारी १७९१ (८२६०).

**आज्ञापत्रे—चालू** :

**[ कर्जपट्टीच्या वसुलापैकीच्या ऐवजाची मागणी ]**

**विंदे** : ८ सवाल, सु. ११९१/२० जून १७९० (८१७५); **रूई** : १७ साबान, सु, ११९१/२१ एप्रिल १७९१ (८२२१); **वाठार** : ६ रमजान, सु. ११९१/१० मे १७९१ (८२३५); **नेरले** : १ सवाल, सु. ११९१/१५ जून १७९० (८२४२) व **कासार-सिरव येथील मोकदम** : १ ज. वल, सु. ११९१/६ जानेवारी १७९१ (८२४६) ; **नाईकजी याजकडील वाटेकरी**: बाजीराव साळोंखे याजकडील मोबदला ऐवजाच्या वसुलीबाबत, १६ साबान, सु. ११९१/२० एप्रिल १७९१ (८१७६); **गणोजो भोसले याजकडील वाटेकरी** : भोसले याजकडील कर्ज-पट्टीचा ऐवज भरण्याबाबत, सु. ११९१/इ. स. १७९०-९१ (८१८२) **सरटेकर वाटेकरी** ; गडनीस याजकडील जप्त केलेल्या जमिनीच्या ऐवजापैकी काही ऐवज पाठवून देण्याबाबत, १९ साबान, सु. ११९१/२३ एप्रिल १७९१ (८२१९) ; **नायेगांवकर, मोकदम** : नारो शंकर याचा जप्त केलेला ऐवज भरण्याबाबत, १७ साबान, सु. ११९१/२१ एप्रिल १७९१ (८१८४); **शेटयाची डुबल याजकडील वाटेकरी** : सनदापत्रे दाखवीपर्यंत शेटयाजी डुबल याजकडील जमिनी जप्तीत ठेवण्याबाबत, १० साबान, सु. ११९१/ १४ एप्रिल १७९१ (८१९५); **नरसीपूरकर मोकदम** : सिरसी येथील गडनिसाच्या जप्त केलेल्या ऐवजातून कुळास ऐवज देण्याबाबत, १९ साबान, सु. ११९१/२३ एप्रिल १७९१ (८२१८) ; **जानोजी सेटगे** : नारो निंबाळकर यास कराराप्रमाणे ऐवज देण्याबाबत, ५ साबान, सु. ११९१/९ एप्रिल १७९१ (८२३६); **पुसेगांवकर मोकदम** : पुसेगाव येथील फडतरे देशमुख याच्या वसुलातील बाकी निघालेल्या ऐवजाची निशा करण्याबाबत, २३ साबान, सु. ११९१/२७ एप्रिल १७९१ (८२३८); **बहुलेकर मोकदम** : कराराप्रमाणे दहकाच्या कसरेबाबतचा ऐवज जगन्नाथ कृष्ण याजकडे देण्याबाबत, ८ ज. वल, सु. ११९१/१३ जानेवारी १७९१ (८२४५); **भगवंत नरसी याजकडील वाटेकरी** : भगवंत नरसी याने बिचूद येथील इनाम जमिनीच्या ऐवजाच्या हिशेबाचा फडशा न केल्यामुळे त्यास न देण्याबाबत, १४ ज., खर, सु. ११९१/१८ फेब्रुवारी १७९१ (८२५७); **व्यंकाजी कुलकर्णी** : तारगांव येथील हिशेबाच्या फडशाकरितां येण्याबाबत, ७ रमजान, सु. ११९१/११ मे १७९१ (८२५८).

**माधवराव काटे याजकडील देशमुखी व सरदेशमुखी वसुलीसाठी वाटेकरी कऱ्हाड येथे पाठविण्याबाबत—नाडोली**—२४ साबान, सु. ११९१/२८ एप्रिल १७९१(८२०७) (८२१०) ; **मंदरूल** : २४ साबान, सु. ११९१/२८ एप्रिल १७९१(८२०८) ; **निसरे** : २४ साबान, सु. ११९१/२८ एप्रिल १७९१ (८२०९) ; **बेलवडे** : २४ साबान, सु. ११९१/२८ एप्रिल १७९१ (८२११) ; **सांगवड** : २४ साबान, सु. ११९१/२८ एप्रिल १७९१ (८२२४); **नाडे** : २४ साबान, सु. ११९१/२८ एप्रिल १७९१ (८२२५) व **विहे येथील मोकदम यांना** : २४ साबान, सु. ११९१/२८ एप्रिल १७९१ (८२२७).

**कर्जपट्टीच्या वसुलीसाठी सुमंत याजकडील नाडगौडकीची जप्ती**

येलगाव—१ ज. खर, सु. ११९१/५ फेब्रुवारी १७९१ (८२२९); **कुंभारगाव** : १ ज. खर, सु. ११९१/५ फेब्रुवारी १७९१ (८२३०); व **कासील येथील मोकदम** : १ ज. खर, सु. ११९१/५ फेब्रुवारी १७९१ (८२५४);

**रोखा** :

मल्हार **नरसी—रामाजी बहिरव कुलकर्णी** : जिवाजीपंत सिरटेकर याच्याकरिता त्वरित कऱ्हाड येथे येण्याबाबत, ९ साबान, सु. ११९१/१३ एप्रिल १७९१ (८१९७).

**रुमाल क्र. १६ पुडके क्र. ६ का. सं. ७२ (८२६१-८३३२)**
**सु. स. ११४१-११६५ इ. स. १७४०-१७६५**

**अर्ज :**

**फत्तेखान***—( – ) : मुंबई बंदराहून हबशी बटकीस आणण्यासाठी अटकाव न करण्याबद्दल विनंती, ४ रमजान, सु. ११५९/ २ मे १७५९ (८३१४).

**ताळेबंद :**

पंतप्रधान (बाळाजी बाजीराव) यांजकडील खर्चाचा, सु. ११४५/ इ. स. १७४४-४५ (८३२०).

**पत्रें :**

**आनंदराव***—**तमण्णा नाईक** : सव्याज कर्जफेडीबद्दल आश्वासन, कार्तिक शु. १, श. १६७९/ १२ नोव्हेंबर १७५७ (८३१५).

**पंतप्रधान** (बाळाजी बाजीराव)—**कमाविसदार व चौकीदार** : महादजी मोहिते व लक्ष्मण कंगोरे यांना रघुनाथपंत यांजकडे सामान नेण्यास अटकाव न करण्याबद्दल, १९ साबान, सु. ११५४/ २१ जून १७५३ (८३२९) : माळव्याहून वतनी गांवास जाण्यास बाजी पाटील यास अुपद्रव न देण्याची आज्ञा, १५ जिल्हेज, सु. ११५४/१३ ऑक्टो. १७५३ (८३३०); माधवराव लखमाजी यास उदेपूरपर्यंतच्या प्रवासात मदत करण्याबद्दल, २४ साबान, सु. ११५७/ १३ मे १७५७ (८३३१).

**बाळाजी बाजीराव** (प्रधान)—**देशमुख देशपांडे परभणी लोहगाव वगैरेचे** : घासदाण्यांच्या खंडणीकरिता त्वरित हुजूर येण्याची आज्ञा, १३ सफर, सु. ११५३/२० डिसें. १७५२ (८२६१-८२८५) ; **बाबूराव माणकेश्वर** : दौलामिया याच्या पुत्राकडे कोलगांव येथील जहागिरी अंमल १६ र. वल, सु. ११५३/ २२ जाने. १७५३ (८२८६); **रघुनाथ पटवर्धन** : बळवंतराव वैद्य याजकडे ऐवज देण्याची आज्ञा, इ. स. १७४०-१७६१ (८३३२).

**मलजी पाटील वाघ—महाराज** : रांजणी येथील वतनास यमाजी व सुलबाजी वाघ यांच्याकडून होणाऱ्या उपद्रवाच्या बंदोबस्ताबद्दल विनंती (८२९०).

**शेख काळू—त्रिंबक बाळाजी** : घोडाविक्रीस कोणी हरकत घेतल्यास जाब देऊ म्हणून सूचना, १८ जिलकाद, सु. ११५४/ १६ सप्टेंबर १७५३ (८३१३).

**[ फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली ]**

**काईमखान**—( – ) : भालदाराच्या खुनाबद्दल न्यामतवाला यास कैद केल्याबद्दल खुलासा, १९ सफर, सु. ११५१/७ जाने. १७५१ (८३१०).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]**

(—) - **धनशेट करंजे** : नारो केशव याजकडे अहमदाबाद येथील मामलतीची कारकुनी, ८ ज. खर सु. ११५३/१३ एप्रिल १७५३ (८३१८).

**[ प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली ]**

सिरोलीकर नीलोजी पाटील मोकदम यांच्या वतनी इनामास नारोपंत शिदौरे व नारो त्रिंबक देशमुख यांजकडून होणाऱ्या उपद्रवाच्या बंदोबस्ताबद्दल विनंती, १ सफर, सु. ११६०/२३ सप्टेंबर १७५९ (८२८७); नदीनाल्यावर पर्जन्याकाळी अटकाव होऊ नये म्हणून दस्तकांची मागणी, २३ सवाल, सु. ११६०/ २२ जून १७५९ (८२८८); खरेदी केलेल्या गाई नेमाड-खानदेशांतून आणण्यासाठी जकातीच्या दस्तकाची

**पत्रें—चालू :**

मागणी, २ मोहरम, सु. ११६०/२६ ऑगस्ट १७५९ (८२८९); त्रिंबक नरहर याजकडे रावेर येथील बाबतीची मजमू, २० ज. वल, सु. ११५०/ १७ एप्रिल १७५० (८२९३); सोलनिभोर येथील जमीनदारांच्या वतनतंट्यासंबंधी, मु. ११५१/इ. स. १७५०-५१ (८२९६); किरकोळ मजकूर, ७ मोहरम, सु ११५१/२६ नोव्हेंबर १७५० (८२९७); पिंपळवाडी येथील मोकदमीच्या वतनास येसपाटील याजकडून होणाऱ्या उपद्रवाच्या बंदोबस्ताबद्दल, सु. ११५१/ इ. स. १७५०-५१ (८२९८); मिठावर घेतलेल्या जकातीबाबत, १९ मोहरम, सु. ११५१/ ८ डिसें. १७५० (८३०९); भालगांवाहून तेल, तूप सासवड येथे आणण्यासाठी त्रिंबक सदाशिव यास दस्तक, १४ र. वल, सु. ११६०/५ नोव्हें. १७५९ (८३१२); मीर अजरुमखान याच्या नेमणूकेबाबत (८३१६); काल्पी येथील मामलतीसंबंधी, ११ सफर, सु. ११६०/३ ऑक्टो. १७५९ (८३२६).

**याद्या :**

खास चौकीच्या प्याद्यास दिलेल्या कापडाची सु. ११५६/ इ. स. १७५५-५६ (८३०१) ; आलेगाव येथे पाठविलेल्या कापडाची, २४ जिल्हेज, सु. ११५५/ १२ ऑक्टो. १७५४ (८३११); चिटको राम याजकडील सायरपट्टीच्या हिशेबाची, ८ ज. खर, सु. ११४३/ ३० जुलै १७४२ (८३१९); हिरोज पाटणकर यास दिलेल्या कापडाची, २ मोहरम, सु. ११५१/ २१ नोव्हें. १७५० (८३२१); गोपाळराव गोविंद व गोविंद हरि यांच्याकडील घासदाण्याची, २४ सफर, सु. ११५३/३१ डिसें. १७५२ (८३२२); १३ सफर, सु. ११५३/ २० डिसें १७५२ (८३२३); गुंडेवाडी येथील कुळांकडून येणे असलेल्या ऐवजाची, सु. ११५२/ इ. स. १७५१-५२ (८३२४); विठ्ठल शिवदेव यास द्यावयाच्या दस्तकांची, २४ र. खर, सु. ११५४/ १७ फेब्रु. १७५४ (८३२५); कृष्णाजी माधवराव यांच्या तोफखान्यातील जमेची, सु. ११६५/ इ. स. १७६४-६५ (८३२८).

**रसानगी याद्या :**

नवलोजी कदम याच्या कोपर्डे येथील पाटीलकीचे वतन सुरळित चालू ठेवण्याबद्दल, १२ सफर, सु. ११६०/४ ऑक्टो. १७५९ (८२९१); उरपाड येथील पळून गेलेल्या जमीनदारांस आबादानीसाठी अभयपत्र (८२९२); त्रिंबक विश्वनाथ व यशवंत धायभर यास दस्तकें देण्याबाबत, ८ जिलकाद, सु. ११५०/९ ऑक्टो. १७४९ (८२९४),-(८२९५); शंकराजी महादेव यास सामील होऊन मुलुखगिरी करण्याबद्दल, अहमदाबाद येथे उपद्रव दिल्याबद्दल कोळ्यांना ताकीद करण्याबद्दल महंमदखान बाबी खेडेकर यास द्यावयाचे ताकीदपत्र, १० मोहरम, सु. ११५४/६ नोव्हें. १७५३ (८२९९); कृष्णाजी बाबूराव वकील यास परगणे सावलदबारे येथील मोकासा देण्याबद्दल, सु. ११५५/इ. स. १७५४-५५ (८३००); शाबाजी धारगे याची मुलगी भगवंतराव निकम यास देण्याबद्दल, २८ रमजान, सु. ११५९/ २६ मे १७५९ (८३०२); महिपतराव चंदो यांची वतने पूर्ववत् चालविण्याबद्दल, आप्पाजी चंदो याने अबदड येथील केलेल्या लावणीच्या वसुलीबाबत ताकीद करण्याबद्दल, ७ जिलकाद, सु. ११५४/ ५ सप्टें. १७५३ (८३०३); बाबा दीक्षित गिजरे यांच्या पांचमोरी या इनाम गांवास दाजीपंत यांच्या कुरणामुळे होणाऱ्या उपद्रवाच्या बंदोबस्ताबद्दल ताकीद करण्याबाबत, १० सफर, सु. ११६०/२ ऑक्टो. १७५९(८३०४); नरवेल या मोकाशाच्या गांवास आप्पाजी राम व विसाजी विष्णु यांजकडून वसुलीस होणाऱ्या उपद्रवाबद्दल त्यांना ताकीद करण्याविषयी, १४ र. वल, सु. ११५६/१८ डिसे. १७५५ (८३०५); परगणे उरपाड येथील परागंदा झालेल्या जमीनदारांस अभय देऊन लावणी करण्याबद्दल निवेदन, ९ जिलकाद, सु. ११६०/५ जुलै १७५९ (८३०६); नंदुरबार येथील हिश्श्याबाबत त्रिंबक अमृत बांडे यास ताकीद करण्याविषयी, १५ ज. खर, सु. ११५९/ १४ फेब्रु. १७५९ (८३०७); जयसिंगराव शिर्के यांच्या भूम येथील मोकाशाचा वसूल सुरळीत देण्याबद्दल

रसानगीं याद्या–चालू :

जमीनदारांस ताकीद करण्याबाबत, ५ रजब, सु. ११५९/ ५ मार्च १७५९ (८३०८); जानोजी निंबाळकर यास कोकणांतून तांदूळ आणण्याकरिता दस्तके देण्याविषयी, १३ ज. वल, सु. ११५६/ १४ फेब्रु. १७५६ (८३१७); दौलतराव व बायाराव यांच्या मांडवे येथील इनाम जमिनीच्या हिश्यासंबंधी, ११ सफर, सु. ११६०/३ ऑक्टो. १७५९ (८३२७).

रूमाल क्र. १७ पुडके क्र. १-३.

**पुडके क्र. १; का. सं. १३६ (८३३३-८४६८).**

**सु. स. ११५१-१२१७ इ. स. १७५१-१८१७**

**आज्ञापत्र :**

**पंतप्रधान** (बाजीराव रघुनाथ)– **पवार*** : महिपगतड व भूषणगड किल्याच्या सरंजामी महालांच्या कमाविशीवर सदाशिव माणकेश्वर याची नेमणूक, सु. १२१२/इ. स. १८११–१८१२ (८३६७).

**कतबे :**

**येडगांवकर शेरीकर मोकदम––राघोपंतदादा गोडबोले :** करून दिलेल्या मसुद्याप्रमाणे कागद करून देण्यासंबंधी, माघ शु. १३, श. १७२५, फ. १२१३/२४ जाने. १८०४ (८३९२).

**त्रिंबक भुजंगे––बसाप्पा*** : कर्जाच्या परतफेडीबद्दल, ९ वल, फ. १२१०/ १ ऑगस्ट १८०० (८३९४) (नक्कल).

**शिवभट गोखले––काशीबाई बालटी :** राहिलेल्या कर्जफेडीबद्दल, मार्ग व. १४, श. १७२६/ ३० डिसें. १८०४ (८३९६), (नक्कल)

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेले]

आणावा नाईक याजकडे रामजी शामजी कुलकर्णी याची गहाण ठवलेली भांडी नाईक देत नसल्याबद्दल, १ जिल्काद श. १७२९/ ३१ डिसें. १८०७ (८३९५).

**कबजे– :**

**मकाजी फिरंगोजी बंडगर–– कृष्णाप्पा नाईक :** चांद कवठे येथील रसदेएवजी गणपतराव वाघमारे याच्या वरातेच्या ऐवजाचे २६ र. खर, सु. १२११/ २० मे १८११ (८३८९)

**शेख कादर––कृष्णाजीपंत लोहकर :** बाबा दामले याच्या ऐवजाची, २३ र. खर, सु. १२१२/ ५ मे १८१२ (८३९१).

**शेख फत्तूभाई––राघोपंत निा केदारजी शिंदे :** पाठविलेली बांजरी, २० रमजान, सु. १२०३/ १५ जाने. १८०३ (८३९७).

**करारयाद्या :**

प्रभू नीलगर याच्या सखाराम नाईक बेलापूर याजवर घेतलेल्या हुंडीच्या वसुलीबद्दल, २४ र. वल, सु. १२१५/ ६ मार्च १८१५ (८४११) (नक्कल); तर्फ लोखंडी येथील कौलावणीसंबंधी, सु. १२१२/ इ. स. १८११–१८१२ (८४२२).

**कौकलनामा :**

**बापू पंडित––सदाशिवराव तात्या व महादजी गायकवाड :** इंदापूरमधील इनाम जमीन कौलाने लावून दिल्याबद्दल, माघ शु. १ फ. १२२१/ १५ जाने. १८१२ (८३८७) (नक्कल).

**जबान्या :**

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेल्या]

**शंकरराव विचारे**(–) : दामोदर पाध्ये गुर्जर सरकारातून आणलेल्या भाताच्या चिठ्यांबद्दल, सु. १२१२/ इ. स. १८११-१८१२ (८३९०).

**भगवंतजी खंडोजी पानसरे**––( – ) : सासऱ्याच्या मृत्यूनंतर बहिणीची नातसून मिऱ्या डोंगरावर पोहोचविली तेव्हां तिची वस्तभाव न आणल्याबद्दल, पौष शु. ९, श. १७३८/ २८ डिसें. १८१६ (८४०१).

**जबान्या– चालू :**

**देवप्पा निर्जलिगप्पा**–– (–) : उकळी येथील दलवाईपणाच्या वतनाबद्दल, १२ ज. खर, सु. १२११/ १५ जुलै १८१० (८४२३).

**टिपण :**

ओतूर येथील वसुलीच्या बाकीबद्दल, सु. ११९८/ इ. स. १७९७-९८ (८४५७).

**तेरीज :**

पट्यांच्या वसुलीसंबंधी, सु. १२१५/ इ. स. १८१४-१५ (९४०९),

**दस्तकें :**

**पंतप्रधान**–– (बाजीराव रघुनाथ) ––**क माविसदार चौकीदार वगैरे :** सरकार कामासाठीं गेलेल्या प्यादांना सर्व प्रकारें मदत करण्याची आज्ञा, २१ जिल्हेज, सु. ११९७/ २७ जून १७९६ (८३७८-८३८१); अंताजी बल्लाळ कारकून यास कोकणांतून तांदूळ खरेदी करून आणण्यासाठी जकातीचे, १० साबान, सु. १२०१/ २७ डिसें. १८०० (८३८२).

**पत्रें :**

**अशरिफ अलीखाँ वारगीर––बाबासाहेब :** रोजमुरा ऐवजाची पोंच, श्रावण शु. ५ श. १७३४/ १२ ऑगस्ट १८१२ (८३४८).

**कृष्णाजी बल्लाळ सुभेदार––बाळाजीपंत पिंगळे :** बिरवाडीपैकी दिलेल्या खताचा कांही ऐवज देण्याची विनंती, २ सफर, सु. १२०२/ १४ जून १८०१ (८३३८) (नक्कल).

**कृष्णाजी बाबाजी जोशी––बापूसाहेब :** किन्हई येथील वसुलीबद्दल निवेदन व पुण्यास गेलेल्या पाटलाकडून ऐवज वसूल करण्याबद्दल विनंती, (८३४३); किन्हई येथील तिजाईच्या वसुलीबद्दल निवेदन, पाटणकर, वानवडीवर जाऊन उतरल्याची बातमी २५ मोहरम, सु. १२१७/ १५ डिसें. १८१६ (८३४४).

**केशव गोविंद सोवनी––बापू गोडबोले व आण्णा टिळक :** सदाशिवराव गायकवाड याच्या पागेपैकी जमा झालेला ऐवज पटात लिहून देणे अगर गणेशपंत याजजवळ देणें याबद्दल विनंती, साबान, सु. १२१३/ १५ ऑगस्ट १८१२ (८३३७).

**चिंतामणराव पांडुरंग––कुचीकर मोकदम :** कुची येथील रसद पोताजमा, ८ साबान, सु. ११९९/ १५ जाने. १७९९(८३३६). (तालिक).

**चिंतो राम जोगळेकर––बापूजीपंत चाफेकर :** तंबाखूची मागणी, भाद्र. व. १०, सु. १२०६/ १८ सप्टें. १८०५ (८३५१).

**जनोबा अभ्यंकर––बापूजीपंत अभ्यंकर :** दिनकरपंत पटवर्धन याच्या ऐवजाच्या यादीवर मखलाशी करून देण्याची तयारी व स्वारीच्या आगमनाबद्दल विचारणा, १६ सवाल, सु. १२१८/ ३० ऑगस्ट १८१७ (८३४२).

**नागोजी व रामजी मोरे रामजी खारे, धोंडू ढारलेकर–– विनायकपंत चाफेकर कुलकर्णी :** चाकरीसंबंधीचा करार, श्रावण व॥ ११, श. १७२८/ ८-९ सप्टें. १८०६ (८३९८)

**नारायणराव भट व गलांडे––रावजी बडवे :** कर्जाच्या परतफेडी बद्दल, चैत्र व. १३, श. १७३८/ २५ एप्रिल १८१६ (८३९३).

**नारायणराव राम––गणेशपंत सोमण :** कलापूर येथील देशपांडे-पणाच्या वतनाचे द्यावयाचे होन यशवंतखान सरनोबत यास देण्याची विनंती, ५ र. वल, सु. १२१२/ १९ मार्च १८१२ (८३४०).

पत्रे–चालू :

**परशराम कृष्ण जावडेकर—सदाशिवराव जावडेकर** : श्रीमहायात्रेस जाण्यासाठी घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबद्दल, माघ शु. २, फ. १२२१/ १६ जाने. १८१२ (८३८८) (नक्कल).

**बाजीराव रघुनाथ प्रधान—जामनेरकर जमीनदार**: वामनभट पाटणकर याच्या जामनेरमधील भाऊसाहेब यांजकडून मिळालेल्या जमिनीस उपद्रव न देण्याबद्दल ताकीद, १२ रमजान, सु. १२१७/ ७ ऑगस्ट १८१६ (८३६४); **–त्रिंबकजी डेंगळे** : पानगांव, काटी, मार्डी, महमदापूर, हळसंगी, तुळजापूर येथील स्वार, तोफखाना व नगारखाना यांच्या बेगमीस असलेल्या गणपतराव विश्वनाथ व यशवंतराव सखाराम याजकडील सरंजामी अंमलापैकी निम्या अंमलाच्या जप्तीवर नेमणूक, २० रजब, सु. १२०८/ २३ सप्टें. १८०७ (८३६८); **–परशराम रामचंद्र** ; शिलेदार वगैरेंकडे मुशाहिऱ्याबद्दल असलेल्या दुधारी व आईतवडे या गांवाची व दुधोंडीमधील जमिनीची जप्ती आबाजी महादेव यास सांगितल्याबद्दल आज्ञा, १४ सफर, सु. १२००/ १८ जुलै १७९९ (८३६९); **–रामराव आप्पाजी कमाविसदार, परगणे नाशिक** : नारो चिमणाजी याच्या ऐवजी गोपाळ बल्लाळ याची नाशिक येथील दिवाणगिरीवर नेमणूक, सु. १२०१/ इ. स. १८००-१८०१ (८३७०) (मसुदा); **–हवालदार व कारकून किल्ले कलानिधी** : बाळाजी रामचंद्र याच्या जागी महादजी नारायण याची ता कलानिधी येथील मामलतीवर नेमणूक, १० सफर सु. १२०१/ ३ जुलै १८००(८३७१) (नक्कल); **– व्यंकटराव-नारायण** : कृष्णराव भगवंत वढूकर याच्या खानदेशातील आसामींना महिन्याच्या अडीच आठवड्यांचा रोजमुरा देण्याची आज्ञा, ४ सवाल, सु. ११९८/ २३ मार्च १७९८ (८३७२); **–कमाविसदार, सरकार, संगमनेर** : मोर जोशी याच्या मृत्यूमुळे नाशिक व संगमनेरमधील जकातीपैकी रोज मिळणाऱ्या ऐवजाची नेमणूक गणेश जोशी याजकडे सुपूर्त, सु. ११९८/ इ. स. १७९७-९८ (८३७३); **– पाथरीकर जमीनदार** : भिवराव कृष्ण याजकडील पाथरी येथील सरदेशमुखीची मामलत सखाराम गणेश याजकडे सांगितल्याबद्दल आज्ञा, १५ साबान, सु. ११९८/ २ फेब्रु. १७९८ (८३७४);**–बीडकर जमीनदार** : भिवराव कृष्ण याजकडील बीड येथील बाबती, सरदेशमुखीची मामलत सखाराम गणेश यास सांगितली, १५ साबान, सु. ११९८/ २ फेब्रु. १७९८ (८३७५); **–सखाराम गणेश कमाविसदार मामले बीड** : त्रिंबक सदाशिव याजकडे बीड येथील पोतनिसी असून बीड येथील जहागिरी अंमल नबाबाकडे असल्यामुळे निम्मे वेतन कमी केल्याचे, १० जिल्हेज, सु. ११९८/२७ मे १७९८ (८३७६) ; **–कमाविसदार नाशिक** : मोर जोशी व चिंतामण जोशी यांना नाशिकपैकी मिळत असलेली नेमणूक गणेश जोशी याजकडे पूर्ववत चालविणे, सु. ११९८/इ. स. १७९७-९८ (८३७७) ; **–रामराव अनंत** : बापूजी बाबाजी सुकले हुजूर आल्याबद्दल १२ ज. खर. सु. ११९७/ १२ डिसें. १७९६ (८३८३); **–शामराव अनंत** : छत्रपती महाराजांकडील शागीर्दपेशाकडे कऱ्हाडपैकी असलेल्या गांव जमिनीबद्दल सरकारांत घ्यावयाचा ऐवज, सु. ११९८/ इ. स. १७९७–९८ (८३८४-८३८५).

**बापू × – बाळाजीपंत* सदाशिवपंत*** : ज्वारी व विड्याच्या पानांची मागणी, २ सवाल, सु. १२०७/ १३ डिसें. १८०६ (८३५०).

**बापूजी गणेश—डांगे, पतकी, ठाणे कडेगाव** : एक साली सरकारांत भरावयाच्या ऐवजापैकी भरमाजी पटेकर यास द्यावयाचा ऐवज पोता जमा करण्याची आज्ञा. ४ ज. खर, सु. १२१२/ २६ जून १८११ (८३३९).

**बाळाजी मकाजी—विठोजी गोरे** : शिवाराची जप्ती उठवून पाटील, कुलकर्णी गावांत आणून गांवची आबादानी करण्याबद्दल, बाबती, सरदेशमुखीच्या अंमलाबद्दल विनंती, १९ र. खर, सु. १२१६/ १९ मार्च १८१६ (८३६३) (नक्कल).



पत्रे–चालू :

**माहूत × —बाबासाहेब ×** : रोजमुऱ्याची पोच, श. १७३४/ इ. स. १८१२-१३ (८३४९).

**महादजी लक्ष्मण आपटे—केशवपंत बिवलकर** : मोर दीक्षित याच्या पत्राशिवाय कोळी व महार तिजाई अंमल देण्यास कबूल नसल्याबद्दल निवेदन व त्याबद्दलच्या बंदोबस्ताबद्दल विनंती, ३० मोहरम, सु. १२१७/ २० डिसें १८१६ (८३४५).

**रघुनाथदास* —बाळाजीराव (बाजीराव) पंतप्रधान** : अहमदनगर किल्याच्या आसपासच्या गांवांना उपद्रव न देण्याबद्दल पागेस ताकीद करण्याची विनंती, इ. स. १७५१-५२ (८३४७).

**रामचंद्र केशव एकबोटे × —रावजी** : लढाईच्या हत्यारांची पोच, माघ शु. १२, श. १७३८/ ३० जाने. १८१७ (८३८६).

**रामाजी भुजंग—राघोपंतदादा*** : जुन्नर येथील प्रीती कुणबिणीस घरासंबंधी उपद्रव न देण्याबद्दल खाजगीवाल्यांस ताकीद करण्याची विनंती, २५ र. खर, सु. १२००/ २६ सप्टें. १७९९ (८३४६).

**लक्ष्मण*—आण्णा ×** : घरगुती सामानाची मागणी व विठू गागण याचा ऐवज गोविंद किरवत याजकडे देण्याबद्दल विनंती, २७ रमजान, सु. १२१८/ ११ऑगस्ट १८१७ (८३५२-८३५६).

**विश्वनाथ बाबाजी—बापूसाहेब ×** : स्वारीच्या पुण्यास जाण्याच्या बेताबद्दल विचारणा, सावनूर व हुबळी येथून आलेल्या हुंड्या पुण्यास रवाना करणे व सावनूरमधील जोशी व जगताप यांच्या अंमलातील महालांची जोशी याजकडील कारकुनातर्फे करावयाची चौकशी यासंबंधी, ९ रमजान, सु. १२१७/ ४ ऑगस्ट १८१६ (८३४१).

**शेख भिकन बारमीर** : श्रावण शु. ५, श. १७३४/ १२ ऑगस्ट १८१२ (८३६५).

**सुराप्पा खिजमतगार** : श्रावण शु. ९, श. १७३४/ १६ ऑगस्ट १८१२ (८३६६) **व हरि शिंदे खिजमतगार – बाबासाहेब ×** : रोजमुरा ऐवजाची पोच, आषाढ व. १४, श. १७३४/ ६ ऑगस्ट १८१२ (८३६७अ)

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली]**

**महादजी शेवगीर(–)**वामनराव तात्या याचे नांव न सांगता बापू पंडित याच्या नांवावर दिगंबर दिक्षीत याजकडे तगाद्यास बसल्याबद्दल निवेदन, मार्ग व, ९, सु. १२१७/१३ डिसें. १८१६ (८४००).

**येसाजी शिवराम—( – )** : वाई येथे बाबाजीभट नरवणे यास पत्र रवाना, तळेवाडी येथील रानांत चोरांनी माणूस मारल्याबद्दल सचिवांकडील कारभाऱ्यांनी तलेवाडीकर धरून नेल्याबद्दल निवेदन व त्याच्या बंदोबस्ताबद्दल विनंती, १९ सफर, सु. १२१७/ ८ जाने. १८१७ (८३६२).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]**

**(—) – आकुर्डीकर मोकदम** : रामजी पाटील सरकारची लांकडे आणण्याजाठीं जात असतां त्यास दिलेल्या उपद्रवाच्या चौकशीसाठीं पुण्यास येण्याची आज्ञा. ३ सफर, सु. १२१७/२३ डिसें. १८१६ (८३३४).

**(—) – आप्पाजी भगवंत** : मामलतींचा ऐवज हुजूर पोताकडे जमा करण्याची आज्ञा, २९ र. खर, सु. १२१७/१८ मार्च १८१७ (८३३५) (नक्कल).

**(—) – नागांवकर मोकदम** : नागांवपैकी कडबा, चरसा, आंबाडी वगैरे जिन्नस सांगली येथील पागेकडे पाठविण्याची आज्ञा, १५ र,. वल, सु. १२१६/ १४ फेब्रु. १८१६ (८३३३).

पत्रे—चालू :

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]

(--) -**बळवंतराव देशपांडे** : सरकारच्या ऐवजाबद्दल विचारणा, (८४०६) (फाटकें).

(--) -**सालसीकर गांवकरी व मिरासदार** : नारो सदाशिव गुलगुले याजकडे उडदाची रवानगी, २० जिल्हेज, सु. १२१७/ ११ नोव्हें. १८१६ (८४३१) (नक्कल).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]

किल्ले बिरवाडी येथील हवाल्याच्या नेमणुकीबद्दल विचारणा, ९ र. खर, सु. १२००/१० सप्टें. १७९९ (८४०२); गुजर यांजकडील येणे असलेल्या ऐवजाबद्दल खुलासा, १५ जिल्हेज, सु. १२०३/ ८ एप्रिल १८०३ (८४०७).

पावती :

**जगन्नाथ हजारी—सुभानजी गेनाप्पा** : पोटगीच्या ऐवजाची पोच, १७ र. खर, सु. १२०६/ १५ जुलै १८०५ (८३९९).

फरोक्त चाबता :

कृष्णाजी बल्लाळ याच्यातर्फे बिरवाडीपैकी लोकांना दिलेल्या गल्याचा तपशील, सु. १२०२ /इ. स. १८०१-१८०२ (८४५८-८४६०),

बोटखत :

देवप्पा पुरमप्पा याजकडील किरकोळ खरेदी जिनसांबद्दल, सु. १२०७/ इ. स. १८०६-१८०७ (८४३०).

याद्या :

शिमग्याबद्दल पोस्त दिलेल्या कारकून वगैरे मंडळींची, सु. १२१५/ इ. स. १८१४-१५ (८४१०) (नक्कल); शिगरांना द्यावयाच्या शेळ्यांच्या दुधाबद्दल, सु. १२१४/ इ. स. १८१३-१४ (८४१२-८४१३); नामाजी राऊत याजकडील जैतापूर येथील गल्याचा आकार, २० ज. वल, सु. १२१४/ ११ मे १८१४ (८४१५); महादजी बाबूराव याजकडून मुशाहिऱ्याखेरीज खर्च झालेल्या ऐवजाबद्दल, सु. १२१२/ इ. स. १८११-१२ (८४१७); नागोजी येथील इनामाच्या वसुलीपैकीं रद्द दर्जाबद्दल ऐवज दिलेल्या लोकांची, सु. १२१२/ इ. स. १८११-१२ (८४१८); नरसाक्का सिंदीवाले याच्या विद्यमाने डंबळ व मखदूमपूर येथील कलाल व सिंदीवाले यांच्याकडील मक्त्याविषयी, २३ साबान, सु. १२१२/ १२ सप्टें. १८११ (८४१९) (नक्कल); ता। डंबळ येथील गांवगन्ना इनामाच्या हिशेबाचे झाडे पाठविणे, र. वल, सु. १२१२/ मार्च-एप्रिल १८१२ (८४२०); बाळाजी नारायण साने याजकडे आदा केलेल्या रसदेसंबंधी, सु. १२१२/ इ. स. १८११-१८१२ (८४२१); कडूसमधील येणे असलेल्या मोकदमीबाबतच्या उत्पन्नाची कलमें, श्रावण व. ९, श. १७३१, ३ सप्टें. १८०९ (८४२४); कुलकर्णी याजकडील जमाखर्चाचा तपशील, सु. १२१०/ इ. स. १८०९-१० (८४२५); गुरुनाथ विरुपाक्ष यांजकडील वसुली, सु. १२१०/ इ. स. १८०९-१८१० (८४२६); धामणे येथील वसुलीबद्दल तपशील, ज.वल, सु. १२०९/ जून-जुलै १८०८ (८४२७); गुंतल परगण्यातील जमेसंबंधी, र. वल, सु. १२०८/एप्रिल-मे १८०८ (८४२८); विरुपाआण्णा याजकडील किरकोळ खरेदीच्या जिनसांचा तपशील रमजान, सु. १२०७/ नोव्हें-डिसें. १८०६ (८४२९); गोपाळजी जाधव याच्यातर्फे कारसाई अंमलाची झालेली वसुली, चैत्र व १२, श. १७२८/ १५ एप्रिल १८०६ (८४३२); धामणे येथील श्री. हणमंत देवाच्या अभिषेकासाठी खर्च, २९ मोहरम, सु. १२०७/ ८ एप्रिल १८०७ (८४३३); शिवलकर याजकडून यावयाची वसुली, श्रावण शु. ७, श. १७२८/ २१ ऑगस्ट १८०६ (८४३४); लक्ष्मण शिवलकर भंडारी याजकडील जमाखर्चाचा तपशील, आश्विन शु. १०, श. १७२७/ १ ऑक्टो. १८०५ (८४३५); तर्फ कनवली येथील झड झालेल्या जमिनीचा तपशील, सु. १२०७/इ. स. १८०६–१८०७ (८४३६); राम

पत्रे—चालू :

तांडेल याच्यातर्फे खरेदी झालेल्या ओंड्यांची, श. १७२७/ इ. स. १८०५-१८०६ (८४३७); विनायक केशव याच्यातर्फे झालेल्या घरखर्चाचा तपशील, चैत्र, सु. १२०६/ मार्च-एप्रिल १८०६ (८४३८); तंबाखूच्या खरेदीबद्दल उधारीचा ऐवज येणे असलेल्या लोकांची, सु. १२०६/ इ. स. १८०५-१८०६ (८४३९); विनायक केशव चाफेकर याजकडील तंबाखूच्या ऐवजाबद्दल, सु. १२०६/ इ. स. १८०५-१८०६ (८४४०); सु. १२०५/ इ. स. १८०४-१८०५ (८४४१); पेठा शहर पुणे येथील अजमासाच्या कलमांची, सु. १२०२/ इ. स. १८०१-१८०२ (८४४२); (अपूर्ण) (मसुदा) ; नाशिकमधील गांवाना शहामतखान पठाण व रंगराव राजे बहादर यांजकडून होणाऱ्या उपद्रवाच्या बंदोबस्ताबद्दल द्यावयाच्या पत्रांची, सु. १२०३/ इ. स. १८०२-१८०३ (८४४३); (अपूर्ण); विवरे येथील अंमलाच्या तपशिलाची, सु. १२००/ इ. स. १७९९-१८०० (८४४४); एकबेर्जी दप्तराकडील जासुदांची, सु. ११९७/इ. स. १७९६-९७ (८४४५); नरगुंदे याजकडे येणे असलेल्या ऐवजाची, श. १७३९/ इ. स. १८१७-१८ (८४४६); लोकांची, सु. ११९७/इ. स. १७९६-९७ (८४४७); कासेगांव येथील मामलतीपैकी नीलो बाबूराव याजकडे बाकी राहिलेल्या ऐवजाच्या ठरावाच्या कलमांची, सु. १२१७/इ. स. १८१६-१७ (८४४८); यशवंतराव बळवंत याच्या सिंगदे या इनाम गांवाची वहिवाट वामनरावतात्या आपटे यास सांगितली त्या ठरावाच्या कलमाची, सु. १२१७/ इ. स. १८१६-१७ (८४४९); ओझर येथील सरदेशमुखी अंमलाच्या तपशिलाची, सु. १२२३ / इ. स. १८२२-१८२३ (८४५१); जामदारखान्यापैकी जमा झालेल्या ऐवजाच्या तपशिलाची, सु. १२१४/ इ. स. १८१३-१४ (८४५२); जामदारखान्यापैकी खर्च पडलेल्या ऐवजाच्या तपशिलाची, सु. १२१४/ इ. स. १८१३-१४ (८४५३); डेंगळे याजकडील किल्यांच्या नेमणुकेच्या तपशिलाची, सु. १२१२/ इ. स. १८११-१२ (८४५४); खर्चाबद्दल येणे असलेल्या ऐवजाच्या तपशिलाची, सु. १२०८/ इ. स. १८०७-१८०८ (८४५५); भाऊ थिटे यास सालाबाद असलेल्या सरकारवाड्यांतील नेमणुकेच्या तपशिलाची, सु. १२०८/ इ. स. १८०७-०८ (८४५६) (नक्कल); लोकांकडे द्यावयाच्या फुलांच्या दागिन्यांची, श. १७३९/ इ. स. १८१७-१८ (८४६१); सोने खरेदीसाठीं येसू पवार याच्या हवाली केलेल्या ऐवजाच्या तपशिलाची, आश्विन व. ८, सु. १२१८/ २ नोव्हें. १८१७ (८४६२); कृष्णा फुलारी याजकडील पुजा वगैरेसाठीं द्यावयाच्या फुलांच्या दागिन्यांची, श. १७३९/ इ. स. १८१७-१८ (८४६३); मामलतीपैकी तोफखान्याकडे असलेल्या बैलांची, सु. १२१७/ इ. स. १८१६-१७ (८४६४); आमंत्रणाकडे नेमणूक असलेल्या लोकांची, सु. १२१७/ इ. स. १८१६/१७ (८४६५); कात्रज येथील दोन्हीं तळ्यांतील गाळ काढण्यासाठीं सर्व तर्फातून आणावयाच्या लोकांच्या तैनातेबद्दल परशराम खंडेराव याजकडून सरकारांत यावयाच्या ऐवजाची, १४ रजब. सु. १२१७/ ३१ मे १८१७ (८४६६) (नक्कल); मुशाहिऱ्याबद्दल रोजमुरा द्यावयाच्या लोकांची, १५ रमजान, सु. १२१७/१० ऑगस्ट (८४६७).

यादी स्मरणार्थ :

कर्ज दिलेल्या लोकांची, भाद्र. व. ९, श. १७३३/ ११ सप्टें. १८११ (८४१६).

वराता :

(—) – **कृष्णाजी माणकेश्वर** : बाळाजी काशी काळे याच्या रोजमुऱ्याची देऊळगांव येथील रसद व पोतेचालीच्या बट्टाच्या ऐवजावर, २२ जिलकाद, सु. १२०९/ ९ जाने. १८०९ (८३५८).

वरात—चालू :

(—) - खंडेराव नीळकंठ : फरासखान्याकडे द्यावयाच्या ऐवजाची, ५ ज. खर, सु. १२०२/ १४ ऑक्टो. १८०१ (८३५७) व दप्तराकडे द्यावयाच्या ऐवजाची वसई येथील रसदेवर, ५ ज. खर, सु. १२०२/ १४ ऑक्टो. १८०१ (८३६१) (नक्कल).

(—) - शेखोजी तुपे : जीवनराव विठ्ठल सुमंत यास एकसाली द्यावयाच्या बक्षिसाच्या ऐवजाची, २९ र. खर, सु. १२०६/ २७ जुलै १८०५ (८३५९); (नक्कल) व धोंडभट भागवत यास तैनातेबद्दल द्यावयाच्या ऐवजाची धामणी येथील रसदेवर, १७ रमजान, सु. १२०६/९ डिसें. १८०५ (८३६०) (नक्कल).

शिल्लकबंद :

विनायक केशव चाफेकर कुलकर्णी याजकडील वेलणेश्वर येथील, सु. १२०५/ इ स. १८०४-१८०५ (८४०३); सु. १२०६/ इ. स. १८०५-०६ (८४०४); बाळकृष्ण गंगाधर याजकडील कोतसुला गांवचा, सु. १२०६/ इ. स. १८०५-१८०६ (८४०५); इंदापूर येथील देशमुखी वतनाचा, फ. १२२३/ इ. स. १८१३-१४ (८४१४).

हजेरी :

कृष्णराव वामन याजकडील लोकांची, ४ र. खर,सु. १२१७/ २१ फेब्रु. १८१७ (८४६८).

हिशेब :

जमाखर्चाचा, आषाढ व. ६, सु. १२१६/ २७ जुलै १८१५ (८४०८); खरवली येथील वसुलीचा, सु. १२१६/ इ. स. १८१५-१६ (८४५०).

**रुमाल क्र. १७ पुडके क्र. २ का. सं. ९९(८४६९-८५६७)**
**सु. स. ११७५-११९७ इ. स. १७७४-१७९६**

चिठ्ठी :

झांबरी उर्फ मुसा देदया याजकडून फोरखत लिहून घेतल्याबाबत, ५ एप्रिल १७८८ (८५३०); संभाजी व जातयाजी जाधव याजकडून बाबती, सरदेशमुखीचे महाल लावून दिल्याबद्दल पाचशे रुपयांची काढलेली वरात, सु. ११७८/ इ. स. १७७७-१७७८ (८५४३); (८५४५).

टिपणी :

विक्रीचे माहेवार, सु. ११७८/ इ. स. १७७७-१७७८ (८५३८).

ताळेबंद :

पंतप्रधानाकडील (माधवराव नारायण) उष्टरखान्याचा, सु. ११७७-११७८/ इ. स. १७७६-१७७८ (८४६९-८४७२); (८४७७-८५२८); लष्कर पथकांतील बद्दल मुशाहिऱ्यांचा, सु. ११८४/ इ. स. १७८३-८४ (८४७३) ; सु. ११८६/इ. स. १७८५-८६ (८४७६); खेरीजमुशाहिऱ्याचा, सु. ११८३/ इ. स. १७८२-८३ (८४७४); धर्मार्थ खर्चाचा, सु. ११७८/ इ. स. १७७७-७८ (८४७५).

तैनात जाबता :

लख्या जामदार याजकडील लोकांसंबंधीचा, सु. ११८५/ इ. स. १७८४-८५ (८५५२) (अपूर्ण).

फेरिस्त :

पुण्यातील व चोपडगाव वगैरेमधील नक्त जमेच्या आवर्जाचे, १७ र. वल, सु. १२००/१९ ऑगस्ट १७९९ (८५६४).

याद्या :

बापूजी जैन व बाबूराव केशव याजवर वराता काढल्या त्याची सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (८५४२); पुरंदर किल्यावर सामान वगैरे रवाना केले त्याची, ३ र. खर, सु. ११७८/ १ मे १७७८ (८५४७); वंदनगडाकडे चाकरीस असलेल्या लोकांच्या तैनात नेमणुकीतून कसर ऐवज राहिला त्याच्या तपशिलाची, सु. (८५८१)/इ. स. १७८०-८१ (८५४८); हप्तेबंदी ऐवज येणे असलेल्या निरनिराळ्या परगण्यांची, सु. ११८५/इ. स. १७८४-८५ (८५४९-८५५०); तैनात असलेल्या लोकांची, (८५५१) ; गुंडेवाडीपैकी मसाला म्हणून जमा झालेल्या ऐवजाची, सु. ११८३/इ. स. १७८२-८३ (८५५३); जिवाजी कुंभार याची जागा बांधण्यास झालेल्या खर्चाची तपशीलवार, सु. ११८८/ इ. स. १७८७-८८ (८५५४); रुमालांत न आढळणाऱ्या कागदांची, सु. ११८८/इ. स. १७८७-८८ (८५५५) ; गुंडेवाडी येथील आनंदराव पल्लोड यांच्या घराण्यातील वाटणीसंबंधाने, सु. ११८९/इ. स. १७८८-८९ (८५५६); जिवाजी कुंभार याच्या घराच्या तपशीलाची, सु. ११९८/इ. स. १७९७-९८ (८५५७); चोरीस गेलेल्या सामानाची, सु. ११९०/इ. स. १७८९-९० (८५५८); आरळे गांवचा वसूल, महायात्रेचा खर्च व सरदेशमुखीचा ऐवज देण्याबाबत अंबिकाबाई राजाज्ञा यांच्या विनंतीच्या कलमांची, सु. ११९०/इ. स. १७८९-९० (८५५९); सदाशिव बाळभट व रामचंद्र गणेश यास सरकारांतून धर्मार्थ झालेल्या बाबींची, सु. ११९०/इ. स. १७८९-९० (८५६०); जयराम कृष्ण याजकडील तोफखाना व गारदी लोकातून आलेल्या फिर्यादींची, १० सफर, सु. ११९१/१९ ऑक्टो. १७९० (८५६१); ब्राह्मण, जमीनदार वगैरे लोकांना महालांतून देण्यात आलेल्या ऐवजाची, सु. ११९१/इ. स. १७९०-९१ (८५६२); अजमासाचा फडशा झालेल्या व न झालेल्या गावाची, सु. ११९५/इ. स. १७९४-९५ (८५६५); परगणे सालमे येथील जमाखर्चाची, सु. ११९६/इ. स. १७९५-९६ (८५६६); बाजीराव रघुनाथ यांच्या कोपरगाव येथील मुक्काम प्रसंगी खर्चास महाल दिले त्यांची, सु. ११९६/इ. स. १७९५-९६ (८५६७).

यादी (कलमबंदीची) :

मौजे भांवडी, ता सांडस येथील वसुलासंबंधी सूचना, मुधोजी भोसले याजकडील जप्त केलेल्या गांवासंबंधी सूचना, लोहगड येथील हिशेब लिहून आणण्यासंबंधीची (८५४१).

यादी (फेरिस्त) :

बंदर पेण, जंबूसर वगैरे परगण्यातील जमेचे, सु. ११९२/इ. स. १७९१-९२ (८५६३).

यादी (लावणी) :

आकार मौजे मुदापूर (८५३३-८५३४).

यादी (हिशेबी) :

नदीच्या बंधाऱ्याकरिता सासवडकर लोणारी यास चुना लावावयास खर्च लिहून दिला होता त्याबाबत, ८ ज. वल, सु. ११७८/१५ जून १७७७ (८५४६).

हिशेब :

गणेश नारायण याने हंसाजी आटोळे याच्या जप्त केलेल्या सरंजामावर केलेल्या सन समान व तिसा समानीन मधील वहिवाट खर्चाचा, सु. ११८८-११८९/इ. स १७८७-१७८९ (८५२९); (८५३१); भगवंतराव व चत्रसिंग बाळाराव कदम बांडे याजकडील सबा समानीनचे सरंजाम वगैरेची बेरीज, १५ मोहरम, सु. ११८७/७ नोव्हेंबर १७८६ (८५३२) ; गोविंदराव माणकर व चिमाजी माणकर याजकडील राजपुरी येथील फाजील जमा व वसुलाचा, सु. ११८५/इ. स. १७८४-८५ (८५३५); पावलोक, पोर्गे याचा विल्हेवार तपशील (८५३६); मौजे शेकटे येथील जमा वसूल, सु. ११७६/इ. स. १७७५-७६ (८५३७); श्रीपतराव रघनाथ या जालनापूरच्या कमाविसदाराकडील ऐवजाचा, सु. ११७५/इ. स. १७७४-७५ (८५३९);

**हिशेब–चालू :**

सरकारी कुरण असलेल्या बाळाजी कृष्ण याजकडील खर्चाचा, सु. ११७५/इ. स. १७७४–७५ (८५४०); प्रांत पुणेकडील खाजगीकडील खर्च सु. ११७८/इ. स. १७७७–७८ (८५४४)

**रुमाल क्रमांक १७ पुडके क्र. ३ का. सं. १४६ (८५६८–८७१३)**

**सु. स. १२०४–१२४९ इ. स. १८०३–१८४८.**

**अर्ज :**

**महिपतराव कृष्ण साठे व यशवंतराव परशराम परांजपे—** बळवंतराव मल्हार चिटणीस सातारकर यांच्या तालुके रत्नागिरी येथील राजदेशमुखीच्या वतनाची कर्ज फिटेपर्यंत घालमेल न करण्याची विनंती, आश्विन शु. ११, श. १७४६/१३ सप्टें. १८२४ (८५६८).

**मथुरागीर गोसावी— (—) :** संवदती संस्थानास करवीरकर यांजकडून होणाऱ्या उपद्रवाचा बंदोबस्त करण्याबाबत, माघ व. ९, श. १७४५/२३ फेब्रु. १८२४ (८५६९).

**पत्रे :**

**आण्णाजीराव—बापूराव** × : मुचंडी, धामणे व माणगांव येथील वसुलीसंबंधी, १७ जाने. १८३८ (८६२४) ; संपूर्ण पत्ता, सरकारी नोकरीस किती वर्षे झाली ते सविस्तर पाठविण्याचा हुकूम, १८ एप्रिल १८३७ (८६५५).

**आण्णाभट पुजारी—मोकदम, वसगड :** वर्षासनाच्या ऐवजाची पोच, १४ वल, सु. १२३२/२३ ऑगस्ट १८३१ (८५८२).

**आप्पाजीराव*—भीमराव* :** शेतसनदी लोकांच्या चाकरीसंबंधी, महाल्या व येळूप्पा याच्या घरी झालेली चोरी, २४ जून १८२८ (८६६९).

**कृष्णराव पेषकार—भीमराव* :** धामणी व कणगवडी येथील तंटयाबाबत चौकशीस धामणी येथील पाटील कुलकर्ण्यास ऐवज घेऊन कचेरीस पाठविण्याची विनंती, १२ फेब्रु. १८३४ (८६६५) ; (८६६६) ; शिवरुद्रहुली याने विहिरींत उडी टाकली त्याची चौकशी, १३ एप्रिल १८३४ (८६६७) ; भोमता वाजंत्र्याने कासण्णा उपवास करण्यास बसविले त्याबाबत करावयाची चौकशी, १२ मार्च १८३४ (८६६८) ; पीरसाहेब व अमदसाहेब यांच्या धामणे येथील महसुलाविषयी दिक्कत न करण्याची विनंती, १ जाने. १८३१ (८६६९) ; शिव महार यास बेळगांवी रवाना करणे, २० डिसेंबर १८३० (८६७०) ; सुभेदाराकडे पत्र रवाना, २३ मे १८३१ (८६७१).

**गुरुनाथ गणेश कुलकर्णी—रावजी** × : गणेश पाटील याच्या घरी झालेल्या चोरीचा शोध करावा म्हणून विनंती, २३ एप्रिल १८३९ (८६२७).

**गोपाळराव रामचंद्र—बाजीपंतदादा* :** ऐवजाची मागणी, २७ रमजान, सु. १२२२/२८ जून १८२१ (८६४०).

**तमाजी लिगो—बाळाप्पा* :** लछू नाईक याच्या संबंधात आपसांत समजूत करणे (८६०१).

**ताकरेनसाहेब धारवाड—मोकदम, वसगड :** परशराम गणपत राव पटवर्धन तासगांवकर यांस जातीच्या तैनातेस करून दिलेली वाढ, १९ मे १८२० (८६०७).

**त्रिंबक बनाजी—दामोदर रघुनाथ :** कामकाजप्रकरणी यादीरवाना, कामाचा बंदोबस्त करण्याची विनंती, १६ डिसें. १८२८ (८६३४).

**पत्रे–चालू :**

**त्रिंबकजी डेंगळे—सदाशिव भिकाजी व कृष्णाजी नारायण :** वामनभट कर्वे यांस अनुष्ठानाबद्दल द्यावयाचा ऐवज, २४ ज. खर, सु. १२१५/१३ जून १८१४ (८६६४).

**नरसो जिवाजी कुलकर्णी—बाळाजीपंत* आबाजीपंत* :** पाडेगांव व खिलगांव येथील इनामी शेताच्या वहिवाटीचा करार, १५ ज. खर, श. १७४७/२४ जाने. १८२६ (८५८६).

**परशराम गणपत—देशमुख देशपांडे-वसगड :** मोरो गोळे, श्री. गणपती पंचायतन संस्थानच्या पुजा, अर्चा वगैरेंच्या खर्चासाठी दिलेल्या इनामाच्या वहिवाटीसंबंधी, १६ सफर, सु. १२४५/२४ फेब्रु. १८४५ (८६१३—८६१५).

**पंच, सांगली संस्थान—मोकदम—गुंडेवाडी :** देवस्थानाकडे असलेल्या गुंडेवाडी येथील इनाम जमिनीच्या ऐवजाची मागणी ५ र. खर, सु. १२२६/१६ नोव्हें. १८२५ (८६१०–८६१२).

**पांडुरंग बल्लाळ मराठे—रघुनाथराव दादा* :** हवालदारीचा ऐवज जमादाराजवळ दिल्याबद्दलचा तपशील (८६४१).

**बापूजी बाबाजी—मोकदम, धामणी :** शेखोजी तुपे याजकडे धामणीची कमाविशी, ३० रजब, सु. १२०४/१५ नोव्हें. १८०३ (८५९९).

**बाबुराव मामलेदार—भीमराव जिल्हेदार :** धामणी, गंदीगवाड, सातेहल्ली व बागशाही या गांवाच्या आबादानीसंबंधी सूचना, १० जुलै १८२७ (८६४२) ; करवीर सरकारकडे चाकरीस जाणाऱ्यांना ताकिदी देण्याचा हुकूम, २ सप्टें. १८२७ (८६४३) ; प्रत्येक गांवच्या शेतांतील व आमराईतील झाडे कोणाकडे कशी पूर्वीपासून आहेत त्याच्या वहिवाटीच्या तपशिलाची यादी पाठविण्याबद्दल (८६४४) ; बेळगांव येथील वरात, नजर, जुडी. वगैरेंच्या हिशेबाकरितां धामणेकर कुलकर्णी यास घेऊन येण्याची सूचना, २९ मार्च १८२७ (८६४५).

**बाबूराव*—भीमराव* :** गावगन्ना आमराई, फणस व चिंचेच्या झाडांच्या वहिवाटीच्या तपशिलाची मागणी, ३१ मार्च १८२७ (८६४६) ; मलणाद नंदुमनी याच्या बायकोच्या कैफियतीची पोंच, भत्तापट्टी दप्तराकडे रवाना, ३० मार्च १८२७ (८६४७) ; चोरीस गेलेल्या वस्तूचा सविस्तर तपशील पाटील, कुलकर्णी यांच्याकडे लोकांनी द्यावा व चोरीचा शोध त्वरित लावावा म्हणून हुकुमाची विनंती, ४ जून १८२७ (८६४८) ; केदारी फडके याचे माणगांव येथील शेतसनदचे उत्पन्न देण्यास पाटील यास ताकीद, १२ जाने. १८२९ (८६४९) ; धामणे येथील पिकांची पाहणी व इनामगावांच्या हिशेबाची मागणी, (८७०६) ; शेखमियेन व धामणीचे कुलकर्णी रामप्पा यांची मारामारी, २५ एप्रिल १८२८ (८७०७); माणगांव येथील सिद्दी कलाल यांनी भरावयाच्या ऐवजासंबंधी, ३० ऑगस्ट १८२८ (८७०८); शाईदी (साक्षीच्या) कामासाठीं आसामीचीं यादी रवाना (८७०९); धामणीचा ऐवज रवाना, (८७१०) ; धामणीच्या जमाबंदीसंबंधी, १३ डिसें. १८२७ (८७११) ; बुधाजी पाटील याच्या वतनी जागेत शिवगौडा यांनी बांधलेल्या घरासंबंधीचा करार, १३ एप्रिल १८२८ (८७१२) ; धामणी येथील वसुलीस उशीर न करण्याची विनंती, १२ डिसें. १८२८ (८७१३).

**बाळाजी ओक, आबाजी बापूजी—नरसीपंत* :** पाडेगांव व खिलेगांवच्या वहिवाटीचा करार मान्य, १५ ज. खर, सु. १२२६/२४ जाने. १८२६ (८५८७).

**भगवंतराव*—भीमराव* :** शिवलिंगप्पा कडगद व रामप्पा कुलकर्णी यांचा म्हशीबाबत तंटा, १० मे १८३४ (८६७७).

पत्रे–चालू :

**भट पंडितराव—देशलेखक, राजापूर :** कृष्ण अग्निहोत्री यास कर्यात नेवरे येथील धर्मादायाची सनद (८६०८) (नक्कल).

**भाऊराव*—भीमराव* :** वसुलीची निकड तरी झाड्यानिशी वसुली करण्याची सूचना, १० जुलै १८३१ (८६९९) ; लावणीच्या हिशेबासंबंधी, २१ जिल्हेज, सु. १२३१/४ जून १८३१ (८७००). तांब्याचे नवीन छापाचे नाणे व्यवहारांत चालू करण्याचा हुकूम, २३ एप्रिल १८३१ (८७०१) ; धमणा वर्तक गुणकल याच्या घरी पडलेल्या दरोड्यातील गुन्हेगारांच्या शोधाबद्दल सर्व गावकऱ्यांना करावयाच्या सूचना, १२ मोहरम, सु. १२३०/१४ जुलै १८२९ (८७०२) ; व्याजाची त्वरित वसुली, जाने. १८३० (८७०३) ; २० सप्टें. १८३० (८७०५) ; देवस्थानाकडे वर्षासन व धार्मिक कार्यास द्यावयाच्या ऐवजासंबंधी, सिदी अडूरे वगैरे कैद्यांपैकी बाळूची बायको फरारी तरी तिचा शोध करून कचेरीस रवाना करण्याबद्दल सूचना, २९ जुलै १८३० (८७०४).

**मुदगौंडा पाटील—बाळप्पा देशपांडे :** आगमनासंबंधी निवेदन (८५८४).

**मुरगेप्पा हालदेवरु—गुरुआप्पा* :** घरगुती कामकाजाविषयी (८६२८).

**मोकदम, निडगुंद—मोकदम* गणी परगणे चिमलगे**—हुसेनी मांग व शिवप्पा मांग यांच्या भाऊपणाच्या खटल्याबाबत चौकशीची विनंती (८६३७) ; **—मोकदम मसूर** : छाटे व सुतार यांच्याशी केशप्पा पोतदार याचा नवरीबाबत खटला, १८ जिल्हेज, सु. १२३५/१७ एप्रिल १८३५ (८६३८–८६३९).

**रंगराव पेषकार—भीमराव*** : रामणगोडा याने सरकारांत केलेल्या अपिलासंबंधी (८६७२) ; धामणी येथे पळून गेलेल्या बाळण्णा माळ्याच्या बायकोची चौकशी करून कचेरीत रवाना करण्याची सूचना (८६७३) ; मजरे गांवचे इस्तालपट्टी याजबरोबर पाठविण्याची विनंती (८६७४).

**राघो आप्पाजी—बाळाजी आण्णाजी :** कोल्हापुरास गाय, वासरु त्वरित रवाना करण्याची विनंती (८६३५).

**रामराव*—बापूराव* :** फिर्यादीबाबत संपूर्ण तपशिलाची मागणी, २ नोव्हें. १८३५ (८६१७) ; जमाबंदीच्या ऐवजासंबंधी, ४ नोव्हें. १८३५ (८६१८) ; पाठविलेला ऐवज शेतसनदेकड जमा, ५ नोव्हेंबर १८३५ (८६२०) ; गोविंद बसापूर याच्या गुरांकडून पिकाची झालेल्या नासाडीची भरपाई करून देण्याची विनंती २४ नोव्हें. १८३५ (८६२१) ; कमिशनर साहेबांची धारवाड येथे भेट तरी फिर्याद करु इच्छिणारांनी कोर्टात हजर असावे, २५ मार्च १८३६ (८६२२) ; : चौगुलकीच्या वर्षेली हक्कासंबंधी, ३० नोव्हें. १८३८ (८६२३) ; पाच्छापूर तर्फेतील गांवगन्नाच्या वहिवाटीसंबंधी, ३० एप्रिल १८३८ (८६२५) ; तिपय्य महार याच्या धामणे येथील शेताच्या तंटयाचा फडशा करण्याची विनंती (८६२६) ; पाच्छापूर येथील अंमलासंबंधी झालेल्या हुकूमाबद्दल, १० नोव्हेंबर १८३६ (८६५०) ; मुखत्यारनाम्यावर मामलेदार, पाटील, कुलकर्णीपैकी कोणाची तरी सही अत्यावश्यक असल्याचा हुकूम (८६५१) ; धामणे येथील वसुलीबद्दल सूचना (८६५२) ; सरकार चाकरीत असतांना वतनदारांच्या हातून अपराध घडल्यास वतनाची जप्ती केली जाईल असा जाहीरनामा, १८ नोव्हें. १८३६ (८६५३) ; गावांतील रयतेने लावणी करण्यासंबंधी हुकूम, २१ एप्रिल १८२६ (८६५४) ; सिर्दलिंगप्पा गारगोटी यास मुचंडी येथील जमीन देऊन त्याचा पोटगीऐवज देण्याची विनंती, २५ ऑगस्ट १८३६ (८६५६) ; **—भीमराव*** : तलबेच्या ऐवजासंबंधी (८६७६) ; **—रंगरावजी*** मुलांची खरेदीविक्री करणारांस शिक्षा होईल असा जाहीरनामा, ३० जुलै १८३५ (८६३३).

पत्रे–चालू :

**लिंगोपंत*–भीमराव* :** बीड येथील मामलेदाराकडे परवाना रवाना केला असून उत्तराची विनंती, २० मे १८२३ (८६१६) ; छापी व सुरती रुपयांबद्दल धारवाड येथील हुकूम, १ नोव्हें. १८३३ (८६८०) ; वायद्याप्रमाणे धामणे येथील ऐवजाची मागणी, ६ सप्टें. १८३३ (८६८१) ; देवजी गावडे यांजकडून शेत सोडले असे गणपतराव ढोले याने लिहून घेतल्याबद्दल नारायण देशपांडे याने केलेल्या फिर्यादीची चौकशी करण्याची विनंती, जुलै १८३३ (८६८२) ; धामणे येथील वसुलीसंबंधी, ११ मे १८३३ (८६८३) ; सिंदी कलाली व पानगुत्ता यांच्या मक्त्यासंबंधी, ७ जून १८३२ (८६८४) ; गरीब रयतेस चौकशी करुन द्यावयाचा तगाई ऐवज, ५ जून १८३२ (८६८५) ; पेरणी झालेल्या जमिनीपैकी खालसा, इनामती व जुडी इनाम वगैरेच्या तपशिलाच्या यादीची मागणी, १४ ऑगस्ट १८३२ (८६८६) ; कापसासंबंधीच्या जाहीरनाम्यानुसार रयतेने व्यवहार करावा म्हणून सूचना, ८ ऑगस्ट १८३३ (८६८७) ; रामणगौडा पाटील याच्या कुरणाची रुद्रप्पा पाटील याने नुकसानभरपाई द्यावी, १५ ऑगस्ट १८३२ (८६८८) ; मुचंडी व येळे हाल येथील पाटील कुलकर्ण्यास वतन भरती करून जमीन वगैरे देण्याबद्दल पाठविण्याची विनंती, ३० ऑगस्ट १८३२ (८६८९) ; सरकारात घेतलेल्या कागदी येथील अंमलाच्या मोबदल्यात नीळकंठ शहापूर याजकडे दिलेल्या जमिनी, ३ ऑगस्ट १८३२ (८६९०) ; कुळवार पटा रवाना केला असून प्रत्येकास देण्याची सूचना, १६ सप्टेंबर १८३२ (८६९१) ; प्रत्येक गांवच्या लावणीचा बंदोबस्त करुन लावणीबाबत हुकूम देण्याची विनंती, १५ जून १८३२ (८६९२) ; कोणाकोणाकडील वसूल येणे आहे त्याच्या तपशीलाची मागणी, ४ ऑगस्ट १८३२ (८६९३) ; धामणे येथील वसुलीबाबत, ३० सप्टेंबर १८३२ (८६९४) ; बुधाजी याच्या घरी राहिलेले जिन्नस परत देण्याचा हुकूम, २० सप्टेंबर १८३२ (८६९५) ; धामणे येथील मक्त्याच्या ठरावासंबंधी हुकूम, ५ जून १८३२ (८६९६).

**व्यंकटराव*—गोविंदरावजी* :** अव्वल हप्ते इरसालपट्टीसहित पाठविण्याची विनंती, ५ नोव्हेंबर १८३५ (८६२९) ; लावणीच्या हिशेबासाठी धामणेच्या कुलकर्ण्यास कचेरीस पाठविण्याची विनंती, ११ ऑगस्ट १८३४ (८६३०) ; तुरुंगातून पळून गेलेल्या कैद्यास पकडून देणारास इनाम, ८ नोव्हेंबर १८३४ (८६३१) ; **—भीमराव*** : सर्जा नाईक पाळेगार यास परसगरी येथे सुपारीच्या व्यापाराचा द्यावयाचा परवाना, ७ जानेवारी १८३४ (८६९७) ; हुकुमानुसार अंमलाची वसुली करण्याची सूचना, १४ जानेवारी १८३४ (८६९८) ;

**व्यंकटराव दरेकर—रंगरावजी* :** वस्तूचा शोध लागल्यास पाठवून देऊ, म्हणून २५ एप्रिल १८३५ (८६३२).

**व्यंकटराव पाटणकर—मोकदम, आबीदल :** परगणे निडगुंद येथील वहिवाटीच्या अंमलाबाबत, १ सफर, सु. १२३४/२० जून १८३३ (८६०९).

**व्यंकटराव पेषकार—बापूराव× :** बेवारशी जनावरांच्या पट्टीची मागणी, सु. १२०६/इ. स. १८०५–१८०६ (८६१९).

**शंकरप्पा पाटील—बाळाप्पा व गौडाप्पा पाटील :** बोलणी करण्यास येण्याची विनंती (८६३६).

**शामराव गिरीधर—बापूराव× :** अंमलासंबंधीचा ठराव कळविण्याविषयी, ६ ऑक्टोबर १८३८ (८६५७).

**शेषगीरराव*—भीमराव*** : जेवणाचा भत्ता देऊन हिशेबाची मागणी, २ मार्च १८३० (८६७८).

पत्रे—चालू :

**श्रीपादभट नांदणीकर—मोकदम, वसगड** : करवीर संस्थानच्या मठास ऐवज मिळाल्याची पोंच, २ मोहरम, सु. १२३४/१२ मे १८३४ (८५७९).

**सब्बाराव—गुरुराव*** : दवगालहट्टी येथील पाटीलकीच्या गहाण-खतांची मागणी, १६ एप्रिल १८३९ (८६५८).

**सय्यद हुसेन—मोकदम, वसगड** : ऐवज मिळाल्याची पोच, सु. १२३१/इ. स. १८३०–३१ (८५८३.)

**हणमंतराव*—यशवंतराव*** : धामणे येथील हिशेबासह बाळाप्पा यास पाठविण्याची सूचना, १४ नोव्हें. १८२६ (८६५९); तर्फ बिडी येथील पैमास जमिनीच्या चौकशीचा आदेश, ४ ऑगस्ट १८२६ (८६६०); धामणे व आंबली येथील वसुलीचे निवेदन, १२ सप्टें. १८२६ (८६६१); बेगारी, भोई वगैरेंच्या चाकरी-बद्दल सूचना, २७ जुलै १८२६ (८६६२); कित्तूर येथून फरारी झालेल्या कैद्यांना धरून पाठविण्याबद्दल सूचना, २१ ऑक्टो. १८२६ (८५८३).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]

(—) – **कमाविसदार तासगांव वगैरे** : जमीनदार, वर्षासन, हक्कदार वगैरेस नेमणूकखर्चाचा ऐवज परवानगीशिवाय देण्याजी मनाई, २६ एप्रिल १८३१ (८६००).

(—) – **बापूरावजी**× : धामणे येथील फौती चिलणा शेत सनदी याच्या जप्तीबाबत, (८५९८)

(—) – **बाळाजी आप्पाजी कुलकर्णी** : रोषणाईकडे द्यावयाचा जिन्नस व खर्च (८५८०–८५८१); हप्त्याने ऐवजाची वसुली (८६०२).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]

धामणकर यांच्या बाकीस तगादा करण्याची मनाई, १० एप्रिल १८३४ (८६०३); कुळाची समजूत न पडल्यास परस्पर केलेला वसुलीखर्च न करणे म्हणून हमी देण्याची विनंती, २६ रजब, सु. १२३५/२८ नोव्हें. १८३४ (८६०४); सुपे गावचा आकार, इनाम, जहागीर वगैरे वहिवाटीच्या तपशीलाची मागणी, २ मे १८२९ (८६०५); गोदजी शिंदे याच्या कर्जफेडीबद्दल जिवाजी भुसे यास ताकीद, २० सफर, सु. ११५१/८ जाने. १७५१ (८६०६).

मुचलका :

धामणे येथील वसुलीच्या वांटणीसंबंधी परसू प्रभू याचा, १ मे १८५० (८६७५).

याद्या :

मंदरूप गावच्या लावणीसंबंधी, १ जिल्काद, सु. १२२८/१६ मे १८२८ (८५७०); गदसगपा यासाठी खरेदी केलेल्या सामानाची, सु. १२११/इ. स. १८१०–११ (८५७१); गोकाक परगण्यांतील पोताकडील खर्चाची, रजब, सु. १२२४/मार्च १८२४ (८५७२); नारायण बापूजी याच्या वसगड येथील इनाम जमिनीच्या आकाराची, १५ जिल्हेज, सु. १२२४/२२ ऑगस्ट १८२३ (८५७३); अंजनी खुर्द येथील मोकाशाच्या हिशेबाची, १२ जिल्हेज, सु. १२२५/८ ऑगस्ट १८२४ (८५७४); जोतीहली गावच्या सालाबाद नेमणुकीच्या खर्चाची, सु. १२१९/इ. स. १८१८–१९ (८५७५); निडगुंद येथील खर्चाची, जिल्हेज सु. १२३१/जून १८३० (८५७६); कवठे येथील जमाबंदीची, ज. खर, सु. १२१९/एप्रिल १८१९ (८५७७); परगणे गुदरनी-मधील वसुलाची, सु. १२४८/इ. स. १८४७–४८ (८५७८); श्री व्यंकोबाच्या भक्ताजवळील. रवाना केलेल्या जिनसांची, २२ सफर, सु. १२२६/५ ऑक्टो. १८२५ (८५८५); निडगुंद येथील वसुलाची, सु. १२२९/इ. स. १८२८–२९ (८५८८); सरकार कंपनीच्या जमाखर्चाची, सु. १२२०/इ. स. १८१९–१८२० (८५८९); टिपकागदाच्या छपाईची, ६ ऑगस्ट १८४२ (८५९०); धारवाड येथे दरवडा पडल्याने वर्दी दिलेल्या गांवांची १९ जिल्हेज, सु. १८३९/६ मार्च १८३९ (८५९१); जलपूर येथील वसुलाची, सु. १२२१/इ. स. १८२०–२१ (८५९२); उगली गावच्या शेतसनदी याद्यांची, सु. १२१९/इ स. १८१८–१९ (८५९३); रामनाईक याजकडील जमेची, सु. १२१९/इ. स. १८१८–१९ (८५९४); शिपायांच्या रोज-मुऱ्याच्या हिशेबाजी (८५९५); पिलाजी राम यांच्या जमिनी-संबंधी, सु. १२३८/इ. स. १८३७–३८ (८५९६); परगणे उकली येथील वसुलांची, मोहरम, सु. १२२०/नोव्हें. १८१९ (८५९७).

## रुमाल क्रमांक १८ पुडके क्रमांक १ ते ६

पुडके क्र. १ का. सं. ६२ (८७१४ ते ८७७५)
सु. स. ११४०–१२३१ इ. स. १७३९–१८३१

करारनामा :

महादप्पा तळे यांच्या मंदरूप येथील इनामाच्या वांटणीसंबधी सत्याप्पा नरोटे यांच्याशी आमण्णा वडार याचा (८७५८).

जबानी :

खंडू काळू चांभार व भवानगीरबाबा यांच्या गुजगाव येथील इनामाच्या वहिवाटीसंबंधी परगणे मंदरूपच्या देशमुख देशपांडे यांची बापूजीस, १५ फेब्रुवारी १८५१ (८७७४).

जामीन कतबा :

इगाप्पा उडल—रावसाहेब× : सिंगाप्पा व परमाणा नागशेटी यांच्या भाऊपणाच्या कजियासंबंधी, १५ रजब, सु. ११८६/१४ मे १७८६ (८७३८).

पत्रे :

**इंडीकर मोकदम—आनंदराव सुभेदार** : जमाबंदीचा ऐवज हप्त्याने भरणार असल्याचा वायदा, ११ ज. वल, सु. ११८५/२३ मार्च १७८५ (८७३१).

पत्रे—चालू :

**गणेश भवानी—रावसाहेब**× : मंदरूप येथील मामलतीविषयी, २१ ज. खर, सु. ११९५/१३ जानेवारी १७९५ (८७४९).

**गिरिधर शंकर देशपांडे—रावसाहेब**× : विचारविनिमयासाठी राघोपंतांचे गमन (८७७३).

**गोसाजी हिवरे—गेनाप्पा आप्पा देशमुख** : राघो अनंत राजवाडे याने आणलेली गुरे हजर करण्याचे आश्वासन, १३ र. खर, सु. ११९७/१५ ऑक्टो. १७९६ (८७७२).

**जनार्दन महादेव—देशमुख, देशपांडे मंदरूप** : पानगावच्या बाबती ऐवजाची मागणी, ६ र. खर, सु. १२१८/१२ फेब्रुवारी १८१८ (८७५२).

**नामाण्णा कोल्हार—रावसाहेब**× : तनखा मिळाल्याची पोंच, १५ र. खर, फ. ११८५/३ जून १७७६ (८७२७).

**देशमुख देशपांडे—मंदरूप—कामतीकर मोकदम** : उचापती खर्च देण्याची विनंती, १६ र. खर, सु. ११४०/१२ जुलै १७३९ (८७४३); **—मोकदम, मंदरूप** : देवीच्या समाराधनेच्या सामानां-बद्दल जहागिरदार यांजकडील सामान व वसूल पोहचविणे

पत्रे--चालू :

२४ जिल्काद, सु. ११६४/२६ मे १७६४ (८७४४); कर्जपट्टीचा ऐवज मिळाल्याची पोंच, १६ र. खर, सु. ११६५ /१२ ऑक्टो. १७६४ (८७४५); बापू फडणीस यांच्या कारकुनीविषयी, ११ जिल्हेज, सु. ११९७/१७ जून १७९६ (८७५१); – **विठोबा नाईक** : वांगी व वडीपूर गांवचा ऐवज गहाण ठेवल्यामुळे गणेशरावदादा यांचा रोखा दारवल करण्याची विनंती, २१ ज. खर, सु. ११९५/१५ ऑक्टोबर १७९४ (८७४७).

**देशमुख देशपांडे, मंदरुप--मार्नासगराव सुपेकर** : सरकारी कामकाज लक्षपूर्वक करण्याची सूचना, ७ र. खर, सु. ११९५/१ ऑक्टोबर १७९४ (८७४८).

**नथूखान हजरतखान--रावसाहेब**×: तनख्याची पोंच, ५ र. खर, सु. ११८५/१५ फेब्रुवारी १७८५ (८७२९).

**नारायणराव*--दरीबाई*** : टाकळी येथील इनाम जमिनीस उपद्रव होणार नसल्याचे आश्वासन, १९ साबान, सु. १२३१/३ फेब्रुवारी १८३१ (८७६१).

**परमाणा बागली--रावसाहेब**×: परमाणा नागशेटी व फकरप्पा यांच्या भाऊपणाच्या कजियास जामीन, १५ रजब, सु. ११८६/१४ मे १७८६ (८७३४).

**पाथरीकर मोकदम--त्रिवर्ग जमीनदार** : आप्पाजीपंत कुलकर्णी आईतोळेकर यांच्या अगत्याबद्दल सूचना (८७७०).

**बच्याजी जगन्नाथ --व्यंकटरावजी* व श्रीनिवासराव*** : चिंचोली येथे आगमन व ऐवजाविषयी, १ मोहरम, सु. १२१७/२१ नोव्हेंबर १८१६ (८७५६).

**बहिरजी जगताप--बळवंतराव सुभेदार** : चिंतोपंत यांस खर्चास द्यावयाचा ऐवज, १९ र. खर, सु. ११७४/१० जुलै १७७३ (८७२६).

**बुऱ्हाण अफजलखान--शंकरराव सरदेशमुख** : शेरव मुळुक याच्या बैलांची सुटका करणे (८७६६).

**मरयाप्पा चांभार--व्यंकटरावदादा देशपांडे** : वंशपरंपरेने जोडे पुरविण्याचा करार, १२ र. वल, सु. १२३१/१ सप्टेंबर १८३० (८७६०).

**माधवराव नारायण--यशवंतरावदाजी*** : बापूजी पाटील बोरालकर याजकडे वटवट गावचा मक्ता ठरवून इस्ताव्याचा कौल देण्याची विनंती, २१ साबान, सु. १२२०/१५ जून १८१९ (८७५४).

**मानाजीराव देशमुख--त्रिवर्ग वकील** : सोलापूरकर व बाबतीवाले यांच्यातील ऐवजाच्या ठरावाचा तंटा, ४ रजब, सु. १२२५/२३ फेब्रुवारी १८२५ (८७५५).

**मोकदम, बेऊर--माधवरावनाना*** : रोडगीकर व मिरगीकर यांच्या कजियात रोडगीकरास जामीन असल्याविषयी, १० ज. वल सु. ११८५/२२ मार्च १७८५ (८७३३).

**रामचंद्र व्यंकटेश देशपांडे--गिरिधररावबापू*** : अक्कलकोट परगण्यांची खराबी (८७६२–८७६३).

**रायेप्पा सोमण्णा--माधवरावनाना*** : सोमण्णा महाल्या रोडगीकर याच्या कामांची हमी व जामिनकीबद्दल, १७ रजब, सु. ११८४/१८ जून १७८३ (८७३२).

**रुद्रगौडा व रंगप्पा कुलकर्णी--जनार्दनपंत**×: कुरडगी गावच्या लावणीसंचणीचे आश्वासन, १९ मोहरम, सु. १२१५/१ जानेवारी १८१५ (८७५३).

पत्रे--चालू :

**रोडगीकर मोकदम--नानासाहेब* व माधवरावनाना*** : रोडगी व मिरगी येथील शेतजमिनीचा तंटा, ११ ज. वल, सु. ११८६/१२ मार्च १७८६ (८७३५–८७३६) (८३३७).

**लखाअप्पा जमादार--रावसाहेब**×: तनख्याची पोच, १ जिल्हेज, सु. ११८५/१६ ऑक्टोबर १७८४ (८७२८).

**लक्ष्मणभट* व शशभट*--शामभट* व बाळंभट*** : उपाध्येपण व ज्योतिषीपणाच्या वृत्तीसंबंधी (८७७१).

**विठ्ठल गोपाळ महुलेकर--गिरिधर शंकर देशपांडे** : अकोले येथील ऐवज सैदाभाई याजकडून मिळाल्याची पोच, १५ जिल्हेज, सु. ११९७/२१ जून १७९६ (८७५०).

**व्यंकटराव गिरिधर देशपांडे--आप्पाजीपंत*** : आछेर गावच्या इनामाच्या वहिवाटीची मागणी (८७६९).

**व्यंकाजी शामराव--श्रीनिवासराव आप्पा*** : अवराद या इनामगावच्या जप्तीच्या मोकळिकेची विनंती (८७६४)

**सदाशिव गौडा, गोविंद देवराव--श्रीनिवासपंत*** : घरगुती मजकुरासंबंधी, १५ रमजान, सु. १२०८/१६ नोव्हेंबर १८०७ (८७६८).

**साताई समाणा--गणपतराव*** : नाईकाच्या घरी झालेल्या चोरीचे वृत्त, २९ ज. वल, सु. १२१२/२१ जून १८११ (८७३९). **सुलतानभाई कालेकर--कंपनी सरकार** : लाटगावी केलेल्या चाकरीच्या रोजमुऱ्याची पोच, ४ सप्टेंबर १८२२ (८७४०).

**सैफनभाई*--रावसाहेब*** : तनख्याची पोच, १५ र. खर, सु. ११८५/२५ फेब्रुवारी १७८५ (८७३०).

**हवंजदारखान--त्रिवर्ग जमीनदार** : मंदरूप येथील ऐवजवसुलासंबंधी, दसिगंडी ठाणे हिदायतखांच्या हवाली करण्याचा करार, सिलेमानखाँ यास जरूर पाठविण्याबद्दल (८७६७).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली]

**इंडी व मुद्देबिहाळकर कमिशनर--** (--) : स्वामी नाईक याचा ऐवज देण्याबद्दल दादो विठ्ठल उटगीकर यास हुकूम, ९ ऑगस्ट १८२६ (८७१४); ३ मे १८२६ (८७२४); शिवप्पा तेलीने केलेल्या फिर्यादीबद्दल कोर्टात हजर राहण्याचा राघवेंद्र आचार्य वगैरे सुरपालीकर ब्राह्मणांना हुकूम, १५ जानेवारी १८२८ (८७१५); (८७१६); २६ जानेवारी १८१८ (८७१८); गणपत पाटील यांच्यावरील फिर्यादीचे कागदपत्र घेऊन कोर्टात हजर राहण्याचा सुबाप्पा देशपांडे यास हुकूम, १० नोव्हेंबर १८२८ (८७१७); गुराप्पा कुलकर्णीच्या फिर्यादीच्या कागदपत्रांसह कोर्टात येण्याचा ईश्वरप्पा देशपांडे यास हुकूम, नोव्हेंबर १८२८ (८७१९); रयतेकडील ऐवजाबाबत सिनप्पा पुरोहित व व्यंकाप्पा वगैरेस कोर्टात येण्याचा हुकूमा २६ जानेवारी १८२८ (८७२०); रामचंद्र आचार्य याने केलेल्या फिर्यादीच्या चौकशीसाठी येण्याबद्दल नरसिंहाचार्य यास हुकूम, ७ मार्च १८२९ (८७२१); चैनबसव व संजीव कोष्टी यांच्या निवाड्यासाठी गवडाप्पा गुमास्ते पाटील यास कोर्टात हजर राहाण्याचा हुकूम, १६ नोव्हेंबर १८२८ (८७२२); ऐवजाचा फडशा करण्याबद्दल नरसाप्पा नाईक देसाई यास कोर्टात येण्याचा हुकूम, २७ सप्टेंबर १८२९ (८७२३).

**कामतीकर मोकदम** – (--) : हप्त्याने ऐवजाची वसुली करण्याचे आश्वासन, सु. ११४०/इ. स. १७३९–४० (८७४२)

**व्यंकटराव गिरिधर देशपांडे** – (--) : मंदरूप परगण्याच्या वहिवाटीसंबंधी (८७६५).

पत्रे—चालू :

[रावजी देशमुख यास आलेली]

**कृष्णाजी विनायक सोवनी**—वांळूज वगैरे महालातील हिशेब पाठविल्याबद्दल, फाल्गुन शु. ११,श. १७३१/१६ मार्च १८१० (१४४६९).

**दलपत व रणधीर नाईक वगैरे**—पुण्यास दाण्याची खेप घेऊन आल्यावर भास्करपंतानी सरकारी वाड्यात अन्न घेतल्याने त्याचा बंदोबस्त करण्याची विनंती, श्रावण व. ५, श. १७३५/१६ ऑगस्ट १८१३ (१४५०४).

**निळो नारायण**—मुरंब्याची घागर पाठविल्याबद्दल ११ जिलकाद, श. १७३३/२८ नोव्हें. १८११ (१४४८५).

**बाजी मल्हार**—हंगामाचे दिवस असल्याने हिशेबाची निकड न करण्याची विनंती, २५ जिल्हेज, श. १७३१/३१ जाने. १८१० (१४४७१).

**मल्हार माधवराव**—यशवंत खंडेराव याच्या इमारती कामाबद्दल हमी, कार्तिक शु. ७, श. १७३७/८ नोव्हें. १८१५ (१४५०८).

**यशवंत खंडेराव देशपांडे**—मुदकवि किल्याच्या तटबंदीचे व बुरुजाचे काम उत्तम रितीने करीन म्हणून आश्वासन, कार्तिक व. ३, श. १७३७/१९ नोव्हें. १८१५ (१४५०९).

**राम पाटील**—तेरळ येथील गोपाळ अनंत दळवी याजकडून दूर केलेले शेत मक्त्याने ठरवून घेतल्याबाबतची कलमे, वैशाख शु. ५, श. १७३८/२ मे १८१६ (१४५१०).

**विसाजी बल्लाळ अभ्यंकर**—सरकार चाकरी करण्याची इच्छा धोतरजोडी रवाना, ८ जिलकाद, सु. १२१२/२५ नोव्हें. १८११ (१४४८६).

**शेख मनु, शेख ईभ्राम वगैरे जमादार**—बागलकोट येथील चाकरीबद्दलचा बोभाटा लक्षात घेऊ नये म्हणून, २५ सवाल, श. १७३४/३१ ऑक्टो. १८१२ (१४४९६).

**सदाशिव व्यंकटेश**—बागलकोट येथे चाकरीस असलेल्या लोकांबद्दल व बसालत बेग यांच्याबद्दल तक्रार, आश्विन व. १२, श. १७३४/३१ ऑक्टो. १८१२ (१४४९७).

[विनायक देशमुख यास आलेली पत्रे]

**काशिनाथ कृष्ण**—गुणवंतगड येथील कारसाई देण्याबद्दल सदाशिवपंत भाऊ याजकडील कमाविसदारांना द्यावयाच्या पत्राविषयी (१४५२४).

**गंगाधरभट लेले**—गोपाळपंत खंडकर याजकडील कल्याणच्या जकातीचा ऐवज तुमचे खात्यास जमा केल्याबद्दल, श्रावण व. १, श. १७३६/२ ऑगस्ट १८१४ (१४५०५).

**गणेश अनंत देशमुख**—महाराजाची स्वारी माहुलीस आल्यामुळे बगाबाईचे पुण्यास जाणे स्थगित, गाठी व साखर फुटाणे वाई येथे रवाना, २३ सफर, सु. १२१२/८ मार्च १८१२ (१४४७५); नागझरी येथील लिहिलेल्या मजकुराविषयी (कसला मजकूर त्याचा उल्लेख नाही) चौकशी, १० जिलकाद, सु. १२१२/२७ नोव्हेंबर १८११ (१४४८७) ; सखाराम याची घोडी व प्यादे देऊन वाई येथे रवानगी, महाराजांचे वाड्यापुढे सोपे बांधावयाच्या कामासंबंधी, २३ सफर, सु. १२१२/८ मार्च १८१२ (१४४९२); नागझरी येथील वसुलाबाबत चौकशी (१४५२५).

**गोपाळशास्त्री लिमये**—बाळाजीपंत दांडेकर यांनी पट्टीबाबत राजवाडे यास केलेल्या तगाद्यास विसाजीपंत यांच्याकडून मनाचिठी आणण्याबद्दल, पौष शु. १२, सु. १२१७/३१ डिसें. १८१६ (१४५१८).

पत्रे—चालू :

**चिंतो वामन देशमुख**—पेण येथील पावगी (मीठ तयार करणारा कारखानदार, व्यापारी, मक्तेदार) हिशाचे हिशेब, लिहिलेल्या शेऱ्याप्रमाणे आकारून जलद पाठविण्याची विनंती (१४४८२) ; कल्याण भिवंडी येथील जकातीचा ऐवज हुंडेकरी व जव्हारदार यांजकडून वसूल करुन ठेवण्याची आज्ञा, ५ जिल्हेज, सु. १२१२/२२ डिसें. १८११ (१४४९१).

**जनार्दन भिकाजी करंदीकर**—वहिनीबाईचे याजेस गमन, भाऊ दातार यांने धुळप याजकडून घेतलेल्या ऐवजासंबंधी, माघ व. ८, सु. १२१२/५ फेब्रु. १८१२ (१४४७७) ; महालाचे व आरमाराचे फडणीसीचे कामकाज महालातील फडणिसाच्या हातून घ्यावे व आरमाराचे फडणीसीचे वेतन सरकारात पाठविण्याबद्दल, माघ. व ८, सु. १२१२/५ फेब्रु. १८१२ (१४४९०).

**जनार्दन नारायण फडके**—पत्र आल्याशिवाय भेटीस येणार नसल्याबद्दल, ज्येष्ठ शु. १३ श. १७३३/४ जून १८११ (१४४७६).

**जनार्दन हरि फडके**—आज्ञेप्रमाणे नंदादीपाची व्यवस्था केली असल्याबाबत आषाढ शु. ७, सु. १२१३/१५ जुलै १८१२ (१४४९४).

**दादाभट फडके** (उपाध्ये)— प्रवासास दिलेले घोडे परत पाठविले, फाल्गुन व. ७, श. १७३३/५ मार्च १८१२ (१४४७४). कर्जफेडीसाठी प्राप्तीची सोय करण्याची विनंती, ज्येष्ठ व. १०, सु. १२१३/४ जुलै १८१२ (१४५०३).

**नारो बल्लाळ जोग**—कुरोलीचे चिठ्ठीबाबात विनंती (चिठ्ठीबाबत अधिक उल्लेख नाही). पौष शु. २, सु. १२१७/२० डिसें. १८१६ (१४५१५).

**नारो बल्लाळ रानडे**—गोपाळपंत खंडकर यास कारसाई बद्दलच्या पत्राची रवानगी व बाबासाहेबांच्या स्वारीने पुळचाचे गणपतीहून केलेल्या मुक्कामाबद्दल, २७ जिल्हेज, शु. १७३१/२ फेब्रु. १८१० (१४४६०); किल्याच्या खर्चास जकातीपैकी व महालापैकी नेमून दिलेल्या भरण्याच्या ऐवजाची पावती घेण्याबद्दल व रावते, महार, सुतार यांच्या मागणीबद्दल खुलासा, १० जिल्हेज, शु. १७३१/१६ जाने. १८१० (१४४६१–१४४६२). चांगली कुणबीण पाठविल्याबद्दल, सहस्त्रबुद्धे यांच्या हुंडीच्या ऐवजाच्या पावतीबाबत जयगडचा हवालदार व सरनाईक यांच्यात झालेल्या मारामारीच्या जबान्या पाठविण्याबद्दल कलमे, २६ जवल, श. १७३१/१० जुलै १८०९ (१४४६५ ते १४४६७); रामचंद्र नारायण सोवनी याजकडील वसूल जमा केल्याबाबत. ९ सवाल, श. १७३३/२७ ऑक्टो. १८११ (१४४८०); रत्नागिरी येथील ऐवज रवाना, ७ सफर, सु. १२१७/२७ डिसें. १८१६ (१४५१४); तिळगुळ रवाना, २५ सफर, सु. १२१७, १४ जाने. १८१७ (१४५१७), आप्पाजी महादेव जोशी, रामचंद्र नारायण सोवनी यांचेकडील व कासारीगांव येथील वसुलीस तगादा व ऐवज आल्यावर कळऊ म्हणून (१४५२९).

**पेमराज मारवाडी**—कोठारात साठविलेल्या गव्हाच्या तंटचाबाबतचे निवेदन, कार्तिक व. ५, श. १७३५/१२ नोव्हें. १८१३ (१४५००).

**बगाजी आप्पाजी लागू**—बापूसाहेब गोखले यांचे पंढरपूर येथे गमन, माघ व. ११, सु. १२११/१९ फेब्रु. १८११ (१४४७२).

**बाळाजी बच्याजी दांडेकर**—वरातेच्या ऐवजाबद्दल खुलासा, १९ सफर, श. १७३१/२५ मार्च १८१० (१४४६८)

पत्रे—चालू :

**भिकाजी बाबुराव भिडे**— चंद्रगड येथील सरकारी शेताच्या वहिवाटीच्या तंट्यावरुन भाताची जप्ती व वसुलीबद्दल आज्ञा करण्याची विनंती, कार्तिक शु. ७, शु. १७३३/२४ ऑक्टोबर १८११ (१४४७९), गडकऱ्यापासून वसूल घेण्याबाबात रोजमुऱ्यास ऐवज पाठवावा किंवा वसुलाची आज्ञा द्यावी म्हणून, माजी मामलेदारास चंद्रगड किल्याचे देवाचे चांदीचे कडे देण्याचा तगादा करण्याबद्दल, मार्गशीर्ष शु. ११, सु. १२१२/२६ नोव्हेंबर १८११ (१४४८४).

**माधवराव गोविंद देवधर**—ताडकर याजवरील वरातीच्या ऐवज वसुलास मनाई न करण्याची विनंती, १४ ज. खर, सु. १२१३/२४ जून १८१२ (१४४९५).

**महादजी भास्कर सोवनी**—हरी बाबर पानसे व राणोजी याजबरोबर ऐवजाची रवानगी, विठ्ठलपंत गोखले याजकडील कुळाच्या मुदतीच्या चिठ्या पाठविण्याबाबत (१४५२१).

**मोरो बापूजी कोन्हेर**—फरासखान्याकडे खरेदी केलेल्या कापडाच्या ऐवजाबाबत, श्रावण व. १०, सु. १२१८/६ सप्टेंबर १८१७ (१४५२०).

**विठ्ठल शिवराम चक्रदेव**—नागझरी येथील अंमल तेवीसशे रुपयांत करण्यास तात्या याजकडून नकार, मार्गशीर्ष व. १२, सु. १२१२/१२ डिसेंबर १८११ (१४४८८).

**विनायकराव केशव आठवले**—लोहगड किल्याच्या खर्चास दिलेल्या पैशाचा हिशेब, उरसाच्या साहित्याची तरतूद करण्याची विनंती, ३ जिल्हेज, सु. १२१२/२० डिसेंबर १८११ (१४४८१).

**विसाजी कृष्ण रानडे**—स्वारी पुळ्याचे गणपतीस येणार म्हणून केलेल्या तयारीचे निवेदन व न आल्यास आणलेले जिन्नस माघारे पाठवावेत किंवा काय याबाबत विचारणा, २२ जिल्हेज, श. १७३१/२८ जाने. १८१० (१४४६४) ; फाकडे याजकडील हुंड्या फाटक यांचे हवाली केल्याबाबत, ७ सफर, सु. १२१७/२७ डिसेंबर १८१७ (१४५१३) ; द्वादशीचे शिध्याचे सामान आले नसल्याबाबत (१४५२२) ; सखोपंत जो ऐवज जमा करतील त्याप्रमाणे जमाखर्च करुन पावती घेणे (१४५२८).

**विसाजी बच्याजी**—बाजी यादव याजकडील गांव जप्तीतून मोकळे केल्याबद्दलच्या दरबार खर्चाचा ऐवज सखाराम नाईक याजकडून घेण्याची आज्ञा, १० जिल्हेज, सु. १२१२/२७ डिसें. १८११ (१४४७८).

**विसाजी बल्लाळ अभ्यंकर**—देशमुखीचा अंमल मंत्री यांचे चालीप्रमाणे द्यावा किंवा सरकार चालीप्रमाणे करावा याबाबत सत्वर पत्रे पाठविण्याची विनंती (१४५२७).

**श्रीधर नारायण बनकर**—कृष्णाजीपंतावर कृपा होऊन सांभाळ करण्याची विनंती, १२ सवाल, श. १७३७/१६ सप्टेंबर १८१५ (१४४७०).

**श्रीधर विठ्ठल देशमुख**—घरगुती मजकुराबाबत (१४४८३).

**सदाशिव जनार्दन लवाटये**—पत्राप्रमाणे पुण्यास यावयास निघाल्याबद्दल, १० मोहरम, श. १७३१/१५ फेब्रु. १८१० (१४४६३).

**गोविंद दामोदर—रावजी** : आंब्यांची रवानगी, आषाढ शु. १४, श. १७३८/२० जुलै १८१५ (१४५१९).

**नारायणराव खानविलकर—रावजी गोसावी** : तालुक्याचा बंदोबस्त करून देण्याची विनंती ( तालुक्याचे नांव नाही ), १८ ज. खर, सु. १२१७/६ मे १८१७ (१४५११).

पत्रे—चालू :

**नारो विश्वनाथ मुळ्ये—विनायक रावजी दादा** : लग्नाबद्दल रावजीपाशी बोलणी करण्याची विनंती, मार्गशीर्ष व. १२, सु. १२१२/१२ डिसेंबर १८११ (१४४८९).

**बगाबाई*—विनायकराव दादा देशमुख** : गाठी व साखरफुटाण्यांची पोहोंच, फाल्गुन व. ९, सु. १२१२/७ मार्च १८१२ (१४४९३).

**शंभू*—विनायकपंत दादा देशमुख** : सोन्याच्या भावाबद्दल चौकशी, दाजीबा काका देशमुख यास कोकणांत जाताना वाटखर्चास दिलेल्या पैशाच्या हिशेबाबाबत, ज्येष्ठ व. ३, सु. १२१२/२७ जून १८१२ (१४४९८).

**रामचंद्र गणेश भिडे—विनायकराव बाबा देशमुख** : वाड्यांतील तेलाच्या नेमणुकेबद्दल विनंती (१४५२६).

**रामचंद्र जिवजी—रावजी दादा** : जाबसाल उलगडून देण्याची विनंती, १८ ज. खर, सु. १२१७/६ मे १८१७ (१४५१२).

**विनायक चिंतामण—पांडुरंग सदाशिव टिपणीस** : फरासखान्यातील कापडी दागिन्यापैकी स्वारीत पाठवावयाच्या नगांखेरीज शिल्लक राहिलेल्या नगांच्या यादीची मागणी (१४५०६).

**विनायक चिंतामण देशमुख—व्यंकाजीपंत गद्रे** : रघुनाथ बाबुराव कोल्हेरकर याजकडे असलेल्या भोगांव व येकसर या गावांना उपद्रव न देण्याबद्दल ताकीद, १९ जिल्हेज, सु. १२१६/२१ नोव्हेंबर १८१५ (१४५०७).

**[ फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली ]**

**आबाजी गणेश**—(—) : ताभाले येथील अजमासाची नक्कल रवाना व ताभाले गांव विसाजीपंत दादा हसबनीस याजकडे कमाविशीस असल्याबाबत (१४५४२).

**आबाजी गणेश तेंडूलकर**— (—) : संभाजीपंत देशमुख व प्रेषक यांच्या मोड, ताभाले, टेबवली, तलावडे या देवस्थानाकडील इनाम गांवांच्या वहिवाटीसंबंधी (१४५३७).

**आबाजी रघुनाथ बाम**— (—) : रंगीत व रुपेरी कागद यादीप्रमाणे मिळाले, जिनगर व मेणबत्त्या पाठवून देण्याबद्दल, (१४५५७) ; रामचंद्रपंत आप्पा यास निरोपसमयी देण्यात येणाऱ्या वस्तूबद्दल चौकशी (१४५५८).

**गणेश सदाशिव जोशी**— (—) : आपल्यामार्फत सरकारांत भरलेल्या ऐवजाचा व जोशी याजकडे निघत असलेल्या ऐवजबाकी संबंधी खुलासा (१४५६५).

**गोपाळ**— (—) : पाली व वयंगणे या खोती असलेल्या गावापैकी वयंगणे येथील मामलेदारांनी वहिवाटीबाबत घालमेल केल्याबद्दल (१४५६०).

**गोपाळ अनंत दळवी**— (—) : राघोपंत बाबा यास पत्र आल्यावर शेताचा कौल घेतो म्हणून (१४५४९) ; तलवडे येथील शेताचा राब करण्याबद्दल वासुदेवपंत आण्णा यास पत्र देण्याची विनंती नारळ रवाना (१४५५१-१४५५२).

**चिंतो आप्पाजी चिचोरे**— (—) : साकसे येथील भात सावकार सरकारातून विकत घेऊन देत असलेला ऐवज पारखून निशाणे मारून देण्याबद्दल घेत असलेल्या पारखाईच्या दराबाबत (१४५५६).

**चिंतो वामन**— (—) : पुण्यास पाठविलेल्या घोड्यांचा तपशील (१४५६१).

**त्रिंबक परशुराम परांजपे**— (—) : आज्ञेप्रमाणे हणमंत पेठे याची वसाहत करून देण्याचे आश्वासन (१४५६७).

पत्रे—चालू :

**दाजी रघुनाथ सहस्रबुद्धे**— (—) : फणसपोळी व पोफळी यांची रवानगी (१४५४४).

**नारो विश्वनाथ मुळे** — (—) : गणेश नारायण साने याजकडे येणे असलेल्या आसामींच्या वेतनाच्या ऐवजासंबंधी, कारखान्याचे काम आटोक्यात आले असल्याचे निवेदन (१४५३४–१४५३५).

**नारो सदाशिव जोशी**— (—) : जिऊबाई भानू हीस दरमहा मिळत असलेले पैसे मिळाल्याबद्दलचा दाखला पाठविल्याबद्दल (१४५६४).

**बच्याजी सदाशिव फडके**— (—) : खर्चास पाहिजे असलेल्या ऐवजासाठी निळोपंत आबा व नारोपंत नाना यास पत्र पाठविण्याबाबत, येसगांव येथील तगाईच्या बाकीच्या फडशाबाबत (१४५५५).

**बाबाजी केशव देसाई**— (—) : तिळगूळ व डोक्यास बांधावयाचे रुमाल यांची रवानगी (१५५६६).

**बालाजी भास्कर जोगळेकर**– (—) : केळकर व धाणेकर यांच्या शोधाबाबत निवेदन (१५५३८).

**भास्कर गोपाळ नेने** — (—) : त्रिंबकजी पाटील ढमाले याजकडील ऐवजाबाबत (फाटके) (१४५३०).

**भिकाजी बाबूराव भिडे**— (—) : गावाच्या (गावाचा उल्लेख नाही) मोकाशाच्या ऐवजाच्या जमेबद्दल चौकशी (१४५४३).

**माधवराव अनंत**— (—) : वाई येथील धर्मपुरी व गंगापुरी येथील महाविष्णु व पंचायतनाच्या उत्पन्नास अन्याबा सुभेदार याजकडून उपद्रव (१४५६३).

**महादजी कृष्ण लिमये**– (—) : महालाचे दुसाला ताळेबंदाच्या ऐवजाबाबत (१४५४८).

**महादजी विनायक जोशी**— (—) : खर्चाची अडचण असल्याने ऐवज पाठविण्याची विनंती (१४५४७).

**राघो भास्कर लवाटचे**— (--) : सांभाळ करण्याची विनंती (१४५५४).

**वासुदेव शिवराम जोशी व गणेश बल्लाळ देसाई**— (—) : साकसे येथील ऐवज भरण्याबाबत, जनार्दन रघुनाथ वैद्य यांच्याकडील भात विक्रीबाबत, विसापूर येथील नेमणुकी भात व नक्त ऐवज देण्याबद्दल खुलासा वगैरे कलमे (१४५५९).

**विनायक बल्लाळ** — (--) : पत्रद्वारे सांभाळण्याची विनंती (१४५६८).

**विसाजी धोंडदेव गोडबोले**— (—) : कार्यासाठी ऐवज देण्याची विनंती (१४५४१).

**विसाजी बच्याजी** —(—) : चोरे तर्फे उंब्रज येथील कमाविसदार गणेश चिंतामण घारपुरे याजकडून रयतेस होत असलेल्या उपद्रवाचा बंदोबस्त करण्याची विनंती (१४५७०).

**श्रीधर बल्लाळ मराठे** — (—) : सरकारी भाताचे देखरेखीसाठी मुंबईस जाणार असल्याबाबत (१४५३९) ; सखोबाच्या नेमणुकेबद्दल विनंती (१४५४६).

**हरी अनंत गोडबोले**— (—) : श्री त्रिंबकेश्वर महाराज यांच्या अनुष्ठानाच्या हिशेबाविषयी (१४५४०).

पत्रे—चालू :

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]**

(—)–**परशराम** : मानाजी नाईक याजकडील कडब्याच्या विक्रीबाबत, मथुरादास मारवाडी याने पैसे आणून दिल्यास घ्यावे तगादा लावू नये, गोविंदपंत तात्या याजकडील ऐवजाची वसुली वगैरे कलमे (१४५५०).

(—)–**विनायकराव** : हुंडेकरी व जवारदार याजकडील ऐवज लवकर वसूल करण्याची आज्ञा (१४५३६).

(—)–**विनायकराव देशमुख** : काशीपंत जोगळेकर याजकडील ऐवज वसुली करण्याबाबत, ज्येष्ठ सु. ४, श.१२११/२६ मे १८११ (१४४७३).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]**

घरगुती मजकूर (१४५३१); भिमाई हिने आपला जावई गुणाजी यास आपले वतन दिल्याने बेटावद येथील जमीनदार तंटा करतात त्यास ताकीद करण्याची विनंती (१४५३२); महिपती दशमुखे हुंडेकरी याजकडे येणे असलेल्या जकातीच्या हसिलाच्या ऐवजाबद्दल त्यास कमलगड येथे अटक व त्याची रवानगी करताना त्याजवर झालेल्या खर्चाबाबत विचारणा (१४५३३); सावित्रीबाई आग्रा येथे सुखरुप असल्याचे निवेदन (१४५४५); कानिटकर व जोशी यांच्यातील तडजोडीबाबत (१४५५३); परगणे हवेली, परांडे व वांगी येथील मामलतीपैकी अक्कलकोटकर भोसले घेत असलेल्या सुभे खर्चाच्या ऐवजासंबंधी विचारणा (१४५६२); हैबतराव शंकर याजकडील मजमदाराकडे येणे असलेल्या ऐवजाच्या वरातीसंबंधी (१४५६९); परशराम हरि कोल्हटकर यांच्या नेमणुकेबाबत (१४५७१).

यादी :

**चिंतो वामन देशमुख—विनायकराव देशमुख** : जिनसांची (१४५२३).

**रुमाल क्र. २८ पुडके क्र. २ का. सं. ११२ (१४५७२–१४६८३)**

**सु. स. १२०१–१२१८, इ. स. १८००–१८१७**

कतबा :

**खंडाबा नाईक**– (—) : हुंडीच्या तंट्याबाबत हरजी दानवे यास हजर करण्याची कबुली (१४६७२).

पत्रे :

**कृष्णंभट गोखले—विठोबा गोखले** : बापूभट साठे याजकडील ऐवजाबद्दल व कोकणच्या पत्रांबद्दल विनंती (१४६५८).

**गणेश महादेव देशमुख—विनायकराव देशमुख** : कुशल वृत्ताची अपेक्षा (१४६८१).

**गोपाळ दीक्षित—बाबा** : तिळगुळाची रवानगी (१४६१७).

**चिंतो वामन देशमुख—बाबाजीपंत देसाई** : बागलकोट किल्यावरील लोकांच्या जदीदवादीची मागणी व जामीनकी घेतल्याबद्दल खुलासा, १७ र. वल, सु. १२१२/३१ मार्च १८१२ (१४५७२). (नक्कल); हरिपंत देशपांडे व सदाशिवपंत यांना पाठविलेल्या पत्राप्रमाणे बागलकोट किल्यावर नवीन लोक नेमल्याबद्दल विनंती, १४ ज. खर, सु. १२१३/२४ जून १८१२ (१४५७५) (नक्कल), —**हरिपंत देशपांडे** : बागलकोट किल्यांतील नेमणुका बाबाजीपंत देसाई रिसालदार याच्या सल्ल्यानुसार करण्याची विनंती, १७ र. वल, सु. १२१२/३१ मार्च १८१२ (१४५७३) (नक्कल);

पत्रे—चालू :

किल्यावरील नेमणुकेच्या लोकांपैकी लोक जदीदबाद न करण्याबद्दल जनार्दनपंत याचे पत्र, इ. स. १८१२–१८१४ (१४५७६) (नक्कल); —सदाशिवपंत* : बागलकोट किल्यावरील नेमणुकांबाबत विनंती, १७ र. वल, सु. १२१२/३१ मार्च १८१२ (१४५७४) (नक्कल); हरि देशपांडे यास लिहिलेल्या पत्राप्रमाणे किल्यावरील लोकांची जदीदबादी करणे व हरि आबाजी साने याचा रोजमुरा देणे याबद्दल विनंती, इ. स. १८१२–१८१४ (१४५७७) (नक्कल); — विनायकराव देशमुख : भास्कर विश्वनाथ हुंडेकरी व चारण यांच्याशी सरकारी शिरस्त्याप्रमाणे वहिवाट करीत नसल्यामुळे पुणे व जुन्नर येथील जकातीच्या कमाविशीवर सदाशिव नारायण टापरे याची करावयाची नेमणूक, २४ मोहरम, पौष, सु. १२१३/२८ जाने. १८१३ (१४५७८); — हिरडस मावळकर जमीनदार : अमरसिंग, हणमंतराव वगैरे शिर्के मंडळींच्या तर्फे हिरडस मावळमधील सरदेशमुखी इनाम व इसाफती गावांच्या वांटणीसंबंधीच्या निवाडयाप्रमाणे शिर्के मंडळींची समजूत करण्याची सूचना, सु. १२१३/इ. स. १८१२–१८१३ (१४५७९); — नारोपंत रानडे : बापूजी कृष्ण तुपे व गोविंद भास्कर रसाळ यांचा निवेडी येथील खोतीचा तंटा मिटविण्याची विनंती, ९ ज. वल, सु. १२१३/१० मे १८१३ (१४५८०) (नक्कल); – नरसोजी नेढे : मुरटी व मोरगांव यांच्या शीवतंटयामुळे मुरटीकर गांवकऱ्यांस चौकशीसाठी पुण्याला पाठविण्याची सूचना, इ. स. १८१२–१४ (१४५८१) (नक्कल); — चितो राजाराम कुलकर्णी : बालनाक महारास जामीन राहिल्याबद्दलच्या लेखी पुराव्यासह महार घेऊन जाबसालास येण्याची विनंती, १९ ज. वल, सु. १२१४/१० मे १८१४ (१४५८२); — सखोजी कराले सुभेदार : पांडुरंग महादेव गोडसे यांजकडून परीटवाडी येथील शेतांचा धारा महाल शिरस्त्याप्रमाणे ब्राह्मणधाऱ्याप्रमाणे घेण्याबद्दल सूचना, इ. स. १८००–१८१७ (१४५८३); –अंताजीपंत* : अमरसिंग वगैरे शिर्के मंडळींचा वतन वांटणीचा तंटा मिटल्यामुळे शिर्के मंडळींना सरदेशमुखी व इनाम गांवचा वसूल सुरळित देण्याची विनंती, इ. स. १८००–१८१७ (१४५८४) (नक्कल); – अमरसिंग राजे शिर्के : काशीराव व कुवरजी राजे शिर्के यांच्या मातुश्रीच्या वांटणीचा तंटा मिटविण्याची विनंती, इ. स. १८००–१८१७ (१४५८५); – हरि कृष्ण कुलकर्णी वाडेकर : गुण्या महार याच्या वतनाच्या चौकशीसाठी तत्संबंधीच्या कागदपत्रांसह पुण्यास येण्याची विनंती, इ. स. १८००–१८१७ (१४५८६) (नक्कल); — हरि कृष्ण फाटक : राघो कोंडेकर याच्या गुरांच्या मोजणीत फरक पडल्याबद्दल विठू तनपुरे व विठू घारे यांजकडून घेतलेला गुन्हेगारीचा ऐवज परत देण्याची विनंती, इ. स. १८००–१८१७ (१४५८७); — मोरेश्वर दीक्षित मनोहर : गुणनाक व बालनाक महार यांच्या वाडे येथील वतन तंटयाच्या निवाडयापूर्वी घरी गेल्याबद्दल बालनाक महाराचे उत्पन्न अमानत ठेवण्याबद्दल मोकदमास चिठी, इ. स. १८००–१८१७ (१४५८८–१४५८९); — बालाजीपंत जोशी : नारो बल्लाळ रानडे यांनी दिलेल्या रत्नागिरी येथील रसदेच्या ऐवजापैकी सदाशिव बाबूराव मराठे व गणेश भटजी फडके यांजकडे पावस येथील घरबांधणीसाठी ऐवज देण्याबाबत, इ. स. १८००–१८१७ (१४५९०); —वासुदेवपंत जोशी : आवडीबाई जोशी चिपळूणकर हिच्या काळुंद्रे या गांवी उपद्रव न देण्याबाबत दुसऱ्या गावांच्या कुणब्यांस ताकीद करणे व महालकऱ्यांनी गांवकरी व पाटलाकडून घेतलेला मसाल्याचा ऐवज परत देवविण्याबद्दल विनंती, इ. स. १८००–१८१७ (१४५९२).

**बाळकृष्ण सयाजी—बाबासाहेब *** : खंडेरावजी यास मदत करण्याची सूचना (१४६११).

**वासुदेव धोंडदेव गोखले—हरभट व विठ्ठलपंत गोखले** : घरांतील गल्याची बेगमी व बापू देशमुख याने केलेल्या हुंडीच्या करावयाच्या फडशासाठी ऐवजाची मागणी (१४६६३).

पत्रे—चालू :

**विष्णु महादेव गोखले—गणेशभट गोखले** : तात्या देशमुख याजकडील ऐवज वसुलीबद्दल व देशमुख यास लिहिलेल्या पत्राबद्दल विनंती (१४६६१).

[केवळ प्रेषकांचा नामोल्लेख असलेली]

**आप्पाजी राम** – (—) : खानदेशांत जाण्यापूर्वी विंचूर येथे येण्याची विनंती (१४६४२).

**आबाजी अनंत भागवत** – (—) : बळवंतराव याची रवानगी (१४६५०).

**आबाजी रघुनाथ, नारो सदाशिव जोशी** – (—) : पत्र व मेणबत्त्यांची पोंच व मेणबत्त्यांची मागणी, ४ रमजान, भाद्रपद, आर्बा, सु. १२१४/३१ ऑगस्ट १८१३ (१४५९३).

**कादरखान - भालदार** – (—) : श्रीमंत महाराज यांचा नाणे मावळ घाटाने जुन्नर येथे जाण्याचा बेत व तेथे वाडा बांधण्याची योजना (१४६४८).

**काशी भिवराव** – (—) : आजारपणामुळे सेवेत अंतर पडल्याबद्दल दिलगिरी (१४६१०).

**काशीनाथ कृष्ण** – (—) : गुणवंतगड येथील लोकांच्या रोजमुऱ्याची सखारामपंत फडके संगमेश्वरकर याजवर दिलेली हुंडी, परवारी व मेटकरी यांच्या नेमणुकांबद्दल निवेदन (१४६५३).

**कृष्णाजी बाबाजी सिधये** – (—) : गल्याच्या बेगमीबद्दल खुलासा (१४६७६).

**गणेश बल्लाळ देसाई** – (—) : पेण बंदरातील पावगीच्या ऐवजाबद्दल विनंती परगणे सांकसे येथील पीकपाण्याबद्दल निवेदन, स्वामींकडील खाजगत भात कुळांकडे व्याजी लावण्याच्या आज्ञेबद्दल खुलासा २३ ज. खर, सु. १२१२/१५ जुलै १८११ (१४६७१).

**गोपाळ राम खांडकर** – (—) : वरवडे व मालगुंड गावांत शिवेचा तंटा असताना मालगुंडकरांच्या शेतांतील पिके कापून नेल्याबद्दलच्या जाबसालास वरवडेकरांस तलब व मसाला, इ. स. १७९६–१८१८ (१४६५२).

**गोविंद सखाराम दामले** – (—) : सांकसे येथे खरेदी केलेले भात रत्नागिरी येथे विक्रीस नेण्याबाबत खुलासा, इ. स. १७९६–१८१८ (१४६०८) (अपूर्ण).

**चिटको रघुनाथ** – (—) : वेतनांत वाढ करण्याची विनंती; इ. स. १७९६–१८१८ (१४६७०).

**चिंतो वामन देशमुख** – (—) : कुटरेकर शिर्के मंडळींच्या तर्फ हिरडसमावळ वगैरेंमधील सरदेशमुखी, इनाम व इसाफतीच्या वांटणीबद्दल खुलासा, इ. स. १८००–१८१७ (१४५९१); घेतलेल्या कर्जाचा व त्याबद्दल पावसपैकी रद्दकर्जास लावून दिलेल्या ऐवजाच्या हिशेबाची राघोपंत देसाई याजकडून मागणी, इ. स. १८००–१८१७ (१४६७८).

**त्रिंबक येसाजी व काशी त्रिंबक** – (—) : बाप्पाजी याजकडील ऐवजाच्या हवाल्याबद्दल व हिंदुस्थानांत वरात दिल्याबद्दल खुलासा, खुरशदजी मोदी याचे खंबायतेस गमन, पटवर्धन याचे गंगातीराकडे कूच, इ. स. १८११–१८१७ (१४६२५).

**त्रिंबकराव बच्याजी खांडेकर** – (—) : द्रव्यासाठी केलेल्या खणतीत झालेली फसगत व नुकसानीबद्दल निवेदन (१४६७४).

**नारो नरसिंह धायगुडे व आबुराव विठ्ठल** — (—) : पंतसचिवांकडील कारकुनाकडन सरकारी तालुक्यांत होणाऱ्या वसुलीच्या उपद्रवाबद्दल त्याच्या करावयाच्या परिपत्याबद्दल खुलासा

पत्रे—चालू :

(१४६०३); जेऊर येथून नगर येथे आगमन, वडगांव येथे टेहळणीस जाण्याचा बेत (१४६०४); स्वारांच्या हजेरीबद्दल व चंदीबद्दल खुलासा, बंदीच्या ऐवजाबद्दल विनंती, दायेम मिया व कायेम मिया याजकडील जमाव वडगांव येथे असून मध्यस्थीस कारकून रवाना (१४६०५); सरकारी मुलखांत उपद्रव दिल्याबद्दल सचिवांकडील कारभारी सोनोपंत यास हवाली करण्याबद्दल खुलासा (१४६०९); बंदीच्या ऐवजाची पोंच (१४६१४).

**नारो सदाशिव जोशी** – (—) : कोपरगांव येथे असलेल्या सरकारी घोड्यांपैकी सारंग्या घोड्यास भर रतीब सुरू केल्याबद्दल खुलासा (१४५९९); स्वारीचे टोके ते कोपरगांवपर्यंतचे मुक्काम, लष्कराचा श्रीकचेश्वराजवळ मुक्काम (१४६००).

**पांडुरंग लक्ष्मण** – (—) : उरपाड येथील जमावबंदीच्या कामाबद्दल निवेदन, पेंढाऱ्यांकडून सोनगडापासून नवसारीपर्यंतच्या प्रदेशाची खराबी (१४६४६).

**पुसेसावळीकर गांवकरी** – (—) : पनवेल बंदरांतून मीठ व किराणा जिन्नस भरून नेण्याबाबत, व्यापाऱ्यांना दिलेल्या अभयपत्रांची अंमलबजावणी (१४६६७), (१४६६९).

**बाबाजी केशव देसाई** – (—) : रास्ते यांच्या स्वारांबरोबर आलेल्या रोजमुरा ऐवजाबद्दल खुलासा, जालिहल येथील ठाण्यावर कबजा व बदामी किल्ल्याच्या कबजाचा प्रयत्न (१४५९७).

**बाळाजी लक्ष्मण** – (—) : शिवापुरास मुक्काम, महाराजांचे महाडहून पालगड येथे गमन (१४६३६).

**बुधकर गांवकरी** – (—) : पनवेल बंदरांतून मीठ व किराणा जिन्नस नेण्यास व्यापाऱ्यांना दिलेल्या अभयाची अंमलबजावणी (१४६६८).

**भगवंत** *– (—) : चंदीवैरण, वगैरे खर्चाबद्दल खुलासा (१४६२६–१४६२७); मुखेड व कुंभारीहून आलेल्या जिनसांपैकी विचुरकर वणजाऱ्याबरोबर गहू रवाना (१४६२८); पेंढाऱ्यांच्या मजकुराचे पत्र रवाना (१४६२९); नांदगांव येथील मुक्कामाबद्दल विचारणा, उरपाड येथील पत्रोत्तराची मागणी (१४६३०); उरपाड येथील पत्रांची रवानगी, पानसे यांच्या मुलीसह मोरोपंत यांचे आगमन (१४६३२); श्रीमंतांची स्वारी औशीचे मुक्कामाहून कोपरगांव येथे येणार असल्याची बातमी (१४६३३); पिंपळनेर, दहिवेलकडील पेंढाऱ्यांची बातमी कळविण्याबद्दल राजदेहरकरांस पत्र रवाना, पेंढाऱ्यांच्या नंदुरबार येथील मुक्कामाबद्दल बातमी (१४६३४); अन्याबाची पत्रोत्तरे उरपाड येथे रवाना नव्या घराच्या बांधकामाबद्दल खुलासा (१४६३५); पेंढाऱ्यांचा खानदेश, बागलाणांत तळ (१४६३७); अन्याबा याची राहोड्याहून आलेली पत्रे रवाना (१४६३८); पारोल्याची पेठ लुटून पेंढारी नंदुरबार येथे गेल्याची बातमी, स्वारीच्या कोपरगांव येथील मुक्कामाबद्दल विचारणा (१४६३९).

**भास्कर गोपाळ नेने** – (—) : पेठ या गावास दिलेले अभयपत्र लावणीसंचणी व कुळांकडील वसुली याबाबत खुलासा (१४६७३).

**महादजी विनायक जोशी** – (—) : वतनाच्या ऐवजाची हुंडीनुसार पोंच (१४६६२).

**माणको मोरेश्वर** – (—) : वैरणीच्या व इमारतीच्या कामास लागणाऱ्या ऐवजाबद्दल विनंती (१४६१५).

**मोरो गोपाळ** – (—) : लग्नतिथीसंबंधीच्या पत्राची अपेक्षा (१४६४१).

**मोरो महादेव मुंडले** – (—) : मोरो महादेव व धोंडो नारायण यांचा तंटा मिटेपर्यंत मोरो महादेव यास मसूर येथील इनाम जमिनीची वहिवाट करू देण्याबद्दल आपटे याच्या नांवे पत्र पाठविण्याची विनंती (१४५९४).

पत्रे—चालू :

**राघो बल्लाळ दांडेकर** – (—) : बदामीमधील कामे करून देण्याची विनंती (१४६५४).

**रामचंद्र गणेश भिडे** – (—) : सातारा येथील वाड्याच्या रोषणाईच्या व शाकारणीच्या बंदोबस्ताबद्दल लिंबकजी डेंगळे याचे गणेशपंत यास पत्र पाठविण्याची विनंती; इ. स. १८००–१८१५ (१४६८२).

**लक्ष्मण नारायण** – (—) : खंबायतकर घरशेटजी याच्या पत्रांतील मजकुराबद्दल व मोदी याजकडून घेतलेल्या हुंडीबद्दल खुलासा (१४६५९).

**विष्णु** – (—) : गोखले यांच्या घरांत मुलगी देण्यास आगाशे यांचा नकार, बाजी बल्लाळ आगाशे याजकडील येणे असलेल्या ऐवजाबद्दल विनंती (१४६६०).

**सखाराम केशव अभ्यंकर** – (—) : वेतनाचा ऐवज देण्याबद्दल सदाशिवपंत सरसुभेदारास पत्र लिहिण्याची विनंती (१४६५७).

**सखाराम व्यंकटेश** – (—) : वैजनाथभट भागवत यास पत्र प्रविष्ठ (१४६७५).

**सदाशिव भगवंत कानिटकर** – (—) : भागानगर प्रांतांतील वसूल रवानगीबद्दल खुलासा, २४ रमजान, सु. १२१२/१३ ऑक्टोबर १८११ (१४६८३).

**सदाशिवभट वैशंपायन** – (—) : घराची सोय करण्याची व कर्जमुक्त करण्याची विनंती (१४६४९).

**हरबा*** – (—) : खरेदी केलेल्या जिनसांची रवानगी, (१४६१८); स्वारीचा नाशिक येथे जाण्याचा बेत, लग्नाबद्दल श्रीमंतांस लिहिलेले पत्र वगैरे कलमांबाबत विनंती (१४६१९–(१४६२०).

**हरि गणेश बर्वे** – (—) : पाठविलेल्या ऐवजांतून खरेदी केलेल्या तांदुळाची व सरकार वाड्यांतील तांदुळाच्या हिशेबाच्या रवानगीबद्दल खुलासा (१४५९५); तांदूळ खरेदीसाठी ऐवजाची मागणी (१४५९६).

**[फक्त प्रापकांचा नामोलेख असलेली]**

(—) – **अन्या*** : खर्चाच्या बंदोबस्ताबद्दल विनंती (१४६४५) :

(—) – **चिटकोपंत*** : गोपाळराव याच्या मळ्यास उपद्रव न देण्याबद्दल बापू यास ताकीद (१४६५१).

(—) – **पांडोबा*** : माणसांच्या व तिळगुळाच्या पत्रांच्या रवानगीबद्दल खुलासा, स्वारीस कोकणांत जाण्याबद्दल विचारणा (१४६०१)

(—) – **विनायकराव*** : आबाजीपंत याजकडील जाबसालाचा व्हावयाचा उलगडा, लक्ष भोजनाकडील जिनसांच्या दराबद्दल खुलासा (१४५९८).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]**

वडुथ येथे सप्तमीचा कुळधर्म करून जेजुरी येथे परतण्याबद्दल निवेदन (१४६०२); सचिवांकडील कारभारी सोनोपंत यास हिंगणीजवळ कैद करून नारोपंत नाना याचे नगर येथे कूच, गणेशपंत दादा याचे रांजणगावास आगमन (१४६०६–१४६०७) (अपूर्ण); लग्नास येण्याची विनंती (१४६१२); विंचुराहून राहोडा येथे मुक्काम, भाऊ व गोविंदरावजी यांच्याशी वणी येथे भेट (१४६१३); चिटको विश्वनाथ याजकडे वहिवाटीस असलेल्या गावांच्या भरण्याबद्दल खुलासा (१४६१६) (अपूर्ण); पेंढाऱ्यांचा जळगाव, पाटोदे, निफाड, सायखेडे वगैरे गावी उपद्रव व राजापुरास मुक्काम असल्याची बातमी (१४६२१); दाजीबाजवळ दिलेल्या वरातांबद्दल विनंती (१४६२२); मोरो गोपाळ

**पत्रे—चालू :**

शास्त्री याच्या इनामाबद्दल खुलासा (१४६२३); पहिली घोडी निरूपयोगी झाल्यामुळे बदलून देण्याची विनंती (१४६२४); जेजुरी येथील ब्राह्मणभोजन समारंभानंतर वडूथला जाण्याचा बेत (१४६३१); खानदेशांत लग्न करण्याच्या आज्ञेबद्दल व मोरोपंत केळे व इतरांच्या विंचुराहून करावयाच्या रवानगीबद्दल खुलासा (१४६४०); विंचुराहून उरपाड येथे आगमन, जमाबंदीच्या कामाबद्दल निवेदन, इंग्रज व गायकवाड यांजकडील सरंजाम सोनगड येथे रवाना, पेंढाऱ्यांपासून महालाचे रक्षण करण्यासाठी शिबंदीचा बंदोबस्त (१४६४३–१४६४४); पुणे पट्टीपैकी खर्चास घेतलेला वरातेचा ऐवज पुणे पर्यंत खर्च लिहिणे व माजी सुभेदार खंडेराव लक्ष्मण यास महालावर रोख ऐवज देण्याबद्दल मामलेदारास करावयाची सूचना (१४६४७); बाळाजीपंतदादा याजकडील कमाविशीबद्दल विनंती (१४६५५); गडावरील सनदी लोकांची चाकरी घेण्याची आज्ञा नसल्यामुळ सनदेच्या वसुलीबद्दल विचारणा (१४६५६); बाळाजीपंत भागवत याच्या बेळगावहून आलेल्या मालावरील जकातीसाठी कोरेगांवच्या जकातदाराने ठेवलेल्या तारणाच्या मोकळिकेबद्दल विनंती (१४६६४); पांडवगड येथील तोफेची तयारी ठेवण्याची विनंती (१४६६५); पांडुरंगपंत आबा यास लिहावयाच्या मजकुराबद्दल खुलासा (१४६६६); तासगांवमधील इनामतीचा वसूल न घेण्याबद्दल तासगांवकर कमाविसदाराच्या नावे कऱ्हाडहून लिहून आणावयाचे पत्र (१४६७७); बाजूबाई हिच्या व चिटणीसांकडील लग्नाच्या मुहूर्ताबद्दल विनंती (१४६७९–१४६८०).

**रुमाल क्र.२८ पुडके क्र. ३, का सं ९४ (१४६८४–१४७७७)**

**सु. स. १२०९–१२१७, इ. स. १८०८–१८१६**

**पत्रे :**

[पुढील सर्व पत्रे **चिंतोपंत रावजी देशमुख** यांना लिहिलेली असल्यामुळे फक्त प्रेषकांचा नामनिर्देश केला आहे.]

**अंदोजी मानाजी ठाकूर** : मौजे कडवाई, ता. संगमेश्वर येथील लोकांस कौल देऊन लावणी उगवणी वगैरेकरिता सरकारी वसूल योग्य प्रकारे देण्याबाबत, २७ सफर, सु. १२१६/२८ जाने. १८१६ (१४७०९).

**आबाजी रघनाथ खाडिलकर** : किल्ले जयगड येथील जकीरा व ठाणे करारप्रमाणे परत देण्यासंबंधी गोपाळ राम खंडकर यास जिम्मेदार, श्रावण व. १४, शके १७३१/८ सप्टें. १८०९ (१४६८५).

**आबाजी बल्लाळ, गोविंद कृष्ण** : तिळगुळ रवाना, २३ जिल्हेज, सु. १२१०/२९ जाने. १८१० (१४६९२); १४ मोहरम, सु. १२१२/२९ जाने. १८१२ (१४७००).

**चिंतो विश्वनाथ काळे** : मौजे गोठणे येथे कमाविशीस नवीन नेमलेल्या विठ्ठल महादेव गोखले यास ऐवजाबाबत आपण जिम्मेदार असल्याबाबत, माघ शु. १, शके १७३५/२२ जाने. १८१४ (१४७०२).

**नारायण विश्वनाथ जोगदंडे** : केशवराव बापूजी केळकर यास हाजीर जामीन, आश्विन शु. ९, शके १७३६/२२ ऑक्टो. १८१४ (१४७०५).

**नारो गोविंद** : फोंड सावंत भोसले यांच्या चौकशीच्या मिशाने स्वारांनिशी आलेल्या मानसिंगराव पाटणकर याने राजापूर येथे घातलेल्या धुमाकुळीचे बंदोबस्ताकरिता स्वारांची मागणी, २५ मोहरम, सु १२१०/२ मार्च १८१० (१४६८४).

**पत्रे—चालू :**

**नारो बल्लाळ रानडे** : मौजे केवले, ता संगमनेर येथील गला ऐवज बाळाजीपंत जोशी याजबरोबर पाठवित असल्याबाबत, १ जिल्हेज, सु. १२१०/७ जानेवारी १८१० (१४६८६); खाजगत कोठीकडील जुना गला किल्ले निहाय खर्च करून नवीन गला तसाच ठेवण्यासंबंधी सूचना, २७ मोहरम, सु. १२१०/४ मार्च १८१० (१४६८७); मोरोपंत तात्या भावे यांना त्यांच्या मौजे पुसाले येथील इनाम जमिनीचा वसूल व अनंतभट भावे यांना धर्मादाय दोन खंडी भात कां दिले नाही त्याचा खुलासा, २४ र. खर, सु. १२०९/११ जून १८०८ (१४६९३); कामकाजाविषयी मार्गदर्शन करण्याची विनंती, १९ ज. वल, सु. १२१०/३ जुलै १८०९ (१४६९४); गोविंद विश्वनाथ उकिडवे व गोविंद हरि बर्वे यांच्या वाडा मुरुग का नेवरे येथील जमीन भांडणात बर्वे याजवर गुन्हेगारीची वरात काढण्यातील अडचणी, २४ र. खर, सु. १२१०/८ जून १८०९ (१४६९५); सोनकोराव सुर्वे यास संगमेश्वर येथील सखो भिकाजी फडके याने कां अडकवून ठेविले आहे त्याची चौकशी करीत असल्याबाबत, २४ र. खर, सु. १२१०/८ जून १८०९ (१४६९६); तालुके रत्नागिरी येथील जकात ऐवज देण्याबाबत गोपाळपंत खंडकर यांची मगरूरीची उत्तरे, तट जंजिरे येथे करावयाची दुरूस्ती व बेगमी संबंधीचा तपशील व ऐवजाची मागणी, १० जिल्हेज-सु. १२१०/१६ जाने. १८१० (१४६९७); तिळगुळ रवाना, २५ सफर, सु. १२१७/१४ जाने. १८१७ (१४७१५); तालुके रत्नागिरी येथील रसद ऐवजाकरिता हुंड्या, ऐवजाची हप्त्या, हप्त्याने फेड, प्रचितगड येथील पट्टी ऐवज वसुली, गुहागर येथे नेमून दिलेल्या आसामींच्या रोजमुऱ्याची व्यवस्था वगैरे, २५ मोहरम, सु. १२१७/१५ डिसें. १८१६ (१४७१६).

**फत्तेसिंह भोसले** : तिळगुळ रवाना, २५ मोहरम, पौष, शके १७३६/३१ डिसें. १८१४ (१४७०६).

**बाळाजी काशी** : बाराशे रुपयांचा दर रुपयांस टक्के (४४६) प्रा खुर्दा करून देण्याची बोली, जेष्ठ शु. १, शके १७३५/३० मे १८१३ (१४७०१).

**बाळाजी राम** : तिळगुळ रवाना, १७ जिल्हेज, सु. १२११/१३ जाने. १८११ (१४६९१).

**बाबुराव आंग्रे** : मकर संक्रमणाच्या तिळगुळाची पोच, २२ मोहरम, सु. १२११/१७ फेब्रु. १८११ (१४६८९); २६ जिल्हेज, सु. १२१०/१ फब्रु. १८१० (१४६९८).

**भिकाजी प्रयाग निकम** : विठ्ठल महादेव याच्याशी वतनासंबंधीचे खटल्यात आवश्यक तेव्हा माझी बाजू मांडत असल्याबाबत, जेष्ठ व. १३, शके १७३८/२३ जून १८१६ (१४७१९).

**मल्हारराव भिकाजी** : तिळगुळ रवाना, २६ जिल्हेज, सु. १२११/२२ जाने. १८११ (१४६९०).

**मोरो बाबुराव गोखले** : पो साकसे येथील मामलतीवर असलेल्या श्रीधर सदाशिव कोल्हटकर यास जिम्मेदार असल्याबाबत, श्रावण शु. १०, शके १७३६/२६ जुलै १८१४ (१४७०७).

**सदाशिव महादेव** : तिळगुळ रवाना, ५ मोहरम, सु. १२११/३१ जाने. १८११ (१४६८८).

**श्रीनिवास व्यंकाजी बावा** : तिळगुळाची रवानगी, १७ मोहरम, सु. १२१२/१ फेब्रु. १८१२ (१४६९९).

पत्रे–चालू :

[पुढील सर्व पत्रे चिंतोपंत रावजी देशमुख यांनी लिहिलेली असल्यामुळे केवळ प्रापकाचे नाव लिहिले आहे.

**चिंतोपंत रावजी देशमुख—अंताजीपंत कोल्हटकर :** मुदकवी येथील मामलतीचे काम गणेश नारायण साने याजकडे सोपविल्याबाबत, आश्विन शु. १५, सु. १२१६/१८ ऑक्टो. १८१५ (१४७७१) ;

**— आबाजीपंत *:** पा । साकसे येथील मामलतीच्या वीस हजार रुपयांचा तपशील व त्याची पोच पावती, १९ जिलकाद सु. १२१२/६ डिसें. १८११ **(१४७३३)** ; **— आबाजी आत्माराम :** मौजे दिवे पा । साकसे येथे कोठी बांधावयाकरितां ऐवज पाठवित असल्याबाबत, वैशाख शु. ६, सु. १२१६/३ मे १८१६ **(१४७६२)** ; **— गणेश देसाई :** मानाजी आंग्रे याजकडून सरकारांत आलेल्या गांवच्या कमाविशीची तुम्ही वहिवाट करीत असलेल्या गावच्या ऐवजाची पोंच, चैत्र शु. ५, सु. १२१६/३ एप्रिल १८१६ **(१४७६७)** ; **— गणेशपंत साने :** मुदकवी येथील किल्याचे तटबंदीचे बुरुज दुरुस्तीकरितां ऐवज रवाना, मार्गशीर्ष शु. २, सु. १२१६/२ डिसें. १८१५ (१४७६३) ; **— गिरमाजीपंत दाजी ठोंबरे :** किल्ले मुदकवी येथील तटबंदीचे काम काळजीपूर्वक करण्याबाबत, चैत्र शु. ६, सु. १२१६/४ एप्रिल १८१६ **(१४७६६)** व त्याकरिता लागणाऱ्या ऐवजाची व्यवस्था, मार्गशीर्ष शु. २, सु. १२१६/२ डिसें. १८१५ **(१४७७२)** ;

**— गोपाळपंत खंडकर :** रायगडकरी, महाडकरी व लिंगाणकरी वगैरे लोकांची तालुके रत्नागिरीकडे नेमणूक केली असल्यामुळे त्यांचा रोजमुरा बेहड्याबरहुकूम देत जाण्याबाबत, २७ जिलकाद, सु. १२१०/४ जाने. १८१० **(१४७२६)** ; तालुके रत्नागिरी येथील फडणिसीचे काम दिनकर सदाशिव याजकडून घेण्याबाबत, २० रमजान, सु. १२११/१० ऑक्टो. १८१० **(१४७३२)** ; किल्ले पारसीक प्रांत बेलापूर येथील बंदराचे गलबताचा झाडा घेऊन वानगी सरकारात भरावयाच्या शिरस्त्याचा मक्ता, २९ र. खर सु. १२१४/२१ एप्रिल १८१४ **(१४७५६)** ; **— कृष्णाजी बाजी मराठे :** माडे ता। खारेपाटण या आमचेकडील बद्दल मुशाहिरा म्हणून असलेल्या गांवाची वहिवाट तुमचेकडून दूर करून सदाशिव काका देशमुख याजकडे दिली असल्याबाबत, १० रमजान, सु. १२०९/३१ ऑक्टो. १८०८ (१४७२४) ;

**— कृष्णाजी भिडे :** विसाजी महादेव याचे नांवे करून दिलेल्या सरकारी कुरणाची कमाविस तुमचेकडे असून बाजी आप्पाजी भिडे याचे गुजारतीने भरणा झालेल्या रसद ऐवजाचा तपशील, २७ सफर, सु. १२१५/८ फेब्रु. १८१५ (१४७५७) ; २० साबान, सु. १२१६/२८ जुलै १८१५ (१४७५८) ; १७ रजब, सु. १२१६/२६ जून १८१५ (१४७५९) ; **— दादोपंत बेडेकर :** मुदकवी येथील किल्याचे कामाकरितां गिरमाजी याजकडून दोन हजार रुपये यशवंत खंडेराव कारकून याजबरोबर देऊन पावती घेणे, चैत्र शु. ६, सु. १२१६/४ मार्च १८१६ (१४७६५).

**— नारोपंत तात्या रानडे :** रत्नागिरी येथील महालानिहाय रसद ऐवजाबाबत प्रापकातर्फे असलेल्या आप्पाजी बाबाजी आठवले याजवर केलेल्या हुंडीचा ऐवज देण्याबाबत, २ मोहरम, सु. १२०९/१७ फेब्रु. १८०९ **(१४७२५)** ; मौजे कोतवडे कर्यात नेवरे तालुका रत्नागिरी येथे धरण बांधण्यासंबंधी धामणेकर व सहस्त्रबुद्धे यांच्यामध्ये चाललेल्या खटल्यासंबंधी, फाल्गुन शु. २, सु. १२१६/१ मार्च १८१६ **(१४७६८)**.

**— बच्याजीपंत कोंडोपंत :** पीरबावा बदरदीन याजकडे खैरात खर्चास इनाम दिलेल्या रोडे ता। पेण, पा। साकसे या गांवास उपद्रव न देण्याची ताकीद, १२ ज. वल, सु. १२१२/२४ मे १८१२ **[१४७३७)**.

पत्रे–चालू :

**— बाळाजीपंत जोशी :** रत्नागिरी येथील वहिवाटीचा ऐवज प्रेषकाकडील पावस येथील नवीन घराचे खर्चासाठी गणेशभट फडके व सदाशिव बाबुराव मराठे याजकडे देण्याबाबत, १२ सफर, सु. १२१७/१ जाने. १८१७ (१४७७७).

**— यशवंत खंडेराव :** किल्ले मुदकवी येथील तटबंदीचे काम योग्य देखरेख करून मजबूत करून घेण्याबाबत सूचना, २१ जिलकाद, सु. १२१७/१३ ऑक्टो. १८१६ (१४७७३).

**— राघोपंत वांडेकर :** श्रावणमास उत्सवानिमित्त तांदूळ खरेदीकरितां ऐवज पाठविला असल्याबाबत, ४ सफर, सु. १२१३/६ फेब्रु. १८१३ (१४७२३).

**— रामराव भाऊ :** मुदकवी किल्याचे डागडुगीकरितां केलेली ऐवज व्यवस्था, फाल्गुन व. १४, सु. १२१६/२७ मार्च १८१६ (१४७१७).

**— वासुदेव जोशी :** ता। रत्नागिरी येथील सरकारतर्फे आमचेकडे असलेली मामलत नारो बल्लाळ रानडे याजकडे सुपुर्द केल्याबाबत, १७ जिलकाद, सु. १२१७/९ ऑक्टो. १८१६ (१४७७४) ; ता। रत्नागिरी येथील मामलत नारो बल्लाळ रानडे याजकडून दूर केली असल्याबाबत, २६ सवाल, सु. १२१७/१९ सप्टें. १८१६ (१४७७६).

**— विठ्ठलपंत गोखले :** मौजे गोटणे, ता। राजापूर येथील कमाविशीची आसामी असलेल्या निलो त्रिंबक आपटे याजकडून कुळबावे लोकांचे वेतनाचा एवज न घेण्याची सूचना, आश्विन व. ५, सु. १२१६/२३ ऑक्टो. १८१५ (१४७६४).

**— विनायकराव* :** वाई येथून तांदूळ पाठवून देण्याबाबत, **(१४७२७)** ; अन्याबा राहतेकर याजकडून सरकारी रोजमुऱ्याचा येणाऱ्या दहा हजाराच्या ऐवजाची विल्हेवाट कशी लावावी त्याचा तपशील, जेष्ठ शु. २, सु. १२११/२४ मे १८११ (१४७२८) ; ता। रत्नागिरी, पो। साकसे व प्रा। पुणे येथील रसद वसुलाकरितां काढलेल्या वराताचा भरणा त्रिंबकजी डेंगळे याजकडे देणे, जेष्ठ शु. २, सु. १२११/२४ मे १८११ (१४७२९) ; कोरीगडाकडील जकात ऐवज कोरपे यांचे मार्फतीने सखाराम मनहर याजकडून करून घेण्याबाबत, ७ ज. वल, सु. १२११/३० मे १८११ **(१४७३०)** ; सरकारी कुरणाची कमाविस आबाजीपंत याजकडे सोपविली असल्याबाबत, ७ ज. वल, सु. १२११/३० मे १८११ **(१४७३१)** ; लमाण आणण्याकरितां नाशकास जाणाऱ्या चिटकोपंत लिमये यांचे ऐवजाची तरतूद, इ. स. १८०८-१८१६ **(१४७३४)** ; धर्मशेट यास तोफखान्याकडील जिन्नस खरेदीकरितां द्यावयाचा ऐवज त्याजकडून यावयाच्या कर्जात वळता करण्याबाबत, इ. स. १८०८-१८१६ (१४७३५) ; सईदार अंगरखा शिवून देण्यासंबंधी सूचना, इ. स. १८०८-१८१६ **(१४७३६)** ; खैरात खर्चास इनाम दिलेल्या मौजे रोडे या गांवास उपद्रव देणाऱ्या बच्याजीपंत व कोंडोपंत यास ताकीदपत्र नेऊन देणाऱ्या शिपायाचा मसाला व वसूल झालेला ऐवज घेण्याबाबत, १२ ज. वल, सु. १२१२/२४ मे १८१२ **(१४७३८)** ; रत्नागिरी, पुणे, वंदन व चंदन येथील रसद भरणा करण्यासंबंधी सूचना, वैशाख शु. ४, सु. १२१२/१४ मे १८१२ **(१४७३९)** ; घरगुती वस्तुंची खरेदी, किल्ले लोहगड येथील खेरीज मुशाहिरा ऐवजाची तरतूद वगैरेबाबत तपशील, इ. स. १८०८-१८१६ (१४७४०) ; ता। हिरडस मावळ येथील सरदेशमुखी व इनाम हक्काबाबत अमरसिंग याचे व भाववंदाचा खटला चालू असल्यामुळे अंमल ऐवज रुपराम चौधरी याजकडे देणे व अमरसिंग यांचा बंदोबस्त करण्याबाबत, १२ जिलहेज, सु. १२१२/२९ डिसें. १८११ **(१४७४१)** ; पा। साकसे व किल्ले राजमाची येथील भात, वसूल करून कोठीत व्यवस्थित ठेवण्यासंबंधी सूचना, ४ जिल्हेज,

**पत्रे—चालू :**

सु. १२१२/२१ डिसें. १८११ (१४७४२) ; श्रीमंतांचा (बाजीराव रघुनाथ) मुक्काम साखरपा येथून विजयदुर्ग येथे, इ. स. १८०८-१८१६ (१४७४३) ; हुंडेकरी यांचे हिशेबावर मखलाशी करून पाठविण्याबाबत आज्ञा पण रुजवात होत नसल्यामुळे उशीर, हुंडेकरी याजकडून कांही वसूल घेण्याची सूचना, १५ जिल्हेज, सु. १२१२/१ जाने. १८१२ (१४७४४-१४७४६) ; सौभाग्यवतीस माहेरी पाठविण्यास मुहूर्त पहाण्याबाबत, १ जिल्हेज, सु. १२१२/१८ डिसे. १८११ (१४७४७) ; वाई येथे शालजोडी, उशी, गाशा वगैरे पाठवून देण्याबाबत, १२ डिसें. १८११ (१४७४८) ; श्रीमंतांचा गणपती पुळ्याहून निरोप घेऊन पावस येथे सुखरूप परत, इ. स. १८०.८-१८१६ (१४७४९) ; कोकणात जाणाऱ्या सौभाग्यवतीबरोबर प्यादे पाठविले त्यांचे खर्चाची तरतूद व इतर बंदोबस्ताची सूचना, इ. स. १८०८-१८१६ (१४७५१) ; पेण, पनवेल येथे मठ भरावयास लमाण चरण वगैरे लोक पाठविण्यासंबंधी, इ. स. १८०८-१८१८ (१४७५२) ; ता रत्नागिरी येथील इमारतीची लाकडे तोडण्याकरितां नारोपंत रानडे व गोपाळपंत देशमुख यास पत्र लिहिण्याच्या सूचना, ५ रजब, सु. १२१३/१५ जुलै १८१२ (१४७५३) ; त्रिंबकजी डेंगळे याच्यामार्फत आलेल्या ऐवजाचा जमाखर्च करण्याबाबत, ५ रजब, सु. १२१३/१५ जुलै १८१२ (१४७५४) ; खाजगत खर्चाकरिता त्र्यंबक भिडे याजकडून काढलेल्या वरातीचा वसूल करण्याची आज्ञा (१४७६९) ; लांज्याच्या खाडीतून आबाजीपंत याच्यातर्फे खरेदी केलेले भात खुरशेजी शेट मोदी याची जकात माफीची दस्तके दाखवून रत्नागिरीस रवाना, इ. स. १८०८-१८१६ (१४७७०) ; — **विसाजीपंत दाजी आपटे** : मौजे वाहागांव प्रांत कऱ्हाड येथील वसूल झालेल्या ऐवजाचा तपशील, २० र. वल, सु. १२१६/१९ फेब्रु. १८१६ (१७४६०) ; — **संभाजी देशमुख** : राघो बाबूराव वगैरे पांच जणांनी ता पावस येथील जमीन आम्हांस खुष खरेदीने दिली त्याची चतुःसिमा मोजणी वगैरे करण्याबाबत, आषाढ व. २, सु. १२१७/११ जुलै १८१६ (१४७७५) ; — **हरि कृष्ण कुलकर्णी** : गुण्या धावनाक महार हा वतनदार म्हणून सिद्ध करण्याकरितां कागदपत्रासहित पुण्यास हजर रहाण्याची आज्ञा, सु. १२१४/इ. स. १८१३-१८१४ (१४७५५).

**पत्रे :**

**कृष्णाजी अनंत देशमुख— आबा विनायक देशमुख :** श्रीमंतांची स्वारी आंबेघाट, लांजे माग राजापुरास मुक्काम करणार असल्याबाबत, इ. स. १८०८-१८१६ (१४७५०).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली]

**चितो वामन सिधये— (—) :** कर्यात पावस ता रत्नागिरी येथील देवाचे सोन्याचे मुखवटे करण्याकरितां आप्पाजी रामचंद्र याजतर्फे दिलेल्या ऐवजाची पोंच, पौष शु. ५, सु. १२१६/४ जाने. १८१६ (१४७१२), (१४७६१).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]

(—) — **चितो वामन देशमुख** : जकात प्रांत पुणे व जुन्नर येथील रसद ऐवज त्रिंबकजी डेंगळे याचे गुजारतीने भरण्याची आज्ञा, २७ रमजान, सु. १२१५/१२ सप्टें. १८१४ (१४७०३) ; २७ रजब, सु. १२१५/१६ जुलै १८१४ (१४७०४) ; २७ साबान, सु. १२१५/१४ ऑगस्ट १८१४ (१४७०८) ; हुबरे, बाहुली, सेदरे वगैरे फुटगांवाचा रसद भरणा दिनकर सदाशिव याचे मार्फतीने करण्याबाबत, ५ र. खर, सु. १२१६/५ मार्च १८१६ (१४७१०) ; मौजे कोरिवले, खराले वगैरे गावांचा रसद भरणा आप्पाजी रामचंद्र आगाशे याचे गुजारतीने करण्याबाबत, २ सफर, सु. १२१६/३ जाने. १८१६ (१४७११) ; (१४७१४) ; (१४७१८) ; पोा चाळीसगांव प्रांत खानदेश येथील खाजगीकडे असलेल्या रसद ऐवजाची वसुली आप्पाजी रामचंद्र आगाशे याचेमार्फत करण्याबाबत, ११ मोहरम, सु. १२१६/१३ डिसें. १८१६ (१४७१३) ; — **कारकून दादा चितो वामन देशमुख** : चितो वामन देशमुख याचे मृत्यूमुळे पोा जैतापूर वगैरे महालांचा ऐवज सरकारात घेण्याबाबत २९ र. खर, सु. १२१७/१८ मार्च १८१७ (१४७२०-१४७२१) ; कातज येथील गाळ काढावयाकरिता येणाऱ्या खर्चाची तरतूद, ४ ज. खर, सु. १२१७/२२ एप्रिल १८१७ (१४७२२).

**रुमाल क्र. २८ पुडके क्र. ४, का. सं. १२३ (१४७७८--१४९००)**
**सु. स. ११७१-१२३१, इ. स. १७७०-१८३०**

**आज्ञापत्र :**

**पंतप्रधान** (बाजीराव रघुनाथ) — **मोकदम, कोल्हार** : कोल्हार येथील देशमुखीचे वतन धोंडो गोविंद याजकडे दिल्याबद्दल, २० सवाल, सु. १२०५/२२ जाने. १८०५ (१४८०५) ; —**मोकदम, पिंपलवडी** : पिंपलवडी येथील कमाविशी चिमणाजी नारायण याजकडून दूर करून चितो वामन याचे स्वाधीन, २५ सफर, सु. १२१५/६ फेब्रु. १८१५ (१४८०६) ; — **मोकदम, खरोसी** : खरोसी येथील कमाविशी विसाजी महादेव याजकडे दिली, २ र. वल, सु. १२१५/१२ फेब्रु. १८१५ (१४८०७).

**परशराम पंडित प्रतिनिधी—मोकदम, मसूर** : लक्ष्मण बाबुराव फणसळकर यास मसूर येथील सरकार बागेपैकी पाटस्थल जमीन इनाम, १७ साबान, सु. १२०६/१० नोव्हें. १८०५ (१४८०८).

**कतबा :**

[चितोपंत रावजी देशमुख यांना दिलेला]

**गोविंदा तेली** — कुसाजी नाईक याचा झोळणा व भांडी आपल्याकडे नसल्याबाबत, श. १७३५/इ. स. १८१३-१४ (१४७८६).

**भगवंतराव बापूजी शेटे**— दिवाळीत केलेल्या कामावर सराफ, मारवाडी वगैरेकडून मिळालेल्या मजुरीच्या ऐवजाबाबत, वैशाख शु. १, सु. १२१६/२८ एप्रिल १८१६ (१४७९१).

**भिकाजी प्रयाग निकम** — उल्त, गुमास्तगीर व कमाविशीचे पैशाबाबत विठ्ठल महादेव याच्याशी असलेल्या तंटचासंबंधात, मार्ग. शु. २, श. १७३८/२१ नोव्हें. १८१६ (१४७९२–१४७९३).

**हिरापुरी गोसावी** — शिवपुरी येथील जोरावरपुरी गोसावी याची कापड वगैरे ठेव आपल्याजवळ नसल्याबद्दल, १९ रमजान, सु. १२१४/१५ सप्टें. १८१३ (१४७८५).

**हिरोजी काळे** — बंदर पेण येथील मिठाची आमदानी चारण व लमाण यांच्याकडून चांगली करू म्हणून, भाद्रपद शु. ७, श. १७३३/२६ ऑगस्ट १८११ (१४७८०).

**पत्रे :**

[बाबासाहेबांस आलेली पत्रे]

**अन्याबा**— : गणपतराव दाभोळकर याजकडील येणे असलेल्या ऐवजाबाबत, अंताजी शेटे याचे महालाकडे असलेले येणे जमीनदारास व गावास ताकीद करून वसूल करण्यासंबंधी वगैरे कलमे (१४८१८) ; महिपत मल्हार याच्या नेमणुकीचा मामलेदार घेत असलेला ऐवज

पत्रे—चालू :

[बाबासाहेब यांस आलेली पत्रे]

सरकारात घ्यावा म्हणून, मागील वर्षाचे जमाखर्चाबद्दल (१४८१९) ; दरकदारीचे हिशेबाकरिता कोणी येत नसल्याची तक्रार (१४८२१) ; आज्ञेप्रमाणे मोरोपंत बाबा यांचे पुण्यास गमन व दरकदार बक्षी वगैरेंना घेऊन येत असल्याबाबत (१४८२९-१४८३०).

**कृष्णाजी गोविंद चोळकर** — बाणपुराहून यजमानांनी पाठविलेला तिळगूळ व पत्रे रवाना (१४८३७).

**कादर भालदार** — चांगले मेवाती लोक पाठविण्याबाबत (१४८२३).

**गणपतराव महादेव भागवत** — सप्तशृंगीस महाशिवरात्रीचे दिवशी मूर्तीतून निघालेल्या ज्वाला व रविवार पेठेतील वाड्याचे कामाबाबत निवेदन (१४८४१).

**तात्या** *— बाई व जिनीस पाठविलेले पत्र व तिळगूळ वडिलांना पाठविल्याबद्दल (१४८२८).

**त्रिंबकराव** — भगवंतराव भाऊ यांच्या ऐवजाबद्दल अन्याबाने दिलेला हवाला व भाऊ यास ऐवज सत्वर देण्याची आज्ञा (१४८३३).

**धोंडो विश्वनाथ जोशी** — काशीपंत बाबांनी पाठविलेला लखोटा सरकारात पाठविल्याबद्दल (१४८३४).

**नारी भैराळ नारायणगावकर** — काशिनाथ आप्पाजींनी पाहिलेल्या वतनदारीच्या कागदपत्राबाबत (१४८२७).

**परशराम त्रिंबक** — तिळगूळ व पत्राची पोहोच (१४८३२).

**पांडुरंग रामचंद्र** — पार्वतीबाईच्या यात्रेसाठी ऐवजाची मागणी (१४८१६).

**पांडुरंग रामचंद्र देवधर** — प्रकृतीसंबंधी स्वतः पत्र पाठविण्याची विनंती व यात्रेबद्दल निवेदन, लक्ष्मणपंत धारप बेलापूरकर याजकडील ऐवजाच्या वसुलीबाबत (१४८१४-१४८१५).

**बहिरी नारायण पिंगळे** : ग्रहणाकरितां स्वारी कोणीकडे जाणार हे कळविण्याची विनंती (१४८३८).

**बाळकृष्ण दांडेकर**—सखंभटजी यास चंदनाची खोडें दिल्याबद्दल, सोवनी यांनी नेलेल्या देवपूजेच्या भांड्याच्या यादीची नक्कल रवाना (१४८११).

**बाळाराम मळुकचंद आगरवाल** — बंदोबस्तासाठी (कशाचा बंदोबस्त त्याचा उल्लेख नाही) नानाजी उद्धव याची रवानगी (१४८१३).

**मंडाजी हवालदार** — महाराजा याजजवळ राहून करीत असलेल्या चाकरीबद्दल व पठाणास दिलेल्या बक्षिसांसंबंधी निवेदन (१४८२४).

**माधवराव जगताप** — पदरी असलेल्या आनंदराव जगन्नाथ याचा सांभाळ करण्याची विनंती (१४८१७).

**महादेव**. *— धोडयाच्या खर्चाबाबत विचारणा (१४८२२).

**महादजी खंडेराव** —यजमानाच्या पत्राचे उत्तर पाठविण्याची विनंती (१४८२३५).

**मोरो खंडेराव** — महालाच्या लावणीच्या बंदोबस्ताबाबत (१४८३१).

**मोरो गोपाळ** — लग्नतिथी निश्चियाबद्दल विचारणा (१४८२५); तिथी निश्चय झाल्यावर आपल्याकडे यावयाचे झाल्यास उंटस्वार, गाडदी वगैरे पाठविण्याची विनंती (१४८४०).

पत्रे—चालू :

**विठ्ठल केशव** — रामचंद्रपंत भाऊ यांनी सांगितल्याप्रमाणे लष्करात घोड्यांची रवानगी (१४८३६).

**सखाराम कृष्ण** — इंदापूर येथील ऐवज पाठविण्याची विनंती (१४८१०).

**सखाराम जगजीवन** — पेंढाऱ्यांच्या पाठलागाबाबत विचार विनिमय (१४८२६).

**संभाप्पा शेट** — खाजगी मजकूर (१४८२०).

**हवालदार**— अरबांच्या तंट्यामुळे येणे झाले नाही (१४८१२).

[चिंतोपंत रावजी देशमुख यांना आलेली पत्रे]

**काशीबाई.** : भिकाजीपंत यांचेकडील भांडी व धोतर मिळाल्याबद्दल, वैशाख शु. १, श. १७३६/२१ एप्रिल १८१४ (१४७८८).

**काशी मोरेश्वर भणगे** — पेठ हणमंत येथील दुकानातील सोनी याजकडील ऐवजाची बाकी देण्याचे आश्वासन, मार्ग. व. १, श. १७३५/८ डिसेंबर १८१३ (१४७८२).

**केशव कृष्ण टिळक** — घर बेगमीसाठी अंजनवेल येथून पावस येथे नेलेल्या गल्यावर जकात माफ असताही घेतलेली जकात परत देण्याबाबत (१४७९८).

**गंगाजी नाईक** — गोविंदराव भागवत यांनी कर्डे येथे खरेदी केलेला घोडा नागपूर येथे सरकारात रवाना करताना घेतलेली जकात परत मिळाल्याबद्दल, भाद्रपद शु. १, सु. १२१४/ २७ ऑगस्ट १८१३ (१४७९०).

**गोपाळ** * — दाजीबा याच्या मृत्यूसंबंधी निवेदन, ९ साबान, श. १७३८/५ जुलै १८१६ (१४७९४).

**गोपाळ अनंत दळवी** — तलवडे येथील शेतास अर्धलीने लावलेल्या कुळास तगाईबद्दल द्यावयाच्या ऐवजाची मागणी माघ व. ७, श. १७३६/२ मार्च १८१५ (१४७८९).

**गोविंदराव कृष्ण आपटे** — रामचंद्रपंत यांच्याकडून मिळालेल्या नेमणुकेबाबत निवेदन, २७ रमजान, सु. १२०६/१९ डिसें. १८०५ (१४७७८) (अपूर्ण).

**त्रिंबकराव नारायण भिडे** — गांव कमाविशीने देऊ नये म्हणून (१४८०४).

**नारायण जोशी पंडित** — पेण येथील पेंढाऱ्यांच्या उपद्रवाचा बंदोबस्त करण्याची विनंती, पौष शु. १०, सु. १२१७/ २९ डिसें. १८१६ (१४७९६).

**नारो रामचंद्र** — छत्रपती स्वामीस पत्रे व आंबे रवाना (१४८००).

**निराजी व्यंकोजी देशपांडे** — निराजी नरसिंह कुलकर्णी यांचे वृत्तीचा बंदोबस्त करण्याची विनंती (१४८०२).

**मोरो हरि नेवासकर** — ढापऱ्या याजकडे दिलेल्या पुणे, जुन्नर जकात मामलतीचे हवाल्याच्या ऐवजाच्या फडशाबाबत, माघ शु. १०, श. १७३४/१० फेब्रु. १८१३ (१४७८१).

**रघुनाथ बाबुराव कोल्हाटकर** — ब्राह्मणांना विनंती केलेल्या प्रकरणाची यादी रवाना, पौ. ८ सफर, सु. १२१७/२८ डिसें. १८१६ (१४७९५).

**राघोबा**. * — गावखडी येथील वसूल केलेला ऐवज माघारा घेऊन सनवातबाकीचा फडशा करणे, कार्तिक शु. १, श. १७३५/ २५ ऑक्टो. १८१३ (१४७८३).

**राणू बनसाराम मेंदेवाले** — सरकारी वाड्यांत ब्राह्मण भोजनासाठी वस्तूंच्या रवानगीबाबत (१४८०३).

पत्रे—चालू :

**रायजी जाधवराव—मल्हार रेणुराव** याजकडून आलेला रोखा, रोखा घेऊन आलेल्या शिपायांच्या दंग्याबाबत (१४८०१).

**देव—पेठ फलटणी—चिंतोपंत दादा देशमुख** : कल्याण, भिवंडी व पेण पनवेल येथे येऊन व्यापार करण्याबद्दल उदमी लोकांना अभय, फाल्गुन व. १२, श. १७३२/२१ मार्च १८११ (१४७७९).

**मल्हारराव होळकर—चिंतो वामन देशमुख** : तिळगूळ रवाना, पाो. १९ र. वल, सु. १२१७/६ जाने. १८१७ (१४७९७).

**लिंगाप्पा बिडवे—चिंतोपंत बाबा** : बंदरापासून जी माल वाहतूक होईल त्यावर हुंडा (कर) घेण्याचा बंदोबस्त करून द्यावा म्हणून (१४७९९).

**वाराबाई *—बाबा व रावजी.*** : तिळगूळ रवाना (१४८३९).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]

तोफखान्याकडील मयत झालेल्या भवानी शंकर यास बक्षीस द्यावयाच्या कड्याचा तपशील (१४८४८) ; नमाजाच्या वेळांचा तपशील (१४८६६).

याद्या :—

कोर्टात पाठवावयाच्या शिपायांची (१४८०९) ; कापरेकडे येणे असलेल्या ऐवजाची (१४८४२) ; कामेरी येथील कुळांची (१४८४३) ; शेख बाळू जमादार याजकडील बडतर्फ केलेल्या लोकांची (१४८४४) ; लोकांना दिलेल्या किराणा मालाची (१४८४५ ते १४८४७) ; शंकरदास यास त्रिंबकेश्वरास जाण्यासाठी दिलेल्या सामानाची (१४८४९) ; राघोपंत दादा यांच्या विद्यमाने कामेरी येथील झालेल्या भरण्याची (१४८५१) गोखले यांच्या देणे ऐवजाबाबत परभारे घ्यावयाच्या ऐवजाच्या तपशीलाची (१४८५२) ; नाईकजी याजकडील जमिनीबाबतची (१४८५३) लोकांच्या नावाची (१४८५४) (अपूर्ण) ; लोकांच्याकडून गांववार येऊन रुजू झालेल्या ऐवजाची (१४८५५)) ; मोहिते याजकडील स्वार झाडयाची (१४८५६) ; हत्यारे मोडलेली आहेत किंवा हत्यारे नाहीत अशा लोकांची (१४८५७), बापूजी गुलावकर याने बापूजी शिंदे यास दिलेल्या कर्जाबाबतची (१४८५८) ; बंदूक आणण्याचा करार केलेल्या लोकांची, १२ जुलै १८३० (१४८५९) ; बारनिशीची (१४८६०) ; रिसाल्यातील घोड्यांची (१४८६१) ; शेख करीम याजकडील घोड्यांची (१४८६२) ; जवळे येथील कुलकर्ण्यांची (१४८६३) ; देवस्थानाकडील शिलकेच्या अजमासाची (१४८६४) ; सालवार लोकांच्या नावाची (१४८६५) ; कडगांवकर याजबरोबर दिलेल्या घोड्यांची व माणसांची (१४८६७) ; गवत आणावयाच्या गांवांची (१४८६८) ; वसुलीच्या लोकांची (१४८६९) ; देवघरातील वस्तुची (१४८७०) ; नवे शिपाई नेमावयाचे त्यासाठी पाठविलेल्या लोकांची नावनिशीवार (१४८७१) ; मिराखान मुतवली याजकडील बार झालेल्या कागपत्रांची (१४८७२) (अपूर्ण) ; देवीसिंग रिसालदार याजकडील नव्या आसामींची (१४८७३) ; निनाम येथील कारभारी लोकांची (१४८७४) ; दप्तरातील उमेदवारांची (१४८८०) ; लोकांची नांववार (१४८८१) खर्चाच्या तपशीलाची (१४८८२) तालीकडे एवज पावला त्याची (१४८८३) ; ऑगस्ट महिन्यातील पेट्यानिहाय आलेल्या वसुलाची (१४८८४) ; सोनगांव येथे फकिराच्या नापीक जमिनीत असलेल्या आंब्याच्या झाडापैकी फळे असलेल्या झाडाच्या लिलावाच्या तपशिलाची (१४८८५) ; ज्वारी इनाम जमिनीची (१४८८६) ; खर्चाची (१४८८७) ; पुण्याहून पाठविलेल्या सामानाची (१४८८८) ; गणेश विश्वनाथ याजकडे फौजेच्या खर्चास तसलमातीस दिलेल्या ऐवजाची (१४८८९) वस्तूंची (१४८९२) ; त्रिंबकजी याजकडील हप्त्यांची (१४८९३) घोड्यांची (१४८९४) ; मुसो दयोद याजकडील कप्तान वगैरे लोकांच्या जिनसांची (१४८९५ ते १४८९८) ; कोर्टात पाठविलेल्या इसमांची (१४८९९) ; स्वारी बरोबरच्या भांडी वगैरे सामानाची (१४९००).

वायदा रोखा :

**मोकदम—वाणेरे—चिंतोपंत रावजी देशमुख** : बाणेरे येथील मोकासबाबेच्या वसुलाबाबत, कार्तिक शु. १०, श. १७३०/२८ ऑक्टो. १८०८ (१४७८४) ९ जिल्हेज, सु. १२१५/२२ नोव्हेंबर १८१४ (१४७८७).

हिशेब :

गंगाधर रघुनाथ याजकडील हुजरातीचे जमेचा, सु. ११७७/इ. स. (१४८५०) ; खरेदी केलेल्य जिनसांचा ताळेबंद, सु. ११७१/इ. स. १७७०-७१ (१४८७५-१४८७८), माहे मे चा तेरीज खर्च (१४८७९) ; कमी जास्ती नेमणुकेकडील खर्चाचा (१४८९०-१४८९१).

## रुमाल क्र. २९ पुडके क्र. १–७

पुडके क्र. १ का. सं. ८५ (१४९०१–१४९८५)
सु. स. ११७५–१२२२ इ. स. १७७४–१८२१

कतबे :

**गुणा धावनाक महार—जिवाजीपंत*** : बाल्या संभनाक महार याजकडून वाडे येथील महारकीच्या तंट्याबद्दल शेख सला याच्या दरग्यात सत्य वदविल्यास द्यावयाच्या ऐवजासंबंधी, कार्तिक व. १०, श. १७३५/१७ नोव्हें. १८१३ (१४९०६).

**म्हसाजी पाटील अडसूळ—जुन्नरकर सुभेदार** : हिवरे कोर्डा येथील गायरानातील बेवारशी जमिनीच्या तंटयाची चौकशी न करतां स्वतःची जमीन महारास देऊन गुन्हेगारी घेतल्याचे सिद्ध करुन देण्याची कबुली, श्रावण शु. १४, श. १७३८/६ ऑगस्ट १८१६ (१४९६४).

पत्रे :

**आत्माराम लक्ष्मण—गोविंदराव उगले** : विष्णु अनंत यांच्या जमीन मोबदल्याबद्दल पूर्ववत कुरोलीकर कमाविसदाराकडे ऐवज देण्याबद्दल पुसेगांवकरी यांना ताकीद करण्याची विनंती, ९ जिल्हेज, सु. १२१८/२० ऑक्टो. १८१७ (१४९४९) (नक्कल).

पत्रे : चालू

**आदाप्पा बाळाप्पा कोर्पे हुडेंकरी—बाळकृष्ण आबाजी सुभेदार** पेण येथील मिठाच्या जकातीची बाकी दोन हप्त्यात देण्याची कबुली, फाल्गुन शु. २, श. १७३८/१८ फेब्रु. १८१७ (१४९५१).

**आनंदराव शिवराम—आबाजीपंत देशमुख** : विशाळगडाहून यावयाच्या ऐवजाच्या चिठीबद्दल खुलासा, ३ ज. वल, सु. १२१६/२ एप्रिल १८१६ (१४९३२).

**आबाजी सदाशिव देशमुख—बाबाजीपंत देसाई** : विनायकपंत वाघ याजकडून घेतलेल्या ऐवजाबद्दल लिंगो आको व कोंडो आबाजी यांच्या नांवची प्रापकावर हुंडी २७ ज. वल, सु. १२१६ २६ एप्रिल १८१६ (१४९२५).

पत्रे--चालू :

**शाकाजी व आलीशा खतीब :** वाई येथील नेमणुकेचा ऐवज मिळाला म्हणून, आश्विन शु. ४, श. १७३९/१४ ऑक्टो. १८१७ **(१६३६४).**

**आनंदराव गोमाजी--तात्यासाहेब*** : पेंढाऱ्यांनी किल्ले असेरचे पूर्व दिशेस हातगडाचे घाटाने उतरून जैनाबाद परगण्यांत केलेल्या लुटीबाबत निवेदन, मार्ग व. १, सु. १२१२/१ डिसें. १८११ **(१६२८४).**

**कृष्णाजी गोपाळ खरे--रावजीपंत दादा*** : पडलेली विहीर बांधण्याची विनंती, २१ ज. खर, सु. १२१७/९ मे १८१७ **(१६३१३).**

**कृष्णाजी माधव गर्दे--रावजी*** : सविस्तर वर्तमान कळविण्याची विनंती, वैशाख व. ५, सु. १२१७/५ मे १८१७ **(१६३१२).**

**कृष्णाजी विठ्ठल नलगुंद--व्यंकप्पा*** : गणेशपंत दादा याच्या हुंडीच्या बाकी ऐवजाचा तगादा, पौष व. ४, श. १७३५/१० जाने. १८१४ **(१६३१०).**

**केशव वासुदेव सोमण--सखोपंत गोडवोले** : मुकुंद सोडेकर याजबरोबर पोहे रवाना व त्याजबरोबर वेणुबाईस पाठविण्याची विनंती, मार्ग. शु. ३, सु. १२१७/२२ नोव्हें. १८१६ **(१६३२०).**

**कोंडभट थिटे--सुभेदार*** : वर्षासनाचा ऐवज मिळाल्याबद्दल, आषाढ व. ११, श. १७३९/१० जुलै १८१७ **(१६३४९).**

**[सुभेदार, वाई यास आलेली पत्रे]**

**गंगाधर भटजी व चिंतांबरभट शेंडे** : वाई येथील वर्षासनाच्या ऐवजाची पोंच आषाढ शु. १२, श. १७३९/२६ जून १८१७ **(१६३५१).**

**गणेश दीक्षित** : आजे-कृष्ण दीक्षित यांच्या वाई येथील वर्षासनाच्या ऐवजाची पोंच, फाल्गुन व. १०, श. १७३८/१२ मार्च १८१७ **(१६३५८).**

**रंगभट द्रवळीकर** : वाई सुभ्याकडील श्री. सदानंद स्वामीच्या वर्षासनाच्या ऐवजाची पोंच, आषाढ व. १२, श. १७३९/११ जुलै १८१७ **(१६३५६).**

**रामचंद्र शडागुले** : आजे-नारायणभट, शडागुले यांच्या वाई येथील वर्षासनाच्या ऐवजाची पोंच **(१६३६२).**

**व्यंकोबा गोसावी** : पसरणी येथील वर्षासनाचा ऐवज पावला, चैत्र व. २, श. १७३९/३ एप्रिल १८१७ **(१६३५०).**

**वासुदेव विश्वनाथ** : वेतनाचा ऐवज मिळाल्याबद्दल, कार्तिक शु. ११, श. १७३९/१९ नोव्हें. १८१७ **(१६३५९).**

**हरी गोसावी** : वाई येथून मिळत असलेला वार्षिक ऐवज मिळाल्याबाबत, माघ शु. १, श. १७३८/१८ जाने. १८१७ **(१६३५५).**

**गोविंदराव कृष्ण--तात्या* व बापू*** : मोरे यांचा कर्नाटकांत जाण्याचा बंदोबस्त करण्याबद्दल, २० जिल्हेज, सु. १२१७/११ नोव्हें. १८१६ **(१६२७९)**; महिमंडण येथील वसुलबाबतच्या पत्राची रवानगी व त्याबद्दल बंदोबस्त होण्याबद्दल विनंती, मेढे व कुडाळ येथील यात्रांची रवानगी, १ मोहरम, सु. १२१६/३ डिसें. १८१५ **(१६२८०)**; ९ मोहरम, सु. १२१६/११ डिसें. १८१५ **(१६२८१)**;--**सदोबा भाऊ**: पाठविलेल्या उदबत्या व कापूर मिळाल्याबाबत, पो. ३ मोहरम, सु. १२१६/५ डिसें. १८१५ **(१६२९५).**

**[विनायक रावजी देशमुख यांना आलेली पत्रे]**

**गोविंदा*** : मुलीकरिता खाऊस पाठविलेले साखरफुटाणे व आणे येथील ठरावाच्या मजकुराचे पत्र मिळाल्याबद्दल **(१६३३०).**

पत्रे--चालू :

**गोविंदशास्त्री साठे** : वाळकूबाईच्या उदरनिर्वाहाची सोय करण्याची विनंती, कमलगड, पांडवगड ह्या किल्याकडे करावयाच्या गावांच्या नेमणुकेबद्दल गोपाळशास्त्री बोलणी करतील त्याप्रमाणे करण्याबाबत, श्रावण शु. ३, सु. १२१७/२७ जुलै १८१६ **(१६३०३).**

**चिंतो वामन देशमुख** : त्रिंबकराव पेठे यास सरकारातून द्यावयाच्या ऐवजाची अडूर येथील मोकाशावर वरात व वराते ऐवजी रत्नागिरी येथील दिलेल्या ऐवजाचा खुलासा, फाल्गुन शु. ५, सु. १२१३/७ मार्च १८१३ **(१६२५९).**

**बाळाजी बच्याजी दांडेकर :** देणे असलेला ऐवज येथे चिठी करून देऊ किंवा कसा देऊ याबाबत विचारणा, १८ मोहरम. सु. १२१२/२ फेब्रु. १८१२ **(१६३२६).**

**विश्वनाथ सदाशिव** : वडगांवकर शिपायांनी सरकारी कामाकरिता दगड दिल्याबद्दल, पौष व. १२, श. १७३७/२६ जाने. १८१६ **(१६३०७).**

**विसाजी बच्याजी दांडेकर** : बोधे यांच्या जमिनीची लावणी करण्याबद्दल व सातारा येथील कुरणाचे काम गवत कटाईसुद्धा देण्याची विनंती, किरोली येथील ऐवजाच्या बेरजेबद्दल खुलासा, पो १२ साबान, सु. १२१७/८ जुलै १८१६ **(१६२९८).**

**श्रीधर विठ्ठल देशमुख** : रत्नागिरी येथील जप्तीचे काम वासुदेवपंत जोशी सोमेश्वरकर याजकडे सुपुर्त, दामोदरराव यांच्या प्रकृतीस अस्वास्थ्य **(१६३०४).**

**चिंतो त्रिंबक पुणेकर--रावजीपंत खरे** : पत्र पाठविण्याची विनंती व भाले, काठ्या यांची रवानगी, १२ ज. खर, सु.१२१७/३० एप्रिल १८१७ **(१६३०९).**

**चिंतो वामन देशमुख--मोकदम नाणीवली** : बापूजी शिंदे याजबरोबर नाणीवली येथील रानातील पळसाची पाने तोडून ताट्या पाठविण्याबाबत, २० ज. खर, सु. १२१३/३० जून १८१२ **(१६३११).**

**नारो शिवराम--बाबासाहेब*** : सरकारातून विश्रामबागवाड्याचे पूर्वेस मिळालेली जागा इमारतीसुद्धा प्रापकास नजर, वैशाख व. १३, श. १७२३/१० मे १८०१ **(१६२६६).**

**पांडुरंग भास्कर सोवनी--नाना जोशी** : गणपतराव श्रोत्री याजकडील हवाला घेतलेले पैसे दहा दिवसात परत करण्याचे आश्वासन, आश्विन शु. ३, श. १७२३/१० ऑक्टो. १८०१ **(१६२७६).**

**पांडुरंग विष्णु मुजूमदार--सुभेदार*** : नींब येथील मजमूच्या वेतनाची पोंच, भाद्र. शु. ११, सु. १२१८/२१ सप्टेंबर १८१७ **(१६३६३).**

**बलवंतराव भिकाजी--पांडुरंगपंत आबा** : भक्तवाडी येथील जमिनीबद्दल पैसे देण्याच्या केलेल्या कराराप्रमाणे दाजिबा आपटे याजकडे पैसे देऊन पावती घेण्याबद्दल, श्रावण व. ३०, श. १७३९/११ सप्टें. १८१७ **(१६२९६).**

**बाजीराव रघुनाथ प्रधान--खंडेराव नीळकंठ गोसावी** : वण व दिंडोरी येथील मामलत बाळाजी निंबाजी याच्या हवाली केल्याबाबत, १७ रमजान, सु. १२०५/२० डिसें. १८०४ **(१६२८५)**; --**दरकदार व कारकून, माहुली** : सरकारी आज्ञेशिवाय भगवंत शिंदे यांनी माहुली येथील रानातील इमारतीची तोडलेल्या लाकडाबद्दल चौकशी होऊन ती परत करण्याची आज्ञा, १६ जिलकाद, सु.१२०२/२१ मार्च १८०२ **(१६२९७).**

पत्रे—चालू :

**बापूजी सखाराम—पांडुरंगपंत आबा :** खाजगीकडील कारकुनाच्या वेतनाबाबत, २९ जिल्हेज, सु. १२१७/२० नोव्हें. १८१६ **(१६२५४)**;—**दिनकरपंत तात्या*** : किरकोळ मजकूर, १ मोहरम, सु. १२१७/२१ नोव्हें. १८१६ **(१६३१८)**; ३ मोहरम, सु. १२१७/२३ नोव्हें. १८१६ (१६३१९).

**बापूजी सखाराम सुभेदार, वाई—देशमुख देशपांडे व जोशी वाई :** गंगी कुणबीण हिच्यावर जातीचा बदकर्माचा आळ आल्याने तिला शुद्ध करून घेण्याची विनंती, सु. १२१८/इ. स. १७१७–१८ **(१६२८९–१६२९०)**.

**बापूजी सखाराम गोडबोले—दिनकरपंत गोडबोले :** डेंगळे याजकडील कारकून वाईस भांडणे करतात म्हणून त्यास भांडणे न करण्याबद्दल हरजी खडसरे किंवा डेंगळे यांचे पत्र पाठविण्याबद्दल, १७ मोहरम, सु. १२१७/७ डिसें. १८१६ **(१६३२३)**.

**बाळकृष्ण आबाजी सुभेदार—सदाशिव परांजपे :** त्रिंबकजी नाईक वणजारे याजकडील बैलांच्या जकातीबद्दल, सु. १२१३/श. स. १८१२–१३ (१६३३२).

**बाळाजी नारायण नाडगौडे—रघुनाथ बाबूराव :** येकसर येथील इनाम जमिनीपैकी वडिलांनी स्वसंतोषे तुम्हांकडे वंशपरंपरेने दिलेल्या जमिनीची वहिवाट करण्याबद्दल, आश्विन शु. १३, श. १७२३/१९ ऑक्टो. १८०१ **(१६२८८)**.

**भिकाजी काशी—पांडुरंगपंत आबा सुभेदार :** प्रकृति ठीक नसल्याने वर्षासनाचा ऐवज बाळ दीक्षित याजकडे देण्याची विनंती **(१६२६४)**.

**मीर आबास आलीखान—बाबा*** : रोजमुरा मिळाल्याबद्दल, २१ ज. खर, श. १७३३/१३ जुलै १८११ **(१६२९२)**.

**रामचंद्र नरसिंह—रावजी*** : भास्करपंत करंदीकर यास पडसलगी येथे वनचराईबद्दल उपद्रव न देण्याची विनंती, ११ ज. खर, सु. १२१७/२९ एप्रिल १८१७ **(१६३०८)**.

**लक्ष्मणराव भिकाजी—दिनकरपंत गोडबोले व विनायकराव वाघ :** इंग्रजांचा अरफळ वडूथावरून किल्ल्याकडे यावयाचा बेत असल्याने आरब, रोहिले सिद्दी वगैरे लोक पाठविण्याची विनंती **(१६२८३)**.

**लक्ष्मीबाई सहस्त्रबुद्धे—पांडुरंगपंत सुभेदार :** पोफळे रवाना **(१६३२१)**.

**विनायक धोंडदेव कोन्हेरे—बाबासाहेब* :** वडिलांच्या उत्तरकार्यासाठी आगाऊ पाठविलेल्या रोजमुऱ्याच्या ऐवजाची पोंच, कार्तिक शु. १४, श. १७३३/३० ऑक्टो. १८११ **(१६२५७)**.

**विनायक बाबाजी—पांडुरंगपंत आबा :** शेख बाला याजकडील बाकी आसामींचा ऐवज केशव रघुनाथ याजकडे देण्याबाबत, २० जिलकाद, सु. १२१८/२ ऑक्टोबर १८१७ **(१६३००)**.

**शेख बाळा—बाबासाहेब*** : दिमतीस असलेल्या आसामींचा रोजमुरा पावल्याची पोंच, कार्तिक व. २, श. १७३९/२५ नोव्हें. १८१७ **(१६२६३)**.

**श्रीधर गणेश खरे—रावजी खरे** : जैराम व नागोबा यांच्या रोजगाराची तजवीज करण्याची विनंती, पो ७ ज. खर, सु. १२१७/२५ एप्रिल १८१७ **(१६३१४)**.

**श्रीधर दीक्षित गोडबोले—दिनकरपंत तात्या*** : चिंतोपंत वेलणकर याजकडे असलेला कर्जाऊ ऐवज वसूल करण्याची विनंती, मार्गशीर्ष व. ९, सु. १२१७/१३ डिसें. १८१६ **(१६३१७)**.

**हणमंत*—बापू*** : परली, कुडाळ, मेढे येथील जमा झालेल्या ऐवजाचा तपशील व काशीकर बाबांनी पाठविलेला प्रसादाचा नारळ रवाना, पो ११ जिल्हेज, सु. १२१६/१३ नोव्हें. १८१५ **(१६२६५)**.

पत्रे—चालू :

**[फक्त प्रेषकाचा नामोल्लेख असलेली]**

**आप्पाजीराम सहस्त्रबुद्धे – (—) :** आण्णा देशमुखांनी ऐवजाकरिता लावलेला तगादा उठविण्यासाठी पत्र पाठविण्याची विनंती, पो माघ शु. ८, सु. १२१७/२५ जाने. १८१७ **(१६३३१)**.

**गणोबा* – (—)** : आप्पासाहेबांच्या लग्नासाठी झालेल्या खर्चाच्या ताळेबंदासंबंधी खुलासा, माघ व. १, सु. १२१२/२९ जाने. १८१२ **(१६३२५)**.

**गोपाळ अनंत दळवी पावसकर – (—)** : तलवडे येथील शेताच्या दुरुस्तीबाबत निवेदन, वैशाख शु. २, श. १७३६/२२ एप्रिल १८१४ **(१६३०१)**.

**गोपाळराम खंडकर – (—)** : पनवेल बंदरचा तपशिलवार झाडा पाठविण्याबद्दल **(१६२९४)**.

**गोविंदराम जोशी – (—)** : शाई व कोरे कागद यांची रवानगी, पौष शु. ८, सु. १२१७/२७ डिसें. १८१६ **(१६३२९)**.

**चिंतो पद्माकर – (—)** : घरगुती, खाजगी मजकूर, वैशाख शु. १, सु. १२१७/१७ एप्रिल १८१७ **(१६३१५)**.

**दाजी गणेश बर्वे – (—)** : येणे असलेल्या कर्जाऊ ऐवजाबद्दल मल्हार रामराव चिटणिस यांनी नेमून दिलेल्या गावांच्या वसुलीचा तपशील **(१६३०२)**.

**बाळाजी कृष्ण फाटक – (—)** : स्वारीचे पंचवटीस आगमन, फाल्गुन शु. ११, सु. १२१६/१० फेब्रु. १८१६ **(१६३२८)**.

**बाळाजी केशव – (—)** : विजया दशमी झाल्यावर ऐवज देण्याचे आश्वासन, आषाढ शु. १, श. १७३१/१३ जुलै १८०० **(१६२५३)**.

**वासुदेव सदाशिव जोशी – (—)** : वसईहून आणलेल्या जनिसांची रवानगी, २२ जिलकाद, सु. १२१२/९ डिसें. १८११ **(१६३२७)**.

**विठ्ठल बल्लाळ तांबे — (—)** : नारो विष्णु आपटे याजकडील सोप्याच्या बांधकामाबाबत निवेदन, २१ साबान, सु. १२१७/१७ जुलै १८१६ **(१६३०५-३०६)**.

**[फक्त प्रापकाचा नामोल्लेख असलेली]**

(—) — **आबाजी दादाजी** : मराल बुग्रा येथील रसदेच्या ऐवजापैकी काही पोता भरणा करण्याबद्दल, सु. १२०२/इ. स. १८०१–०२ **(१६२७७)**.

(—) — **घनःशाम त्रिंबक** : येरंडोल येथील रसदेच्या एवजापैकी पोता भरणा झालेल्या ऐवजाची पोंच, १३ जिलकाद, सु. १२०१/२९ मार्च १८०१ **(१६२७३)**.

(—) — **दिनकरपंत तात्या** : बर्गे प्रकरणाबाबत लिहिलेल्या पत्राबद्दल, पो १८ मोहरम, सु. १२१७/८ डिसें. १८१६ **(१६३२४)**.

(—) — **नारोपंत नाना*** : पैसे घेण्याबद्दलच्या पाठविलेल्या चिठ्ठीपैकी काही खर्चास पाठवून बाकी आपण घेऊन मुलाचे नाते कायम ठेवण्याची विनंती **(१६२९३)**.

(—) — **पुरुषोत्तम धुंडीराज** : राजदहेर येथील रसदेच्याचे येणे ऐवजापैकी पोता जमा झालेल्या ऐवजाची पोंच, २ जिलकाद, सु. १२०१/१८ मार्च १८०१ **(१६२६७)**.

(—) — **व्यंकटराव नारायण** : खानदेश येथील चौकशीचे कामाबद्दल व रसदेबद्दल यावयाच्या ऐवजापैकी पोता भरणा झालेल्या ऐवजाची पोंच, १३ जिलकाद, सु १२०१/२९ मार्च १८०१ (१६२७१).

पत्रे—चालू :

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]

कणेरा व देहरे ह्या किल्ल्यांचे हिशेब विचुरकरांबरोबर पाहण्यासाठी पाठविण्याबद्दल, सु. १२११/इ. स. १८१०-११ (१६२५६); रामचंद्र लक्ष्मण व राघो विठ्ठल देशपांडे यांच्या कुलकर्णपणाच्या तंट्यात रामचंद्र लक्ष्मण याच्याकडून कुलकर्ण्याचे काम करून घेणे म्हणून, (१६२५८); नेमणूक नसता सिद्दी जोहार याने घेतलेला कोयें येथील वसूल व सिद्दी रहमान याजकडे बालपर्वेशीसाठी नेमणूक असलेला तळवडे येथील ऐवजाबद्दल, सु. १२०५/इ. स. १८०४-१८०५ (१६२६०); करंजेकडील कारकून जाबसालास आल्याखेरीज पाडशेट करंजे याजकडून शिकरापूर येथील कमाविशीची राहिलेली बाकी त्याच्या पाटीलकीच्या तक्षिमेतून सरकारात घ्यावयाच्या ऐवजाचा तगादा उठणार नाही म्हणून, सु. १२०८/इ. स. १८०७-०८ (१६२६१); आण्णा वाघ याजकडील बातमीच्या चिठ्ठ्यांची रवानगी (१६२८२); येकसर येथील बाळाजी नाडगोडे यास इनाम असलेल्या जमिनीच्या चौकशी, सु. १२१८/इ. स १८१७-१८१८ (१६२८७); श्री. काशी विश्वेश्वर व श्री गंगाधरेश्वर यांच्या वाई येथील जमिनीच्या खर्चाच्या हिशेबाचा तपशील (१६२९१); बाबाजी रघुनाथ हवालदार यांनी सिंदे-गव्हाण पैकी सरकारात यावयाच्या खरेदी तोटयाच्या काढलेल्या बाकीच्या जाबसालास पाटील कुलकर्णी यांची जरूरी, सु. १२०८/इ. स. १८०७-१८०८ (१६३६६).

रवानगी यादी :

सोलापूर येथील किल्ला व परगणेची फडणिसी बाळाजी हरी याजकडून दूर केल्याबद्दल सोलापूरच्या मामलेदारास दिलेल्या सनदेची, २४ मोहरम, सु. १२०२/७ जून १८०१ (१६२७०); धोंडो श्रीनिवास हरगुडेकर याच्या बाल पवेसी-बद्दल रामचंद्र नारायण याजकडून जामदारखान्यापैकी द्यावयाचा ऐवज व कापड यांची (१६२९९).

वरात :

(—) —आबाजी नीळकंठ : आप्पाजीराम याजकडील गाड्याच्या ऐवजाची बाहाल येथील रसदेवर, १० ज. वल, सु. १२०२/१९ सप्टेंबर १८०१ (१६२७५).

(—)—कृष्णराव महिपत : हुजूर दप्तराकडील लोकांच्या शेन सनदी व इतलाखी ऐवजाची सरकारात अेकसाला घ्याव-याच्या रत्नागिरी येथील ऐवजावर, सु. १२००/इ. स. १७९९-१८०० (१६२७४).

(—)—पांडूरंग धोंडाजी : कृष्णराव विचारे याजकडील गाड्यांच्या रोजमुऱ्याची गोविंदराव नीळकंठ यांच्या वेतनाच्या ऐवजावर, १४ मोहरम, सु. १२००/१९ जून १७९९ (१६२६८).

(—)—बाळाजी आबाजी : कृष्णराव विचारे याजकडील गाड्यांच्या रोजमुऱ्याची दंडा राजपुरी येथील देशमुखीच्या ऐवजावर, २८ जिल्हेज, सु. १२००/२३ मे १८०० (१६२६९).

(—)—शिवराम आत्माराम : नरसिंगराव कृष्ण याच्या रोजमुऱ्याची उमटखेड येथील हशमाकडील फडणिसीच्या रसदेवर, २४ जिल्हेज, सु. १२००/१९ मे १८०० (१६२७८).

(—)—सिद्धेश्वर महिपतराव : आप्पाजीराम याजकडील गाड्यांच्या रोजमुऱ्याची पाछापूर येथील फडणीसीचे वेतन व कारकुनीच्या ऐवजावर, १९ र. वल, सु. १२०२/३१ जुलै १८०१ (१६२७२).

रुमाल क्र. ३१ पुडके क्र. ४, का. सं. ५९ (१६३६८-१६४२६)
सु. स. १२००–१२१७, इ. स. १७९९-१८१७

अर्ज :

मामलेदार, पाटील व पटवारी यांचा रयतेला होणारा उपद्रव कमी होण्याबाबत वाघोली येथील लोकांचा, सु. १२१६/इ. स. १८१५-१८१६ (१६३७५); कारकून लोक पडित जमिनीवर जादा पट्टी बसवितात म्हणून मानीचंदन गडकरी यांचा रावजी देशमुख याजकडे, पौष शु. १३, शके १७३५/४ जाने. १८१४ (१६३९१).

पत्रे :

आनंदराव शिवराम—आबाजीपंत आबा देशमुख : मकर संक्रमणानिमित्य तिळगूळ रवांना, २० जिल्हेज, सु. १२११/१४ जाने. १८११ (१६४१६).

आप्पाजी परशुराम दाते—चिंतोपंत रावजी देशमुख : खर्चा-साठी पाठविलेले पैसे महादजी कृष्ण यांच्या गुजारतीने मिळाल्या-बाबत, १२ जिल्हेज, सु. १२१६/१४ नोव्हें. १८१५ (१६४२६).

आप्पाजी नाईक गायकवाड—पांडुरंगपंत तात्या : सरकारी कामकाज लक्षपूर्वक करण्यासंबंधी ताकीद, २ जिल्हेज, सु. १२१५/१६ ऑक्टो. १८१४ (१६३८९).

आबाजी सदाशिव देशमुख— विनायकराव देशमुख : नाना जैन याजकडून मीठ विक्रीचा ऐवज वसूल करण्याबद्दल (१६३७३).

कृष्णराव बापूजी—इश्रामन* व मानेखान* : मौजे वाळवे येथून गंगाधरपंतांची बहादूरवाडीस रवानगी करण्याबद्दल, ७ ज. खर, सु. १२१३/१७ जून १८१२ (१६३९५);—गंगाधरपंत* : वाळवे ठाण्याचा बंदोबस्त करण्यासंबंधी सूचना, ७ ज. खर, सु. १२१३/१७ जून १८१२ (१६३९६).

गोविंद कृष्ण आपटे—रावजी देशमुख : त्रिंबकजी डेंगळे याजकडील कारकून लोक उपद्रव करतात तरी त्यांचा बंदोबस्त करावा, ४ मोहरम, सु. १२११/३१ जाने. १८११ (१६४१३).

चिंतामण* —भाऊ देशमुख : रामशास्त्री नटराजापूरकर यांच्या पंतप्रतिनिधींकडील वर्षासनाचा विचार व्हावा म्हणून, १० साबान, सु. १२०८/१३ ऑक्टो. १८०७ (१६३६९).

चिंतो वामन देशमुख—दाजीबा आपटे : मौजे किकली येथील शिदोजी बिन तान्हाजी पाटील वगैरेच्या मोकदमी व हक्कदारी-बद्दल निवाडा करण्यासंबंधी विनंती (१६४१९);—देशमुख व कुलकर्णी : मामलेदाराचे वहिवाटीबाबत राघोपंत देवधर यांची रवानगी, २० साबान, सु. १२१४/१८ ऑगस्ट १८१३ (१६३९८).
नारोपंत रानडे : कातवडे येथील कुसुमेश्वर देवाची पूजा अर्चा गावणकर व उमरकर यांचे तंटयाचा फडशा होईपर्यंत सरकारातून करावी, २८ र. वल, सु. १२१६/२७ फेब्रु. १८१६ (१६४२०);—विनायकराव देशमुख : लक्ष भोजनाकडील ब्राम्ह-णांच्या कपडयाची व्यवस्था ठेवण्याबद्दल, ९ ज. वल, सु. १२१२/२१ मे १८१२ (१६४२४);—हरि कृष्ण कुलकर्णी : कसबे-वाडे येथील महार वतनासंबंधी कागदपत्र घेऊन येण्याबद्दल, १ ज. खर, सु. १२१४/२० मे १८१४ (१६३८५).

चिंतो वामन सुभेदार—नारायणजी बिन नायकोजी गुजर : बलाऱ्याकडील ऐवज वसूल करण्याबद्दल, कार्तिक व. १, शके १७३४, १९ नोव्हें. १८१२ (१६३९३); भास्कर विश्वनाथ, ठाणसिंग याच्याकडील बलाऱ्याचे वसुलाचे कामकाज नारायणजी नायकोजी गुजर याजकडे दिल्याबाबत, कार्तिक व. १, शके १७३४/१९ नोव्हें. १८१२ (१६३९२).

पत्रे—चालू :

**छत्रपति शिवाजी महाराज—चिंतो वामन** : मकर संक्रमणानिमित्य तिळगूळाची भेट, २६ जिल्हेज, सु. १२१२/१२ जाने. १८१२ (१६३९०).

**जनार्दन लक्ष्मण कामत—रावजी देशमुख** : आपटे आणि बापट यांचे कजियासंबंधी, कार्तिक शु. ९, शके १७३७/१० नोव्हें. १८१५ (१६४१०).

**नारायण बळवंत वाकडे—चिंतोपंत रावजी देशमुख** : पौा अंतूर व रांजणगाव येथील मोकाशी ऐवजाच्या भरण्यासंबंधी, १३ जिल्हेज, सु. १२१२/३० डिसें. १८११ (१६३९९).

**नारो बल्लाळ रानडे—विसाजीपंत रानडे** : चिंतामणभट यांच्या आजारासंबंधी देवास कौल लावण्याची गुरवास ताकीद करावी म्हणून, २१ मोहरम सु. १२१७/११ डिसें. १८१६ (१६३७४)

**निळी मोकदम—पांडूरंग रामचंद्र देवधर** : बेल्हे येथील पाटीलकीच्या ऐवजाच्या फडशासंबंधी, २१ सफर, सु. १२१०/२८ मार्च १८१० (१६४०८).

**परशुराम श्रीनिवास प्रतिनिधी—मारो आबाजी** : श्री. भार्गवराम क्षेत्र परशराम यास चवरी खर्चाबाबत सालिना नक्त नेमणूक रु. ७५ सुभा महिपतगड येथील ऐवजी करार करुन दिली, १ मोहरम, सु. १२००/६ जून १७९९ (१६४१८).

**पांडूरंग दीक्षित मनोहर—मोकदम कसबे वाड** : पुण्यास येण्याविषयी सूचना, ४ जिल्हेज, सु. १२१४/२८ नोव्हें. १८१३. (१६३८४).

**बापूजी गणेश—भास्कर बल्लाळ** : शेवलडी येथील पांडूरंगाच्या देवाच्या पुजाअर्चाच्या खर्चासाठी इनाम जमीन देण्यासंबंधी, सु. १२११/इ. स. १८१०-१८११ (१६३९८).

**बाळकृष्ण आबाजी सुभेदार, प्रा. कल्याण-भिवंडी—गणेश देसाई** : राघो लक्ष्मण यांजकडे पेण येथील (भुसार बंदराचे) जकातीचे कामकाज दिल्याबद्दल, २९ सवाल, सु. १२१३/५ नोव्हेंबर १८१२ (१३३९४) ; —**नारायणजी बिन नायकोजी गुजर** : कल्याण भिवंडी येथील बलाऱ्याचे जकातीच्या मक्त्याबाबत, सु १२१२–१३/इ. स. १८१२–१३ (१६४०५) ; —**श्रीधर आप्पाजी चिपळूणकर** : कल्याण-भिवंडी, घाटसरी वगैरे येथील मामलतीवरुन प्रांपकास दूर केल्याबाबत, सु. १२१२–१३/इ. स. १८१२–१३ (१६४०४).

**मोकदम मौजे कामती—चिंतोपंत रावजी देशमुख** : मौजे कामती येथील कचांवीस दुप्पट घेऊन गांवास उपद्रव केल्याबद्दल कृष्णराव गोषाळ विरुद्ध तक्रार, ६ सफर, सु-१२१७/२६ डिसेंबर १८१६ (१६४०७)

**राघो गोविंद देशमुख—बाळाजीपंत दाजी फाटक** : तात्या तालबानकर यांजकडील येणे असलेला ऐवज गंगाधर भट याजकडे जमा करण्यासंबंधी, ७ र. खर, सु. १२१६/७ मार्च १८१५ (१६३७९).

**राघोबा*—चिंतोपंत रावजी देशमुख** : मुखवटे कोणाकडून तजावजा झाले याची विचारणा, गोविंदपंत तात्या पराठे डोंगरगांवकर यांच्या मुलाशी बयांबाई हिचे लग्न झाल्यासंबंधीचा तपशील, १० रजब, सु. १२१७/२७ मे १८१७ (१६४२२–१६४२३).

***राम. सावंत–रावजी स्वामी** : मकर संक्रमणानिमित्य तिळगुळ रवाना, ५ मोहरम, सु. १२११/३१ जानेवारी १८११ (१६४१२).

**रामचंद्र बल्लाळ आगाशे—अमृतराव बाबा** : आंबेगांव येथील कुंजीर यांचे कुरणांची जप्ती, ८ जिल्हेज, सु. १२१६/१० नोव्हेंबर १८१५ (१६३७६).

पत्रे—चालू :

**रामाजी नारायण माने — हरिपंत देशमुख** : कुशल वृतांत, १३ मोहरम, सु. १२११/८ फेब्रुवारी १८११ (१६३९७).

**लक्ष्मण कृष्ण कोल्हटकर—चिंतोपंत रावजी देशमुख** : गणेशपंत देसाई यांनी प्रेषकाशी व त्याच्या माणसांशी दुर्भाषणे केल्याबद्दल ताकीद व्हावी म्हणून, ७ सफर, सु. १२११/९ ऑगस्ट १८१० (१६३८७).

**वामनराव गोविंद—जगन्नाथपंत गोखले** : आडवली तालुका सौंदल येथील वहिवाट रावजीचे कारकून करतील व वसुलाचा ऐवज देतील यासंबंधी, १८ मोहरम, सु. १२१५/३१ डिसेंबर १८१४ (१६४०९).

**विसाजी कृष्णाजी—विनायकराव देशमुख** : मौजे गावखडी, तालुका बिजयदुर्ग येथील गुरव यास देवास कौल लावण्यासाठी ताकीदपत्र देण्याविषयी, २ सफर, सु. १२१७/२२ डिसेंबर १८१६ (१६४२१).

**विसाजी बल्लाळ फाटक—गणेशपंत देशमुख, पावस** : राघोपंतदादा देशमुख यांचे नांवे दिलेल्या लखोटचातील खासगत झाडा कोणास दाखऊ नये म्हणून, फाल्गुन शु. ६, शके १७३७/५ मार्च १८१६ (१६३७२).

**व्यंकोबा*—विनायक दादा देशमुख** : मकर संक्रमणानिमित्त तिळगुळाची भेट, १९ जिल्हेज, सु. १२११/१३ जानेवारी १८११ (१६४१५).

**सदाशिव बल्लाळ पाटणकर—तात्या*** : कोरगांव असखेडे वगैरे गांवावर स्वार व प्याद्यांचा खर्च टाकू नये म्हणून, वैशाख शु. ५, सु. १२०७/१२ मे १८०७ (१६४११).

[फक्त प्रेषकाचा नामोल्लेख असलेली]

**आबा—(—)** : श्रीगणपती व जोगेश्वरी यांचे हाराचे खर्चासाठी ब्राह्मणांस पैसे दिले, कलमदान व चर्मीजोड पांठवून देण्याबाबत, ८ मोहरम, सु. १२११/३ फेब्रुवारी १८११ (१६४२५).

**केशो बापूजी गद्रे—(—)** : पांडुरंग गोडबोले वसुलीच्या कामात अडथळा करितात व वाई येथील सालमजकूर पट्टी बंद केली सबब ताकीद करावी म्हणून, ३ सफर, सु. १२१७/२३ डिसेंबर १८१६ (१६३८२); ७ सफर, सु. १२१७/२७ डिसेंबर १८१६ (१६४१७).

**खुशालचंद—(—)** : कात्रज येथील तलावाच्या बांधकामाचा हप्ता मिळाल्याबद्दल. चैत्र व. ७, शके १७३४/४ एप्रिल १८१२ (१६३८०) ; (१६३८१).

**चिंतो नारायण कुलकर्णी—(—)** : वासुदेव महादेव यांनी जप्त केलेल्या मसूर येथील इनाम जमिनीची मोकळीक करण्याबद्दल, ३ र. खर, सु. १२१६/३ मार्च १८१६ (१६३७८).

**चिंतो वामन देशमुख—(—)** बादूर तौा पवनमावळ येथील ऐवज बाजी गोविंद परांजपे याजकडे देण्याबद्दल (१६४०३).

**बाजीराव रघुनाथ—(—)** : पारनेर येथील मामलतीवरुन खंडेराव यास दूर केल्याविषयी सु. १२१०/इ. स. १८०९–१८१० (१६४०६).

**बाळकृष्ण चिमणाजी फाटक—(—)** : सातारा येथील शाकारणीच्या ऐवजासंबंधी, १० ज. वल, सु. १२११/२ जून १८११ (१६३८३).

**बाळाजी गंगाधर—(—)** : गोपाळपंत खांडकर यांच्याकडील, नेमणुकी ऐवज खर्चाची केशोपंत सावनी यांनी हमी घेतल्याबद्दल आषाढ शु. ७, शके १७३२/८ जुलै १८१० (१६४००).

पत्रे—चालू :

**वासुदेव महादेव— (—) :** म्हसूर येथील प्रेषकाकडील इनाम जमीन आपटे याजकडील कारकुनास दिली असता तो सुरळीत चालवीत नसल्याबद्दल तक्रार, फाल्गून शु. ४. सु. १२१६/३ मार्च १८१६ (१६३७७).

**विठ्ठल शिवराम चक्रदेव— (—) :** मकर संक्रमणानिमित्त तिळगुळाची भेट, १९ जिल्हेज, सु. १२११/१५ जाने. १८११ (१६३७१).

**विसाजी बच्याजी दांडेकर— (—) :** दिनकरपंत नाना साठे यांचे पथकात असलेल्या त्रिंबकजी विश्वनाथ गद्रे यांच्या लोकांना पगारवाढ देण्याबद्दल, ३० मोहरम, सु. १२१२/१४ फेब्रुवारी १८१२ (१६३८६).

**व्यंकोबा— (—) :** तिळगुळ रवाना, १९ जिल्हेज, सु. १२११/१५ जाने. १८११ (१६४१४).

पत्रे—चालू :

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]**

(—) –**बापूजी गणेश :** वाखरी पो कासेगाव येथील श्रीरामभट बिन श्रीधरभट उत्पात यास इनाम जामीन दिल्याबद्दल, शके १७३०/इ. स. १८०८ (१६३७०).

(—) –**रामचंद्रपंत सुभेदार :** सैन्याची शिरगणती व माहिती पाठविण्याविषयी, १३ र. वल, सु. १२१४/६ मार्च १८१४ (१६३८८).

हमी पत्रे :

**केशो भास्कर सोवनी—चिंतोपंत रावजी देशमुख :** महाल्जी हर्षे यांची बाकी भरण्याबद्दलचे, २७ रजब. सु. १२१०/८ सप्टें. १८०९ (१६४०२)

**रघुनाथ कृष्ण—चिंतोपंत रावजी देशमुख:** कृष्णाजी विनायक सोवनी याजकडील वाळुंज येथील मामलतीच्या ऐवजाच्या भरण्यासंबंधी प्रेषकाचे १३ जिल्हेज, सु. १२१२/३० डिसेंबर १८११ (१६४०१)

---

रूमाल क्र. ३२, पुडके क्र. १–४

पुडके क्र. १, का. सं. ११० (१६४२७-१६५३६
सु. सं. १११६-१२१९, इ. स. १८१५-१८१९.

अर्ज :

अंतोबा बिन काशिबा बागडे या कापड दुकानदाराच्या कर्जव्यवहारासंबंधी (१६५००)

आज्ञापत्र :

**पंतप्रधान** (बाजीराव रघुनाथ) — **मोकदम** : निघोजे ता चाकण येथील कमाविशी सदाशिव चिंतामण याजकडे दिल्या बाबत, २७ सफर, सु. १२०४/७जून १८०४ (१६४९०), केंजल येथील विष्णूच्या देवालयास धामणा डोंगर व जमीन इनाम दिल्याबद्दल., सु. १२०२/इ. स. १८०१-१८०२ (१६४९१) (अपूर्ण).

पत्रे :

**कमाविसदार माहुली —कृष्णप्पा करदळे :** मीठ भरावयास जाणाऱ्या लोकांना उपद्रव होउ नये यासंबंधी, सु. १२१६/ इ. स. १८१५-१८१६ (१६५१०).

**कमाविसदार, माडे ता. खारेपाटण–विनायकरावजी देशमुख :** माडे ता खारेपाटण येथे आनोपती (दुष्काळ) पडल्यामुळे कुलकर्णी यास तूर्त गांव सोडून येण्यास मनाई, १३ सफर, सु. १२१७/ २ जाने. १८१७ (१६४६४).

**काशी शिवराम बंदरे—पांडुरंगपंत आबा :** विठ्ठल मोरेश्वर याजकडून भोई आसामीचा रोजमुरा मिळाल्याबद्दल, फाल्गुन शु. ७, शके १७३८/२३ फेब्रु. १८१७ (१६४५१).

**चिंतो विठ्ठल जोशी—रावजीपंत*** : वहिवाटीच्या कागदत्रां-संबंधी (१७४५६).

**दाऊभाई जमातदार—बाबासाहेब*** : यशवंतराव मैराळ, बहेनाजी व शेकोजी यांच्याकडून अैवज मिळाल्याबद्दल १४ र. वल, सु. १२११/८ एप्रिल १८११ (१६४७५).

**दिनकर सखाराम गोडबोले—पांडुरंगपंत आबा :** आबा गोडबोले व सखोबा सहस्त्रबु यांचे नावे पैसे लिहून सदाशिव ताम्हाणकर यांस देण्याबद्दल, ५ ज. वल, सु. १२१८/१३ मार्च १८१८ (१६४४८) ; घरगुती कर्जव्यवहारासंबंधी ८ रजब, सु. १२१७/ २५ मे १८२७ (१६४४३).

पत्रे—चालू :

**धोंडो भिकाजी—मोरोपत बाबा :** कोंडाजी चौगुले व इतर गांवची मंडळी जमाबंदीबाबत बखेडे करितात त्याचा बंदोबस्त होण्यासंबंधी, आषाढ शु. १०, शके १७३३/१ जुलै १८११ (१६४६१).

**नारायणबाबा येवतेश्वरकर—बाबासाहेब*. :** बापूजी गोडबोले यांच्याकडून वर्षासनाचा अैवज मिळाला, पौष व. ७, शके १७३७/ २१ जाने. १८१६ (१६४८०) ;— **बापूजीपंत दादा सुभेदार :** सुभा वाई येथून वर्षासन अैवज मिळाला, ४ साबान, सु. १२१८/२० जून १८१७/ (१६४६७) ; १३ ज. वल, सु. १२१७/१ एप्रिल १८१७ (१६४६८) ; १२ मोहरम, सु. १२१७/२ डिसे. १८१६ (१६४६९) ; ७ र. वल, सु. १२१७/२५ जाने. १८१७ (१६४७०) ; २९ र. खर, सु. १२१७/१७ मे १८१७ (१६४८१) ; ४ र. खर, सु. १२१६/४ मार्च १८१६ (१६४८२) ; १४ ज. खर, सु. १२१६ / १३ मे १८१६ (१६४८३); १५ र. वल सु. १२१९/१३ जाने. १८१९ (१६४८४) ; ८ र. वल, सु. १२१८/१६ जाने १८१८ (१६४८५).

**पांडुरंगपंत रामचंद्र देवधर—लक्ष्मणपंत दाजी :** राणेबेनूर येथील फडणिसीच्या कामाबाबत (१६४६५).

**प्रधान** (बाजीराव रघुनाथ)—**पुरुषोत्तम बल्लाळ :** पिंपळवाडी, ता आळे येथील कमाविशीवर येसाजी पवार याची नेमणूक, २० साबान, सु. १२०९/११ ऑक्टो. १८०८ (१६४६२).

**बाजीराव त्रिंबक कमाविसदार—रावजी*.:** अैवज पाठवून देण्या-बद्दल, शके १७३०/इ. स. १८०८-१८०९ (१६४५४).

**बाजीराव व रतनराव मोहिते—बाबासाहेब*** : यशवंत मैराळ याजकडून रोजमुरा मिळाल्याबद्दल, २० रमजान, सु १२१२/ ९ ऑक्टो., १८११ (१६४५७).

**बापूजी सखाराम गोडबोले—पांडुरंगपंत आबा :** रूई, संमत कोरेगांव येथील नागोजी पाटील यास अैवजाविषयी तगादा, २७ मोहरम, सु. १२१७/१७ डिसे. १८१६ (१६४५०) ; महिपतराव कृष्णा तळेगांवकर याजकडे रोजमुऱ्याच्या अैवजाची भरपाई करण्याबद्दल, २२ जिल्हेज, सु. १२१७/१३ नोव्हें. १८१६ (१६४६०) ; काशिपंत दादा यांना रोजमुऱ्याची पावती देण्या-बाबत, १७ र. वल, सु. १२१७/४ फेब्रु. १८१७ (१६४७३) ; भोई लोकांचा पगार देणे, २३ ज. खर, सु. १२१७/११ मे

पत्रे—चालू :

१८१७ (१६४२७) ; किल्ले चंदन व वंदन येथे बंदोबस्तास असलेल्या लोकांना रोजमुरा देण्याबद्दल, २१ जिल्हेज, सु. १२१७/१२ नोव्हें. १८१६ (१६४२८) ; वाई येथील साल मजकुराच्या ऐवजाची दादंभटजी फडके यांच्याकडून पोंच, १७ मोहरम, सु. १२१७/७ डिसें. १८१६ (१६४२९); जमातदार व नारोपंत नाना याना दिलेले पैसे वजा करून बाकी ऐवज जमातदाराच्या नावे करावा (१६४३०) ; रुपयाची मोड मिळाल्याबद्दल (१६४३१) ; निळो विश्वनाथ तळवणकर यास पैसे देण्याबद्दल (१६४३२); पंत अमात्य यांच्याकडील इनाम गांवे टेकसल व फत्तेपूर यांची मोकळीक व श्रीनिवासपंत तात्या यांच्या अंगापूर येथील देशमुखीसंबंधी मोकळीक चिठ्या देण्याबाबत (१६४३३) ; सातारा येथील घोड्याच्या खर्चासाठी आबा पालकर यास भरणा करावयास सांगितल्याबाबत, १४ सफर, सु. १२१६/१५ जाने. १८१६ (१६४३५) ; वाईहून पुण्यास बैलावरून व ऊंटावरून रुपयाच्या गोण्या भरून रवाना करण्याबद्दल (१६४३६) कुमठे संमत कोरेगांव प्रांत वाई येथील देशमुखीच्या ऐवजाची धोंडो सखाराम याजबरोबर रवानगी, २९ र. वल, सु. १२१७/१६ फेब्रु. १८१७ (१६४३८) ; गुळुंब येथील संताजी बिन जोशी जाधव यांच्याकडून आलेल्या साऱ्याबाबत, १२ ज. खर, सु. १२१७/३० एप्रिल १८१७ (१६४३९) : त्रिंबकराव जनार्दन एरंडे यास कुरण चालविण्यास परवानगी देणे, २८ जिल्हेज, सु. १२१७/१९ नोव्हे. १८१६ (१६४४०) ; घोड्यांचा खर्च चालविण्याबाबत (१६४४१) ; गारद्याचा रोजमुरा व उष्टर-खान्याकडे मोहरमाच्या खर्चास ऐवज देण्याबद्दल, २९ जिल्हेज, सु. १२१८/१० नोव्हें. १८१७ (१६४४२) ; मोरो नारायण दाबक याजबरोबर गेलेल्या माणसाच्या रोजमुऱ्याविषयी (१६४४४) ; चव्हाण बरोबर पाठविलेल्या ऐवजाची पोंच, (१६४४६) ; शेटीबा फडतरेबरोबर उत्तमपैकी आंबे खरेदी करून पाठविणे, २७ साबान, सु. १२१७/१५ जुलै १८१७ (१६४४७).

**बापू जैन शिंपी—बाबासाहेब*** : तुकबा याजकडून रोजमुऱ्याचा ऐवज पावला, २४ जिल्हेज, सु. १२११/२० जाने. १८११ (१६४४९).

**भिकाजी गायकवाड—बाबासाहेब*** : यशवंत मैराळ याजकडून रोजमुरा ऐवजाची पोंच, आश्विन व. ८, शके १७३३/१० ऑक्टो. १८११ (१६४७६).

**भिकाजी नवरे—माणकोपंत आबासाहेब** : पा। प्रतापूर येथील तीन गांवच्या वसुलासंबंधी, ६ रमजान, सु. ११७७/२० ऑक्टो. १७७६ (१६४८६).

**महंमद हशम तिरंदाज—बाबासाहेब***: यशंवतराव मैराळ यांजकडून रोजमुरा पावला, कार्तिक व. १० शके १७३३/१० नोव्हें. १८११ (१६४७४).

**यशवंतराव त्रिंबक फलटणकर—पांडुरंगपंत आबा** : बापू गोडबोले यांच्या नांवे असलेल्या हुंडीपत्रावर भरपाई करण्याबाबत, (१६४३७) ; वैशाख शु. ५, शके १७३८/२ मे १८१६ (१६४५२).

**राघो सदाशिव पाटणकर—बापूजीपंत गोडबोले** : पांडुरंगपंत याजकडून रोजमुरा मिळाल्याबद्दल, मार्गशिर्ष व. १३, शके १७३७/२८ डिसें. १८१५ (१६४३४).

**रामराव कृपाराम शिलेदार—बाबासाहेब*** : यशवंतराव मैराळ याजकडून रोजमुरा पावला, आश्विन व. ९, शके १७३३/११ ऑक्टो. १८११ (१६४७७).

**शिवसिंग जमातदार—बाबासाहेब*** : दिमतीस असलेल्याचा रोजमुरा मिळाल्याबद्दल, श्रावण शु. ७, शके १७३९/२० जुलै १८१७ (१६४७८).

पत्रे—चालू :

**शेखबाला मौलाद जमादार—बाबासाहेब*** : चाकरीस असलेल्या लोकांचा रोजमुरा पावला, २८ सवाल, सु. १२१८/११ सप्टें. १८१७ (१६४७९).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली]**

**गणेश बल्लाळ देसाई — ( — )** : भाताच्या खरेदी विक्रीच्या व्यवहारासंबंधी, २४ सवाल, सु. १२१३/३१ ऑक्टो. १८१२ (१६४५९).

**संभू* – ( — )** : बाळाजी जोशी व विठ्ठलभट कानिटकर यांच्या खटल्याबाबत, १३ मोहरम, सु. १२१६/१५ डिसें. १८१५ (१६४४५).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]**

**( — ) — आबाजी बापूजी** : विजयदुर्ग येथील सालमजकुरी ऐवज मिळाला, १३ जिल्काद, सु. १२०१/८ मे १८०० (१६४५८)

**( — ) — कृष्णाजी विश्वनाथ**: गोविंदभट वीरकर व केशवभट आणि विठ्ठलभट भोळे यांच्या उपाध्येपणाविषयीच्या कजियाचा बंदोबस्त होण्यासंबंधी, ११ जिल्हेज, सु. ११७१/२८ मार्च १७७१ (१६५१८).

**( — ) — गोविंद सखाराम कमावीसदार, मु. कुसी पो नेवासे** : रसदेच्या ऐवजाचा कबज देण्याविषयी, १ जिल्हेज, सु. १२००/२६ एप्रिल १८०० (१६४७१).

**( — ) — त्रिंबक लक्ष्मण**: चिंचोडी प्रा नेवासे येथील. कुलकर्णीपणाच्या वतनाच्या तंट्याबाबत व त्यावरील जप्ती उठविण्यासंबंधी कमाविसदारास सूचना, २ र. खर, सु. ११६६/१८ सप्टें. १७६५ (१६४६३).

**( — ) — परशुराम केशव मराठे** : आनंदराव धुळप मृत्यू पावले सबब हिशोबाची तपासणी, बावडेकरापासून शिबंदी खर्च घेण्याबद्दल, सादैल महालाच्या वसुलाबाबत, विजयदुर्ग येथील मामलेदारांकडील बाकी ऐवजाविषयी (१६५०२).

**( -- ) -- बाबा पुरोहित इनामदार** : लग्नकार्य व फंड-फर्मास दरोबस्त पूर्वीप्रमाणे चालावे म्हणून विनंती (१६५१७).

**( -- ) --बालंभट आठले** : सरदेसाई याजकडे नक्त ऐवज देण्याबाबत (१६५०३).

**( -- ) --मोकदम, करकंब, ता. पाटस** : बहिरजी बिन शितोळे यास वरातेच्या ऐवजाचा फडशा करण्यास पुण्यांस घेऊन येण्याबद्दल, सु. १२११/इ. स. १८१०-१८११ (१६४५५).

**( -- )-- मोकदम दालमोडीं** : दालमोडी येथील पाटिलकीच्या कजियामुळे गांवकरी यास लावणी करण्याबाबत अभय, सु. १२१५/इ. स. १८१४-१८१५ (१६४८९).

**( -- ) -- रामचंद्र*** : तकियाच्या इनाम जमिनीवरील जप्ती मोकळी करण्यासाठी व उपद्रव न देण्यासाठी अंताजीपंत यास ताकीद (१६४८८).

**( — ) — वाडेकर व जुन्नरकर खाटिक** : अवडाजी खाटिक यांच्या मार्फतीच्या खाटकाने खोटे सांगून बकरी फरोक्त केल्याबद्दल संगमनेर येथील महालाच्या जमातीचा फडशा करण्याबाबत-सु. १२११/इ. स. १८१०-१८११ (१६५१४).

**( — ) — हरी गोविंद कमाविसदार** : ऐवजाचा भरणा करण्याविषयी, ४ जिल्काद, सु. १२०९/२३ डिसें. १८०८ (१६४५३) ; चिंतो वामन याजकडून ऐवज मिळाल्याबाबत, २ मोहरम, सु. १२०५/३ एप्रिल १८०५ (१६४७२).

पत्रे—चालू :

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]

कसबे पुणे येथील सोमेश्वराच्या अधिष्ठानाप्रित्यर्थ शिवरात्री-निमित्य झालेल्या खर्चासंबंधी (१६४६६) ; महादजी भिमाजी यास चांदवड किल्याची सबनिसी व सालिना दिल्याचा तपशील, १५ र. खर. सु. १२०१/ २६ ऑगस्ट १८०१ (१६४८७) ; प्रा विशालगड तर्फेची महादजी कृष्ण याजकडील मामलती ऐवजाची वसुली व बाळाजी महादेवतर्फे झालेल्या कामाची पहाणी करून खर्च देण्याबाबत, इमारती, कोकणातील शेती व कारखाने यांची पहाणी करून खर्च देण्याबाबत, कार्तिक शु. १२, शके १७३७/१३ नोव्हें. १८१५ (१६५०६-०७) ; सातारा येथील मिठुकेश्वर त्रिपुरारी यास मिळालेल्या इनाम गांवाबाबत (१६५३६).

पावती :

बाळाजी रामचंद्र खांडेकर यांना शनिवार वाड्यांतील गणपतीच्या मूर्ती केल्याबाबत दिलेल्या ऐवजासंबंधीची, पौष शु. ५, शके १७३७/४ जाने १८१६ (१६५१५).

याद्या :

नारो गणेश ओक याजकडून गोविंदपंत दादाकडे आलेल्या भांड्यांची (१६४९३) ; मल्हार बिन हरजी शिंदे यांच्या लग्नातील बुरुड व कुंभाराकडील साहित्याची, माघ व. ५, शके १७०६/३० जाने. १७८५ (१६४९४) ; किल्ले सातारा येथील नव्या वाड्याजवळ नवे सोपे बांधावयाचे त्यांचे खर्चाची, मार्गशिर्ष शु. १०, शके १७३७/११ डिसें. १८१५ (१६४९५) ; जमीन लागवडीस आणण्याकरिता होणाऱ्या वार्षिक खर्चाची (१६४९६) ; ढोरज येथे कामगिरीस पाठविलेल्या लोकांच्या खर्चाची (१६४९७) ; निरनिराळ्या वस्तूंची, सु. १२११/ इ. स. १८१०-११ (१६४९८) ; संत्या चोरापासून गुलब्या बिन हरिदास तांबोळी यांनी घेतलेल्या दागिन्यांची, सु. १२००/ इ. स. १७९९-१८०० (१६४९९) ; गणपती उत्सवांत झालेल्या खर्चाची, इ. स. १७८३-८४ (१६५०१) ; पा साकेस व कल्याण-भिवंडी येथील सालमजकुरीच्या जकातीच्या ऐवजाची (१६५०४) ; मौजे खेरोसी येथील दुभला गांवच्या इनामासंबंधी (१६५०५) ; येसाजी पवार याजकडील ऐवज वसुलाची (१६५०८) ; सखाराम बल्लाळ याजकडील मौजे चिखकेली ता चोण येथील कमाविसी दूर केल्याबावतची, सु. १२०९/ इ. स. १८०८-०९ (१६५०९) ; खोरे तर्फे करेपठार व देऊळगाव तालुका पाटस येथील शिवेच्या कजियासंबंधीची, सु. १२१६/ इ. स. १८१५-१६ (१६५११) ; कोकणातील फणसोप, कोठे तर्फ पावस, कसबे पावस व काठे तर्फे लांजे इत्यादी गांवात असलेल्या पडित जमिनी वहिवाटीत आणण्याबद्दल व इनामपत्रांसंबंधी नीळकंठभट करंदीकर यांनी विचारलेल्या प्रश्नास उत्तरे दिली त्यासंबंधीची, सु. १२०८/इ. स. १८०७-१८०८ (१६५१२-१६५१३) ; मौजे पारगांव, रेनवडी, अंबी वगैरे गांवास उपद्रव करू नये म्हणून निरनिराळ्या कमाविसदारास पाठविलेल्या ताकीदपत्रांची (१६५१६) ; युद्धविषयक साहित्याची (१६५१९) ; गावगन्नाच्या ठरावाची, सु. १२१४/इ. स. १८१३-१८१४ (१६५२०) ; गुरे व रखवालदार यावर झालेल्या खर्चाची, १९ रजब, फ. १२१५/१३ ऑक्टो. १८०५ (१६५२२) ता रत्नागिरी येथून रसद भरणा ऐवजी पाठविलेल्या हुंड्यांची, १० र. वल, सु. १२१६/९ फेब्रु. १८१६ (१६५२३) ; निरनिराळ्या लोकांकडून आलेल्या पत्रांची (१६५२४) ; रमजान महिन्यांत पाटबंधाऱ्यावर झालेल्या खर्चाची (१६५२५) ; भिल्लांकडून पोहचलेल्या ऐवजाची (१६५२६) ; सदाशिवराव कृष्ण यांच्या मुलाच्या लग्नानिमित्त लागणाऱ्या साहित्याची, १ र. वल

याद्या—चालू :

सु. ११८५/१३ जाने. १७८५ (१६५२८) ; कपड्याची (१६५३०) ; खासबागेत काम करणाऱ्या लोकांना रोजमुरा दिला त्याची (१६५३१) ; चंदीस हरभरा दिला त्याच्या तपशिलाची माघ व. ५, सु. १२११/१३ फेब्रु. १८११ (१६५३२) ; सोयरो वामन कारकून यास द्यावयाच्या लग्न साहित्याची (१६५३३) ; मसूर येथे मोहरमात झालेल्या खर्चाची, ११ मोहरम, सु. १२११/ ६ फेब्रु. १८११ (१६५३५).

सनदपत्र :

छत्रपती शाहू महाराज यांनी बाजी बल्लाळ देशमुख यास निगडी तर्फ वंदन हा गांव दिला त्याबद्दलचे, आषाढ बहुल ७, रा. मि. शके ४२/१२ जुलै १७१५ (१६४९२).

हिशेब :

निरनिराळ्या लोकांना दिलेल्या रकमांचा (१६५२१); (१६५२७) ; (१६५२९) ; (१६५३४).

रुमाल क्र. ३२, पुडके क्र. २, का. सं. ९१ (१६५३७-१६६२७)
सु. स. १२०६-१२१६, इ. स. १८०७-१८१७

अर्ज :

पट्टीच्या ऐवजाची वसुली हप्तेबंदीनुसार व्हावी म्हणून चांदे ता कर्यात मावळ येथील मोकदमाचा, मार्गशिर्ष व. १४, शके १७३५/५ जाने. १८१४ (१६५५४).

**बापू सोनार मु. पेठ भवानी, पुणे—श्रीमंत महाराज*** : रतन दानवले व रामरात्र कोडे यांच्या देण्याघेण्याच्या तक्रारीत माझ्यावर झालेल्या अन्यायाची चौकशी करण्याविषयी प्रापकाची विनंती, कार्तिक व. १०, शके १७३५/१७ नोव्हें. १८१३ (१६५९०).

कतबे :

**मोकदम, मौजे सावरदरे, ता निरथडी—चिंतोपंत रावजी देशमुख** : सावरदरे येथील ऐवज हप्त्याने देणार असल्याबाबत, मार्गशिर्ष शु. ९, शके १७३५/२ डिसें. १८१३ (१६५५१).

**महिनाबाई फौजदारीण मु. चाकण—श्रीमंत साहेब*** : शुक्रवार पेठ येथील जागा आपलीच असून छपरबंद याची घेतली नाही यासंबंधी, आश्विन व. ५, शके १७३५ / १४ ऑक्टो. १८१३ (१६५७१).

जामीन कतबा :

**भास्कर नारायण—चिंतोपंत रावजी देशमुख** : नारायण जोशी व देसाई साठे पा साकसे यांच्या शेताबाबतच्या कजियासंबंधी, श्रावण व. १४, शके १७३६/१४ ऑगस्ट १८१४ (१६५७५)

पत्रे :

**अंताजी सदाशिव भिडे—मोकदम, पारगांव** : पारगांव व गुळाणी येथील शीव तंट्याबाबत, १६ रमजान, सु. १२१४/ १२ सप्टें. १८१३ (१६५५०).

**आप्पाजी त्र्यंबक लागू—परशुरामपंत बाबा*** : रामशेठ सोनाराच्या तसलमातीचा हिशेब पाठविण्याविषयी, फाल्गुन शु. १४, शके १७३७/१३ मार्च १८१६ (१६६०७).

**खोत व महाजन, वरखेड—सुभेदार ता रत्नागिरी** : बाळाजीराम व आप्पाजी नारायण यास घर बांधण्यास काणे याचा अडथळा, सु. १२१४/इ. स. १८१३-१४ (१६५८९).

पत्र—चालू :

**गंगाधर गोविंद—गोविंदपंत जोशी :** तांबे याचा हिशेब मिळण्याबाबत व घरगुती मजकूर, आषाढ व. १, सु. १२१३/२५ जुलै १८१२ (१६५७९).

**गंगाधरभट केळे—विनायकराव देशमुख :** विसाजी कृष्ण रानडे यांच्याकडून ऐवजाची पोंच, श्रावण व. ३०, शके १७३५/२५ ऑगस्ट १८१३ (१६६१८).

**गणेशभट जोशी—रामचंद्र जोशी :** बाळाजीपंत सोवनी यास ऐवज देण्याबद्दल, पौष शु. १, सु. १२१०/६ जाने. १८१० (१६५९८).

**गणेश अनंत देशमुख—विनायकराव देशमुख :** व्यंकटराव यास बिवलकरी कित्ते पाठविण्याबाबत, २ मोहरम, सु. १२१२/१७ जाने. १८१२ (१६५८२); देवासाठी कपडे व राहिलेल्या जिनसा जपून ठेवण्याबद्दल, ६ रमजान, सु. १२१२/२५ सप्टें. १८११ (१६६०५).

**गणेश महादेव—रावजी देशमुख :** उदरनिर्वाहासाठी कामाची विनंती, १४ रमजान, सु. १२१२/३ ऑक्टो. १८११ (१६५७७).

**गोपाळ देशमुख—हरिपंतभाऊ देशमुख :** आंबे व फणस पाठविणे, राम साळवी व सखोपंत फडके याजकडून पैसे रवाना, आषाढ व. १४, शके १७३४/६ ऑगस्ट १८१२ (१६५८५); घरगुती मजकूर व मकर संक्रमणानिमित्य तिळगुळाची भेट, माघ व. १, शके १७३७/१४ फेब्रु. १८१६ (१६५९६).

**गोविंद महादेव राजवाडे—विनायकराव देशमुख :** सुभा प्रा खटाव येथील मामलतीच्या मक्त्यासंबंधी, २७ र. वल, सु. १२१६/२६ फेब्रु.. १८१६ (१६५५३).

**चिंतो वामन देशमुख—गोपनाक वा दुलबानाक :** वाडे प्रा जुन्नर येथील महार वतनासंबंधी कागदपत्रे घेऊन जाबसालास पुण्यास येण्याबद्दल, १ ज. खर, सु. १२१४/२२ मे १८१४ (१६५३७); १५ र. वल, सु. १२१४/८ मार्च १८१४ (१६५४१); —**धोंडी माटचा :** पेठ येथील कुणब्याच्या शेतातील लाकडे तोडून नेली त्यावरून झालेल्या कजियाबाबत, ७ ज. खर, सु. १२१४/२८ मे १८१४ (१६५४२); —**नारायणराव घोरपडे :** पालखीच्या तैनातीबद्दल विसाजी बच्याजी याजकडून ऐवज देविल्यासंबंधी (१६५६०); —**नारोपंत तात्या रानडे :** बाजी परशुराम, त्रिंबक हरी दामले वगैरेचा खोती जमिनीसंबंधी कजिया, २२ सवाल, सु. १२०९/११ डिसें. १८०८ (१६५७३); —**नारोपंत नाना* :** सावळज व पेठ येथील ऐवजाची पोंच (१६६०८); —**बालनाक वा संभनाक महार :** वाडे प्रा जुन्नर येथील महार वतनासंबंधी कागदपत्रे घेऊन जाबसालास येण्याबद्दल, १९ ज. वल, सु. १२१४/१० मे १८१४ (१६५३८); सु. १२१४/इ. स. १८१३–१४ (१६५४०); —**भिकाजीपंत भाऊ भिडे :** पिंपळवाडी येथील सरंजामी —ऐवज यशवंतराव दाभाडे याजकडे देणे, (१६५६५): **मोकदम वाडे :** वाडे प्रा जुन्नर येथील नावनिशी पाठविण्याबद्दल, सु. १२१४/इ. स. १८१३–१४ (१६५३९); —**मोकदम* : वाडे** प्रा जुन्नर येथील नावनिशी घेऊन जाबसालास येण्याबद्दल, ४ जिल्हेज सु. १२१४/२८ नोव्हें. १८१३ (१६५४४); —**मोकदम देहाय ता चंदन :** चंदनगडकरी याजकडून तैनात दूर करून भिकाजी जाधव याजकडे देण्याबाबत, २७ जिल्काद, सु. १२१५/१० नोव्हें. १८१४ (१६५४३); —**रामचंद्रपंत तात्या :** लक्ष्मणपंत परांजपे यांचे मुलाचे लग्नासंबंधी मदत करण्याबाबत —२९ मोहरम, सु. १२११/२३ फेब्रु .१८११ (१६६००); —**लिंगण्णा बिडवे, इंदापूर :** लमाण्याच्या हुंड्यासंबंधी, सु.. १२१५/इ. स. १८१४–१५ (१६५८७) (अपूर्ण); —**वासुदेवपंत आण्णा जोशी :** मौजे पुणे व वडूज नवघर, ता आटगाव येथे खाऱ्या जमिनी बांधल्या त्यावर झालेल्या खर्चाचा तपशील, जेष्ठ व १३, सु. १२१७/२३ जून १८१६ (१६६१२); —**विसाजीपंत दाजी आपटे :** चंदनगडकरी व

पत्रे—चालू :

वंदनगडकरी याजकडे तैनात जमिनीचा मुशाहिरा आहे तरी रोजमुऱ्याचा ऐवज सरकारात द्यावयाचा त्या कराराचा तपशील, १० सवाल, सु. १२१२/२९ नोव्हें. १८११ (१६५५५–५६).

**त्रिंबक कोन्हेर एकबोटे—बाळकृष्ण आबाजी :** दरमाही ऐवज व हिशेब रवाना करू म्हणून ग्वाही, मार्गशीर्ष व. ३, शके १७३५/१० डिसें. १८१३ (१६५६२).

**नारो बल्लाळ रानडे—विनायकराव देशमुख :** वेगवेगळ्या लोकांकडून येणाऱ्या ऐवज वसुलाबाबत, ११ सफर, सु. १२१२/२५ फेब्रु. १८१२ (१६५५९); घरगुती कामकाजाबाबत, चैत्र व. ३, शके १७३३/११ एप्रिल १८११ (१६५८३); लक्ष्मण आगाशे याजकडे रसद ऐवजाच्या हुंड्या रवाना, पौष व. १३, सु. १२१२/१२ जाने. १८१२ (१६६१०).

**परशुराम*—भाऊ* :** सोन्याचे गोठ व पैशाच्या थैल्या चोरीस गेल्याबद्दल, वैशाख शु. ६, शके १७३४/१८ ऑक्टो. १८१२ (१६५९३).

**परशुराम हरि देशमुख—निळोपंत बापू नेने :** घरगुती सामान तोफखाण्यात पाठवून देण्याबद्दल (१६५८०).

**पांडुरंग दीक्षित मनोहर—त्रिंबकपंत* :** पुण्यास आणलेल्या वाडे येथील कुलकर्णी, पाटील व बलुतेदार यांची रवानगी न करण्याबद्दल ताकीद, मार्गशीर्ष शु. ५, शके १७३५/२८ नोव्हें. १८१३ (१६५५८).

**पांडुरंग रामचंद्र देवधर—रामराव व विठ्ठल सटवाजी हुंडे :** हक्क रूसुमाच्या ऐवजाचा फडशा करण्याकरिता पुण्यास येण्याची सूचना, २१ सफर, सु. १२१०/२८ मार्च १८१० (१६५५७).

**बापूजी गणेश—कृष्णराव तात्याजी :** वाळवे येथील येणे असलेल्या ऐवजाबाबत, ७ ज. खर, सु. १२१३/७ जून १८१३ (१६६०६).

**बाबाजी केशव देसाई—आबा देशमुख :** इमामखान जमादाराची पुण्यास रवानगी, जासुदाबरोबर कळविल्याप्रमाणे ऐवजाची हुंडी रवाना करणे वगैरेसंबंधी, २२ र. वल, सु. १२१४/१५ मार्च १८१४ (१६५८४).

**बाळकृष्ण आबाजी सुभेदार—गणेश बल्लाळ सिधये :** मिठावरील जकातीच्या उत्पन्नाबाबत, सु. १२१४/इ. स. १८१३–१४ (१६५६३); —**बापूजी मल्हार कुलकर्णी :** कुशल मजकुराबाबत, सु. १२१६/इ. स. १८१५–१६ (१६६०१).

**बालशास्त्री दीक्षित—चिंतोपंत सुभेदार :** नारायणभट वझे व बाळकृष्ण काणे कुलकर्णी यांच्या शेत कजियासंबंधी तपशील, २१ सफर, सु. १२१३/२४ फेब्रु. १८१३ (१६५७०).

**बाळाजी पांडुरंग महाजन— अण्णा व भाऊ* :** अननस, फणस वगैरे रवाना, १५ र. वल, सु. १२०८/२२ जून १८०७ (१६६०४).

**बाळंभट पित्रे, श्री विष्णूक्षेत्र वाडवलीकर—चिंतोपंत रावजी देशमुख :** दुसरे बाजीराव पेशवे यास पुत्र रत्न जहाले ते ऐकून श्रीचा प्रसाद व अंगारा देऊन श्रीधरभट यांची रवानगी, १९ जिल्हेज, सु. १२११/१५ जाने. १८११ (१६६०३).

**भिकमसिंग परदेशी—तात्या अभ्यंकर* :** नरसिंगराव भाऊ व गोविंदराव देशमुख यांच्याकडून येणे असलेल्या ऐवजाबद्दल जामीन, वैशाख शु. ५, शके १७२९/१२ मे १८०७ (१६६१७).

**मोरो भवानी शंकर—चिंतोपंत* :** मकरसंक्रमणानिमित्य तिळगूळ रवाना, ३ मोहरम, सु. १२११/२९ जाने. १८११ (१६५९५).

**येमी*—गणेशपंत दादा देशमुख :** घरगुती मजकुराबाबत, फाल्गुन शु. ६, शके १७३७/५ मार्च १८१६ (१६५८१).

पत्रे—चालू :

**रतनजी दानवले—बापू परशुराम सोनार :** घरगुती वस्तूंच्या देण्याघेण्याविषयी, चैत्र व. ११, शके १७३५/२६ एप्रिल १८१३ (१६५९२).

**राणोजी रामोशी—पांडोजी रामोशी :** तेली याजकडून भांडी परत मिळाल्याबाबत, भाद्रपद व. ११, शके १७३५/२० सप्टें. १८१३ (१६५९१).

**रामचंद्र*—परशुरामपंत बाबा देशमुख :** कुशल समाचाराबाबत, फाल्गुन शु. ८, सु. १२१६/७ मार्च १८१६ (१६५८६); —**भाऊ:** पावसे येथे सुखरूप पोहचल्याबद्दल, फाल्गुन शु. ८, सु. १२१६/ ७ मार्च १८१६ (१६५८८).

**विनायक चिंतामण देशमुख—बळवंतरावजी काकिर्डे :** श्रावण मासाच्या दक्षिणेच्या खर्चाचे ताळेबंद लिहिण्यासंबंधी, चैत्र व. २; सु. १२१६/१४ एप्रिल १८१६ (१६६०२); —**मुरारजी येवले :** एरंडवणे येथील आंबराईच्या खर्चाकरिता दिलेले रुपये हरी कृष्ण शिधये याजकडून पावल्यासंबंधी, वैशाख शु. २, शके १७३९/ १८ एप्रिल १८१७ (१६५७८).

**विसोबा*—हरिपंत भाऊ देशमुख :** कागदाची पाने व कित्ते मिळाले व सोवळ्याचे खण पाठवून देण्याबाबत, माघ, व. १ शके १७३७/१४ फेब्रु. १८१६ (१६५७६).

**शिवाजी गणेश नेने—रावजी* :** मकर संक्रमणानिमित्य तिळ-गूळ रवाना, ५ मोहरम, सु. १२११/३१ जाने. १८११ (१६५९४).

**सखाराम बाळाजी टिपणीस—पांडुरंग रावजी :** बाबाजी आत्माजी यांचेवर कुभांड रचले तरी चौकशी व्हावी, ३ मोहरम, सु. १२१३/७ जाने. १८१३ (१६५९९).

**सगुणाबाई देशमुख—हरिपंत भाऊ देशमुख :** मुलीच्या लग्नाबद्दल दागिने व कपड्यांची रवानगी करण्याबाबत, माघ व. १, शके १७३७/१४ फेब्रु. १८१६ (१६५९७).

**सदाशिव जनार्दन लवाटे—विनायकराव दाजी देशमुख :** कासारी व शेरे येथील ऐवज गोविंदभट याजकडे आदा केल्याबद्दल, माघ शु. ११, शके १७३२/४ फेब्रु. १८११ (१६५६१).

**सिदो यशवंत देशपांडे—खेत्रोजी ढवळे :** सदू व गारू ढवळे याजकडून शेताची मालकी परत मिळाल्याबाबत, भाद्रपद (अधिक) शु. १३, सु. १२१५/२८ ऑगस्ट १८१४ (१६५७२).

**हरिकृष्ण फाटक—विनायक रावजी देशमुख :** रावजी याजकडे पाठविलेल्या जमाखर्च याद्या लवकर माघारा पाठविण्याबाबत (१६६१६).

[फक्त प्रेषकाचा नामोल्लेख असलेली]

**आबाजी रघुनाथ दास – (—) :** महादजी वाणी याजकडून कोठीकडे येणाऱ्या जिनसावर जकातीचा अडथळा करू नये म्हणून (१६५६४).

**खुशालचंद* – (—) :** कात्रज येथील ताली व ओढे खणावयाच्या कामाबद्दल पैसे मिळाले, वैशाख व. १, शके १७३४/ २७ एप्रिल १८१२ (१६६०९).

**गणेश बल्लाळ देसाई – (—) :** पो साकसे येथील भाताच्या खरेदीबाबत मुंबईच्या सावकाराबरोबर केलेले खरेदीखत, पेण येथील जकात वगैरेसंबंधी, २१ सवाल, सु. १२१३/२८ ऑक्टो. १८१२ (१६६२२).

पत्रे—चालू :

**चिंतामणी* – (—) :** विवाह कार्यासंबंधी, ७ मोहरम, सु. १२११/२ फेब्रु. १८११ (१६५९९).

**जनार्दन विनायक आगाशे – (—) :** कल्याण, भिवंडी येथील बकऱ्यावरील जकातीसंबंधी, पौष शु. १५, सु. १२१७/३ जाने. १८१७ (१६६२३).

**बाळाजी बच्याजी दांडेकर – (—) :** कुशल वर्तमान, जेष्ठ व. ८, शके १७३३/१४ जून १८११ (१६६२०).

**भास्कर गोपाळ नेने – (—) :** पेठ येथील सरकारी कुरणाच्या कजियासंबंधी, ११ रमजान, सु. १२१४/७ सप्टें. १८१३ (१६६१९).

**राघो वासुदेव बर्वे – (—) :** सौ. काशीबाई प्रसूत होऊन मुलगा झाला व त्याचे नामकरण विधीबाबत खुलासा, माघ व. १, शके १७३७/१४ फेब्रु. १८१६ (१६६२१).

**व्यंकाजी विष्णू गद्रे – (—) :** धोम येथील लक्ष्मी नरसिंह देवालयाच्या खर्चाबाबत व प्रतापगड येथील ऐवजाबाबत हमी-दारास तगादा, २२ जिल्काद, सु. १२१७/१५ ऑक्टो. १८१६ (१६५६६); मंबाजी अनंत व वाईकर देशपांडे यांचे इनाम जमिनीबद्दल जप्तीचे रोखे पाठविण्याबाबत, कार्तिक शु. ४, शके १७३८/२४ ऑक्टो. १८१६ (१६५६७); कमलगड येथील ऐवज वसुली व किल्ल्यावरील लोकांच्या रोजमुऱ्यासंबंधी, कार्तिक शु. ४, शके १७३८/२४ ऑक्टो. १८१६ (१६५६८); पांडुरंगपंत यांचे कचेरीतील कारकुनाबरोबर दुर्वर्तन व देशमुखीच्या बाबीसाठी मसाला करून लोकांनी उपद्रव दिला, सबब बंदोबस्त व्हावा अशी विनंती, २ जिल्हेज, सु. १२१७/२४ ऑक्टो. १८१६ (१६५७४); बोरगाव ब्रा येथील वसुलाविषयी व किल्ल्याकडील वेठबिगारी लोकांबाबत काय करावे याची चौकशी, १९ जिल्काद, सु. १२१७/ १२ ऑक्टो. १८१६ (१६६१४); कसबे भोर येथे पर्जन्यामुळे अमाप नुकसान झाल्याने पाटलास आश्रय देण्याबद्दल, १९ जिल्काद, सु. १२१७/१२ ऑक्टो. १८१६ (१६६१५).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]

(—) – **घनःशामपंत केळकर :** भार्गवराम येथील हिशेब घेवून येण्याबद्दल (१६५४७).

(—) – **परशुराम* :** संजीव नाईक याजकडील ऐवज पलसराम याजकडे रवाना (१६६११).

(—) – **रामचंद्रपंत सुभेदार :** दत्ताराम मोतीराम व जनार्दनपंत भाऊ देशपांडे यांच्या रद्दकर्जाच्या ऐवजाच्या हुंड्याबाबत, १३ र. वल, सु. १२१४/६ मार्च १८१४ (१६६१३); निरनिराळ्या व्यक्तींच्या नांवाच्या हुंड्या माघारी पाठऊ नये म्हणून विनंती, १३ र. वल, सु. १२१४/६ मार्च १८१४ (१६६२५); देवळेपैकी बाबती व सरदेशमुखी दोन्ही अंमल किल्ले राजदेहरेकडे गैरसनदी असल्याबाबत (१६५४५); जांबळी येथील कुरणातील गवत रवाना (१६५४६); अंगरख्यास कापड पाठविण्याबद्दल (१६५४८); सुरुंगाची दारू पाठविण्याबाबत, १ र. खर सु. १२११/२५ एप्रिल १८११ (१६५४९); दाजीबा आयतोळे यावर असलेल्या वरातेचा ऐवज वसूल करण्या-बद्दल, भाद्रपद शु. १३, शके १७३२/ ११ सप्टें. १८१० (१६५५२); घरातील ऐवजाची व घराची काळजी घेण्याविषयी, वैशाख शु. १०, शके १७३४/२१ एप्रिल १८१२ (१६६२४); शंकराजीपंत कबे व नारो श्रीपत यांच्या कजियासंबंधी (१६६२६); शुक्लेश्वर येथे झालेल्या खर्चाच्या यादीबाबत (१६६२७).

**रुमाल क्र ३२ पुडके क्र. ३, का. सं. १०० (१६६२८–१६७२७)**
**सु. स. ११६१–१२१७, इ. स. १७६१–१८१८**

**जामीन कतबा :**

शेख सय्यद व शेख मुलान्ना यांचे लोक किल्ले बागलकोट येथे इमाने इतबारे वागतील म्हणून महमुदखान देशमुख यांचा, १ र. वल, सु. १२१२/१५ मार्च १८१२ **(१६६३१).**

**पत्रे :**

**आत्माराम बहिरव—बापूजीपंत दादा गोडबोले :** केशवभट शेंडे बद्दल ऐवज मिळाल्याबाबत, फाल्गुन व. २, शके १७३८/५ मार्च १८१७ **(१६६६८)**; गोविंदराव बल्लाळ भावे यांचा ऐवज जमा, पौष व. १०, शके १७३९/३१ फेब्रु. १८१८ **(१६६७०)**; नारायण दीक्षित हौसिंग याजबद्दल ऐवज जमा, कार्तिक व. २, शके १७३८/७ नोव्हें. १८१६ **(१६६७४)**; कृष्णराव गोविंद भावे याजकडून जकातीपैकी ऐवजाची पोंच, मार्गशीर्ष शु. २, शके १७३८/२१ नोव्हें. १८१६ **(१६६९०)**; इंद्रोजी नाईक पिसाळ याजकडून ऐवज पावला, कार्तिक व. १४, शके १७३८/१८ नोव्हें. १८१६ **(१६७००)**; संभाजी गायकवाड मौजे सुरूर याजकडून ऐवज पावला, मार्गशीर्ष शु. ६, शके १७३८/२५ नोव्हें. १८१६ **(१६७०१)**; सदाशिवपंत निंबाळकर याजकडून ऐवज मिळाला, कार्तिक व. २, शके १७३८/७ नोव्हें. १८१६ **(१६७०२)**; बाजीराव बापट याजकडून देशमुखीबाबत ऐवज मिळाला, मार्गशीर्ष शु. २, शके १७३८/२१ नोव्हें. १८१६ **(१६७०७).**

**आप्पाजी बहिरट—पांडुरंगपंत आण्णा :** निळो महादेव यांच्या मृत्युमुळे कुटुंबावर आलेली आपत्ती **(१६६३६).**

**आप्पाजी रामचंद्र आगाशे—पांडुरंग आबा :** जानोजी यास खर्चास पैसे देण्याबद्दल, कार्तिक व. १, शके १७३९/२४ नोव्हें. १८१७ **(१६६८४).**

**आबाजी राम गोडबोले—दिनकरपंत तात्या गोडबोले :** सदाशिव कृष्ण ताम्हणकर यास खर्चास हवा असेल तर ऐवज देण्यासंबंधी, फाल्गुन शु. ९, शके १७३९/१६ मार्च १८१८ **(१६६५४).**

**कृष्ण आप्पा—राघोबा दादा शेंडे :** दोन हजार बैलांच्या खरेदीबाबत, २३ जिल्काद, सु. १२०६/१३ फेब्रु. १८०६ **(१६७२२).**

**कृष्णाजी नारायण—दिनकरपंत दादा गोडबोले :** केळजा किल्ल्यावरील शिबंदीच्या खर्चासाठी ऐवजाची मागणी **(१६६२८).**

**गंगाधर कृष्ण—मोकदम, सजाने ता कुडाळ :** सजाने ता कुडाळ येथील शिंदे देशमुख याजकडून येणे असलेल्या हक्कदारी ऐवजासंबंधी **(१६७१८).**

**चिंतो वामन देशमुख—मोकदम, सावरदरे ता निरथडी :** सावरदरे येथील पाटील, कुलकर्णी व महार यांच्या इनाम जमिनीसंबंधीच्या कजियाबाबत, सु. १२१५/इ. स. १८१४–१५ **(१६६७९)**; बाळोबा बिन रामजी पाटील याच्या वैवाहिक जीवनासंबंधी, सु. १२१३/इ. स. १८१२–१३ **(१६६८२)**;— **मोकदम ढोरजे पा। कडे रांजणगांव :** पर्जन्य होत नाही म्हणून शंकराचार्यांच्या मठास अग्रहार द्यावयाचा करार झाल्याबाबत, सु. १२१४/इ. स. १८१३–१४ **(१६६८३)**;— **मोकदम पेठ ता खेड, प्रा जुन्नर :** मागील वर्षाच्या देशमुखी ऐवजाची मागणी, सु. १२११/इ. स. १८१०–११ **(१६६८५)**; **मोकदम, देहाय ता चंदन :** देहाय ता चंदन येथील खाजगतीवर गणेश नारायण लेले यांची नेमणूक, सु. १२१२/इ. स. १८११–१२ **(१६६८७)**;— **मोकदम, पौड पा निरथडी :** सावरदरे येथील महाराने पाटलाकडून घेतलेल्या कर्जाचा फडशा करण्याबद्दल, ४ सवाल, सु. १२१५/१९ सप्टेंबर १८१४ **(१६६८८).**

**पत्रे—चालू :**

**दामोदर*—रावजी देशमुख :** खडीसाखर, बदाम व पिस्ते इत्यादी जिनसा मिळाल्याबाबत **(१६६६४).**

**नागोजी गुरव—बाबासाहेब* :** यशवंतराव सैराळ याजकडून रोजमुरा ऐवज मिळाला, माघ शु. ९, शके १७३३/२३ जानेवारी १८१२ **(१६६५१).**

**नारो कृष्ण—अंबादास बल्लाळ :** पा बहाल येथील जकातीच्या कर्जपट्टी, रोख्यासंबंधी कागदपत्र रवाना करण्याबाबत, ९ सफर, सु. ११६५/८ ऑगस्ट १७६४ **(१६६५३).**

**बळवंतराव सदाशिव—रावजी खरे :** व्यंकटराव रघुनाथ देशपांडे यांना महालाच्या कामात मदत करण्याबाबत, ५ रजब, सु. १२१७/२२ मे १८१७ **(१६६४८).**

**बाजीराव रघुनाथ प्रधान—आबाजी महादेव :** सुवर्णदुर्ग येथील मामलतीवरुन दूर केल्याबाबत व तेथील मामलतीचा हिशेब देण्याबद्दल, २ ज. वल. सु. १२०४/१८ ऑगस्ट १८०३ **(१६६३७)**;— **आनाम देशमुख व देशपांडे पा कल्याण—भिवंडी :** कल्याण भिवंडी येथील मामलतीवरुन नारो गोविंद यास दूर केल्याबाबत, १ साबान, सु. १२१०/१२ सप्टेंबर १८०९ **(१६६४१)**; सुवर्णदुर्ग येथील मामलतीवर सदाशिव माणकेश्वर यांची नेमणूक, १७ मोहरम, सु. १२०४/२८ एप्रिल १८०४ **(१६६४४)**; —**बाळाजी माणकेश्वर :** नारो केशव तांबवेकर व शिलेदार कामगिरीवर आहेत त्याजबरोबरच्या घोड्यास चंदी वैरण देणे व पागे यास व जासुदास रोजमुरा देण्याविषयी, सु. १२०३/इ. स. १८०२–१८०३ **(१६६७७)**; —**रघुनाथ कृष्ण :** वाळुंज येथील मामलतीवर काशिनाथ हरी याची नेमणूक, ७ ज. खर, सु. १२०४/१२ सप्टेंबर १८०३ **(१६६४५)**; —**हवालदार व कारकून (किल्ले जयगड) :** किल्ले जयगड व भवानगड येथील मामलतीवर नारो रामचंद्र याची नेमणूक, १५ सफर, सु. १२०४/२६ मे १८०४ **(१६६४६).**

**बापूजी सखाराम—पांडुरंगपंत आबा :** जनार्दनपंत भाऊ गाडगीळ यांच्याकडील रक्कम वाई मुक्कामी जमा करुन पावती रवाना करण्याबद्दल, २२ ज. खर, सु. १२१७/१० मे १८१७ **(१६६४९)**;—**राघोपंत दादा आपटे :** वासुदेवपंत डोंगरे याजकडे कुणबिणींची रवानगी करण्याबाबत, ६ सवाल, सु. १२१८/२० ऑगस्ट १८१७ **(१६६६५)**;—**वासुदेवपंत भाऊ डोंगरे :** शिलेदार व गारदी यांचा रोजमुरा चव्हाण यांच्या स्वाराबरोबर रवाना केल्याबाबत, १७ रमजान, सु. १२१८/१ ऑगस्ट १८१७ **(१६६५५)**; बळवंतराव चिरमुले निा रास्ते यानी नारोबा नाईक माजगांवकर मु. वाई यावर दिलेल्या वरातप्रमाणे ऐवज घेण्याविषयीचा खुलासा, २९ रमजान, सु. १२१८/१३ ऑगस्ट १८१७ **(१६६५६)**; तुम्हाकडे रास्तेबद्दल जमा असलेला ऐवज पागेकडे खर्चास देण्याबद्दल, १५ सवाल, सु. १२१८/२९ ऑगस्ट १८१७ **(१६६५७)**; पांडुरंगपंत आबा व गोविंदराव मेहेंदळे याजकडील माहिती कळविण्याविषयी, १४ साबान, सु. १२१८/३० जून १८१७ **(१६६५८)**; हरभरे स्वस्त दराने खरेदी करण्याबद्दल, श्रावण शु. ५, सु. १२१८/१७ ऑगस्ट १८१७ **(१६६५९)**; पांडुरंगपंताबरोबर भेटीस यावे म्हणून विनंती, १६ सवाल, सु. १२१८/३० ऑगस्ट १८१७ **(१६६६०)**; बळवंतराव चिरमुले निा रास्ते यांनी वाईकर नाईक यावर दिलेल्या वरातेचा ऐवज पाठवून देण्याबद्दल, ४ सवाल, सु. १२१८/१८ ऑगस्ट १८१७ **(१६६६१)**; बाबाजीपंत भाटे यांच्या वाई येथे असलेल्या घराची जप्ती करण्याकरिता भगवंतराव बल्लाळ भावे यास मदत करण्याविषयी, श्रावण शु. ५, सु. १२१८/१७ ऑगस्ट १८१७ **(१६६६२)**; उत्तम प्रतीचे आंबे मातोश्री बाईसाहेबांकडे रवाना करण्याबाबत, २१ साबान, सु. १२१८/७ जुलै १८२७ **(१६६६३)**;

